# अर्पण-पत्रिका

गुरुंचा प्रसाद ज्यांना भोवला अशा
लाखो तळमळणाऱ्या जीवांना
त्यांच्या समाधानार्थ मी
हा ग्रंथ अर्पण करीत
आहें.

—महादेवशास्त्री दिवेकर

# आधारभूत ठळक ग्रंथांची यादी

(१) ऋग्वेद संहिता
(२) दशोपनिषदें
(३) भगवद्गीता
(४) मनुयाज्ञवल्क्यादि स्मृति
(५) महाभारत
(६) भागवत
(७) अर्थसंग्रह
(८) प्रस्थानत्रयीवरील शांकरभाष्य
(९) ज्ञानेश्वरी व ज्ञानेश्वर गाथा
(१०) एकनाथी भागवत व एकनाथी भारुड
(११) दासबोध व समर्थांचे अभंग
(१२) तुकारामाचा अभंग गाथा
(१३) गीतारहस्य
(१४) भारतीय तत्त्वज्ञान (केळकर)
(१५) विज्ञानबोध (माटे)
(१६) उपासनीचे सर्व प्रसिद्ध वाङ्मय
(१७) नारायणबुवाविषयींचे सर्व प्रसिद्ध ग्रंथ
(१८) केसकर बुवावरची पद्यें व चरित्रें
(१९) बुवाशाहीवरील अनेकांचे लेख
(२०) लेखकाचे स्वतःचे ग्रंथ

# प्रास्ताविक निवेदन

जगच्चालकाच्या कृपेने आज हा नवा ग्रंथ महाराष्ट्र वाचकांपुढे ठेवण्याचा सुयोग आला, याबद्दल अत्यानंद वाटतो. या ग्रंथाचा उगम सन १९२० सालीं महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेपुढे नाशिक येथे मांडलेल्या आमच्या धर्म व समाजसुधारणेच्या योजनेतूनच झालेला आहे. हिंदुसमाजाच्या दौर्बल्याला जी अनेक कारणें आहेत, त्यातील निवृत्तिपरता हें एक प्रमुख कारण आहे. या निवृत्तिपर वेदांताचे धागेदोरे शोधीत शोधीत बौद्ध यतीपर्यंत जावें लागतें, आणि तो सर्व इतिहास 'आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष' या ग्रंथांत आम्ही साधार मांडला आहे. निवृत्तिपर वेदांताची बीजें गौतम बुद्धाच्या शिकवणीत असलीं तथापि आज त्या तत्वाचे प्रचारक हे बुवा, हे महाराज व आधुनिक संताळेच होत. या वर्गाविषयी प्रस्तुत लेखकानें 'हिंदुसमाज समर्थ कसा होईल ?' प्रकरण ८ व ९ मध्यें बरेंच विवेचन केलेले आहे. आजवर जो विषय सामान्यत्वानें लिहिला, ऐतिहासिक व तात्विक दृष्टया ज्याची चर्चा केली, त्याचेंच विशेष परिणत फळ म्हणजे हा ग्रंथ होय.

मंदिरप्रवेशाच्या प्रचारानिमित्त वऱ्हाडात प्रस्तुत लेखक १९३२ त गेला असतांना असे समजले कीं अकोला येथील एका सुसंस्कृत, चित्पावन पदवीधरानें आपली उपवर मुलगी ब्रह्मप्राप्तीकरितां एका महाराजाला म्हणे अर्पण केली ! ही वार्ता कळल्यावर वैदिक आर्यांचे श्रेष्ठ तत्वज्ञान व स्त्री पातिव्रत्य या दोहोबद्दल अंतःकरणात असलेला अभिमान जागृत झाला आणि ब्रह्मज्ञान व बुवाबाजी या विषयावर १९३३ च्या मेपासून मी लेख लिहूं लागलो. किर्लोस्कर मासिकाचे संपादक मोठ्या उत्तेजनानें व गौरवानें ते लेख छापूं लागले. किर्लोस्कर मासिकातील पहिल्या ३।४ लेखांनी समाजाची मनें बरीच आकर्षिली गेलीं, आणि अनेक लोकांच्या सूचना आल्यामुळे बुवाशाही विध्वंसक संघाची स्थापना करावी लागली!

सघाच्या प्रवेशपत्राचा नमुना पृष्ठ १२४ वर दिला आहे त्यावरून सघाचा हेतु बुवाशाहीचा विध्वस व्हावा एवढाच असून 'बुवा' या व्यक्तीशी सघाला काही कर्तव्य नाही, हे सिद्ध आहे शाही म्हणजे राज्य, बादशाही म्हणजे बादशहाचे राज्य या राज्याप्रमाणे जरी बुवाची राज्यें नसली तथापि समाजाचे मनावर या बुवाचे जें वर्चस्व, जें वजन व जी एक मत्ता, जी एक पक्कड म्हणून असते, ती नष्ट होऊन प्रज्ञावान, पौरुषवान, पुरुषार्थी, सज्जन व प्रापचिक अशा सद्गृहस्थाचा आदर्श समाजापुढें यावा, एवढाच या यत्नाचा हेतु आहे

व्यक्तीप्रमाणे समाजालाहि मन आहे समष्टीचे मन म्हणजेच ईश्वरी साहच होय ! महात्माजींनी निर्बंधभग सुरू केला त्यावेळी त्याना आपल्या कार्याला एवढें स्वरूप येईल अशी कल्पना नव्हती भट्टप्रभु परिषदेपासून पोटजातीच्या एकीकरणाच्या उद्देशाने मी जेव्हा माहिती मिळवू लागलो तेव्हा अनेक वृत्तपत्राचे प्रसिद्धीच्या दृष्टीने मोठे साहच होऊन, अकोल्यास टोलेजग अशी ब्राह्मण परिषद भरेल, अशी मलाहि कल्पना नव्हती. बुवा-शाहीबद्दलहि अदाज हाच की चार दोन लेख लिहिले की विषय सपेल ! पण आज जें त्याला समष्टीच्या साहचाने मोठें महत्त्वाचे व खळबळीचे स्वरूप आले आहे त्यांचे कारण हेच की, समष्टिरूपी ईश्वराला बुवा-शाहीचा प्रतिकार व्हावा असे वाटत असल्यामुळें, तो कोणाला तरी निमित्त करून हे कार्य घडवीत आहे, यात शका नाही

१९११ साली रँगलर डॉ परांजपे यानी या विषयावर टाइम्समध्ये लेख लिहिले, पुढें केसरीत 'भोंदू गुरुची साथ' सुरू झाली विविधवृत्ताने १९२८ साली उपासनीबाबावर चागली झोड उठविली. श्री. रा. प्र मानिटकर यानी १९३१ मध्यें मुबई येथील प्रगति पत्रामध्यें नारायणबुवाविषयी लेख लिहिले आणखी इतर खाजगी व सार्वजनिक प्रयत्न पुष्कळच झालेले आहेत! अनेकानी या पूर्वी चालू केलेले हे कार्य समष्टिरुपी ईश्वराने दिवेकर व किर्लोस्कर याना निमित्त करून अनेक बधु भगिनीना बुवाच्या सहवासातील स्वानुभव सागण्याविषयी धैर्य देऊन, चालविले आहे इतकेच समाजात कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक झाला की त्या अतिरेकाच्या प्रतिकाराची वृत्ति स्वाभा-

विरुद्ध उद्भूत होते अतिरकाला याग्य मुरड घालणे म्हणजच सुधारणा होय ! हे लक्षात घेतले म्हणजे दिवेकर-किर्लोस्करानी हा नसना उपद्व्याप केला नसून समाजरूपी निधीने या प्रतिनिधीकडून ह कार्य चालविले आहे असे स्पष्ट म्हणावे लागते

यापूर्वी पुष्कळानी लेख लिहिले व उघड चर्चाहि केली तथापि या विषयाला महत्त्व न येण्याचे कारण लोकाची मने त्यावेळी रिकामी नव्हती तर ती निरनिराळ्या महत्त्वाच्या विषयात गुन्तली होती हे होय ! १९३१ साली श्री क्षानिटकर यानी नारायणमहाराजांविषयी लिहिलेला लेख फारच परिणामकारक आहे पण समाजाचे मन कायदेभगासारख्या मोठ्या कार्याकडे वेधले होते परतु यावेळी समाजाला असलाच काही तरी निराळा विषय पाहिजे होता म्हणून आणि लेखक व सपादकावर एका लेखामुळे खटला झाला म्हणून या विषयाला महत्त्व आले !

गुरुवर्य प. नारायणशास्त्री मराठे व प्राज्ञपाठशाळा पाठीशी असल्यामुळे व दे भ तात्यासाहेब केळकर याच्या प्रोत्साहनामुळे (आर्थिक प्रोत्साहनामुळे नव्हे ) केसरी पत्राच्या आश्रयानें हिंदुसघटनाला पोषक अशा अनेक विषयावर लेख लिहून मला लोकजागृति करता आली अनेक वृत्तपत्राच्या विशेषत केसरीच्या व रा मुडले याच्या ब्राह्मण पत्रिकेच्या साहचान ब्राह्मणातील पोट जातीच्या एकीकरणाला चालना देण्याचे कार्य मी केले प्रस्तुत बुवाशाहीच्या विध्वसाचे कार्य किर्लोस्कर मासिकाचे सपादक श्री शकरराव किर्लोस्कर याच्या सहकार्याने आणि किर्लोस्कर बधूच्या लिमिटेड कारखान्याचे जनक श्रीमत लक्ष्मणरावजी किर्लोस्कर याच्या प्रोत्साहनाने ( आर्थिक प्रोत्साहनाने नव्हे ) करता आले हे कळविण्यास आनद वाटतो

कोणत्याहि प्रकाशित केलेल्या लेखाला मोबदला देण्याची किर्लोस्कर मासिकाची प्रथा आहे माझ्या बाबतीत काही निराळी व्यवस्था आहे असे नाही हिशेबानेच ते इतराप्रमाणे मलाहि पुरस्कार देतात ते पैसे देतात म्हणून किंवा त्यानी सांगितले म्हणून मी काहीहि लिहिलेले नाही व लिहीत नसतो माझे विचार मी लिहितो त्याना पसत पडलेले लेख ते छापतात नापसत लेख परत करतात या बुवाशाहीच्या विध्वसाबाबतीत आम्हा उभयताचे मतैक्य

आहे. इतके स्पष्ट केल्यानंतर लेखकावर पैशाविषयी जे कुत्सित आरोप येतात त्यांना उत्तर देण्याचे प्रयोजनच नाही. कोणतेंहि सार्वजनिक कार्य हें समाजाच्या उन्नतीकरिता करावयाचें असतें' पैसा व मान मिळावा या हेतूनें व पैशावर नजर देऊन ही कार्ये करावयाची नसतात. कार्याला व कार्य करणारालाहि पैसा व इतर साहय लागतें परंतु ' यान्ति न्यायप्रवृत्तस्य तिर्यंचोऽपि सहायताम्' या प्रमाणे कार्य करीत राहिलें म्हणजे आपोआप सर्व तऱ्हेचें अवश्य साहय मिळतें, असा या लेखकाला गेल्या सत्तावीस वर्षांचा अनुभव आहे.

बेळगाव येथील पिकेटिंग, जुनें समर्थ विद्यालय, अर्जुनवाड व चिकोडीचे खाजगी आश्रम, प्राज्ञपाठशाळा वाई, ब्राह्मण परिषद, हिंदुधर्म परिषद, हिंदु संघटन, कीर्तन समेलन, अस्पृश्योद्धार, ग्रामोद्धार, ब्राह्मणांतील आंतरज्ञाती विवाह इत्यादि विविध क्षेत्रांत लेखकानें ज्या वृत्तीनें अल्पस्वरूप सेवा केली, तीच वृत्ति ईश्वरकृपेनें याहि कार्यामध्यें आहे, एवढें सांगितलें म्हणजे पुरे.

आभार—हा ग्रंथ सिद्ध होण्याला अनेकांचें पुष्कळच साहय झालेलें आहे. लेखकाच्या आरोग्याविषयीं अगत्य बाळगणारे डॉ. पळसुले, व डॉ. भडकमकर पुणे, डॉ. एम्. डी. जोशी—मुंबई, डॉ. टिळक व डॉ. कोंकणी मुंबई, डॉ. गोसावी व डॉ. भडभडे मिरज, वैद्य नानलशास्त्री—पुणे, बळवंतराव कुलकर्णी—कऱ्हाड, व वैद्य आडिवरेकर-मिरज अशा या डॉक्टर व वैद्यांचें गेल्या दोन वर्षांत आम्हांस अतिशय साहय झालेलें आहे. कारण संग्रहणी जाऊन गृध्रसी विकार झाला व आतां न्युरायटीजमुळें डावा पाय अधु झाला आहे. शेंकडो रुपये खर्चून जे औषधोपचार होऊं शकत नाहीत ते डॉ. टिळक, डॉ एम्. डी. जोशी व डॉ. पळसुले वगैरे अगदीं कांहीं न घेतां निरपेक्षपणें करीत असतात यावद्दल या आरोग्यदात्यांचे प्रथम आभार मानले पाहिजेत.

श्री रा.प्र कानिटकर पुणे, यांनीं १९३१ सालीं मुंबई येथील प्रगति पत्रांत छापलेल्या आपल्या लेखांतील भाग ग्रंथांत घालण्यास परवानगी दिली, खामगांव येथील रा. पेंडसे यांनीं आपले एक वर्षाचे अनुभव लिहून पाठविले, लोकसंग्रह छापखान्याचे व्यवस्थापक श्री. मामाराव दाते यांनीं छपाईचे

काम सुबक, वक्तशीर व व्यवस्थित करून दिले. यथाल आमच मित्र रा भाऊराव आपटे यानी पाहिजे त्या वेळेस येऊन निरलसपणानें सर्व प्रकारचे साह्य केले, याबद्दल आम्ही वरील सर्व सद्‌गृहस्थाचे आभारी आहोत

बुवाशाहीविरुद्ध असणाऱ्या अनेक ज्ञात व अज्ञात व्यक्तीचे साह्य या ग्रथाला झालेले असल्यामुळें लेखक ह्या सर्वांचा ऋणी आहे तथापि किर्लोस्कर मासिकाचे संपादक श्री. शकरराव किर्लोस्कर यानी या ग्रथात घालण्याकरिता चित्राचे अनेक ब्लॉक विनामूल्य दिले, आणि इतरहि अनेक प्रकारचे वैचारिक प्रोत्साहन त्यांचेकडून मिळाले, हे येथें अवश्य सागितले पाहिजे.

शेवटी ज्या जनताजनार्दनाचे प्रेरणेने हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमालेचे हे पाचवे पुष्प अर्पण करण्याचा हा सुयोग आला त्याबद्दल त्याचे चरणी विनम्र होऊन हें प्रास्ताविक निवेदन पुरे करतो

वास्तव्य–मिरज
बलिप्रतिपदा
१८५७



हिंदुसमाजसेवक
महादेवशास्त्री दिवेकर



# अनुक्रमणिका



# ब्रह्मज्ञान व बुवाशाही

प्रकरण १ ले

## विषय—प्रवेश

हिंदुस्थान देशाची प्रसिद्धी तो अनेक धर्मांचा उत्पादक देश म्हणून सर्वत्र आहे. अत्यंत प्राचीन असा सनातन वैदिक धर्म या देशातच उत्पन्न झाला. जैन व बौद्ध धर्म हेहि येथेच उगम पावले. फार काय पण ख्रिस्ती व महमदी धर्मांवरसुद्धा या देशातील धर्मांची छाप पडली आहे, असे तज्ज्ञ लोक म्हणत असतात. देश मोठा अवाढव्य, धर्म अत्यंत प्राचीन आणि लोकसंख्याहि पुष्कळ असल्यामुळें धर्माच्या नांवावर हिंदुस्थानांत जितके चमत्कार व अनिष्ट प्रकार चालत असतील तितके इतरत्र क्वचितच असावेत! मनुष्यस्वभाव सर्वत्र सारखा असला तरी साक्षरता, विचारशक्ति व तर्कशुद्धता ही ज्या समाजात जितकी अधिक असतील, त्या मानानें त्या समाजांत धर्माच्या नांवाखाली होणारे वेडगळ प्रकार पुष्कळच कमी करील, यांत शंका नाही. हिंदुस्थानामध्यें भोळेपणा अधिक, शिक्षण कमी, त्यामुळें धर्माच्या विशेषतः ब्रह्मज्ञानाच्या नांवाखाली पुष्कळच अनाचार व अनिष्ट प्रकार हल्ली चालू आहेत म्हणून प्रस्तुत ग्रंथांत श्रीशांकरभाष्याधारें वेदान्तशास्त्रातील प्रथम मुख्य मुख्य सिद्धान्त मांडणार आहे. ब्रह्मज्ञानाच्या नांवावर समाजांत जी हल्ली बुवाशाही बोकाळत चाललेली आहे, तीमुळें प्रजावत्सल माणसंसुद्धां कशी प्रज्ञाहत होत आहेत, आणि ती प्रपंचाला, समाजाला व परंपरेनें राष्ट्राला कशी निरुपयोगी होत चालली आहेत हेंहि नंतर येथें दाखविणार आहे.

# अनुक्रमणिका





---

# ब्रह्मज्ञान व बुवाशाही

प्रकरण १ ले

## विषय–प्रवेश

हिंदुस्थान देशाची प्रसिद्धी तो अनेक धर्मांचा उत्पादक देश म्हणून सर्वत्र आहे. अत्यंत प्राचीन असा सनातन वैदिक धर्म या देशातच उत्पन्न झाला. जैन व बौद्ध धर्म हेहि येथेच उदयास पावले. फार काय पण ख्रिस्ती व महमदी धर्मावरसुद्धा या देशातील धर्माची छाप पडली आहे असे कित्येक लोक म्हणत असतात. देश मोठा अवाढव्य, धर्म अत्यंत प्राचीन आणि लोकसंख्याहि पुष्कळ असल्यामुळे धर्माच्या नावावर हिंदुस्थानात जितके चमत्कार व अनिष्ट प्रकार चालत असतील तितके इतरत्र क्वचितच असावेत! मनुष्यस्वभाव सर्वत्र सारखा असला तरी साक्षरता, विचारशक्ति व तर्कशुद्धता ही ज्या समाजात जितकी अधिक असतील, त्या मानाने त्या समाजात धर्माच्या नावाखाली होणारे वेडाळ प्रकार पुष्कळच कमी होतील, यात शंका नाही. हिंदुस्थानामध्ये भोळेपणा अधिक, शिक्षण कमी, त्यामुळे धर्माच्या विशेषतः ब्रह्मज्ञानाच्या नावाखाली पुष्कळच अनाचार व अनिष्ट प्रकार हल्ली चालू आहेत म्हणून प्रस्तुत ग्रंथात श्रीशांकरभाष्याचा वेदान्तसूत्रातील प्रथम सूत्र मुख्य सिद्धान्त मांडणार आहे. ब्रह्मज्ञानाच्या नावावर समाजात जो हल्ली बुवाशाही धोंगाणा चालला आहे, तीमुळे प्रगत मार्गसुद्धा कसा प्रतिहत होत आहे, आणि त्या प्रचाराने समाजाचे व परंपरेने राष्ट्राचे कसे निरुपयोगी होत चालले आहेत हेहि नंतर येथे दाखविणार आहे.

हिंदुस्थान देश हा पारतंत्र्यांत पडलेला देश आहे आणि ह्या देशाची अवनति सर्व बाजूंनी झालेली आहे; यात शंका नाही. अत्यंत अवनत स्थितींतसुद्धां अभिमान बाळगण्याजोगें अथवा जगाला सांगण्याजोगें असे काही हिंदुस्थानाजवळ आहे काय असा प्रश्न केल्यास त्याचें उत्तर देण्याची *कांहींना मोठी पंचाईत पडते! जगातील कांही देश सृष्टि*सौंदर्यामुळें तर कांही शोधामुळे, कांही शास्त्रसपन्नतेमुळे तर कांहीं पराक्रमामुळें व मुत्सद्दीपणामुळें प्रसिद्धीस आलेले आहेत. हिंदुस्थानाजवळ आज *जगाला सागण्यासारिखें कांही असेल तर तें गतवैभव, उच्च असें तत्त्वज्ञान*, वेरूळसारखी लेणीं, हिमालय व गगानदी हेंच होय. सर्व जगांतील अत्यंत प्राचीन असें जें वैदिक वाङ्मय त्याचा उद्भव हिंदुस्थानांतच झाला. सर्वजगांत परमोच्च व श्रेष्ठ पर्वत जो हिमालय तो हिंदुस्थानांत आहे. सर्व श्रेष्ठ, पवित्र व पावन गंगानदी ही या भरतखंडालाच पुनीत करीत आहे. पाणिनीसारखा वैय्याकरण, कालिदासासारखा महाकवि, व्यासासारखा सर्वज्ञ, सर्वश्रेष्ठ व सर्वसंग्राहक ग्रंथकार, शंकराचार्यांसारखा तत्त्ववेत्ता वगैरे याच देशांत उत्पन्न झाल्यामुळें, तीं अभिमानाचीं स्थानें म्हणून सांगतां येतात. तसेंच आर्य संस्कृतीचें वैशिष्टच म्हणून तीन ऋणे फेडण्याची कल्पना, चार आश्रमाची पद्धति, धर्ममताबद्दल सहिष्णुत्व, अनेकांत एकत्व पाहाण्याची दृष्टि, त्याग व विद्यादान यांचें महत्त्व, कर्मफल व त्याचा भोग यांची मीमांसा, आणि सर्वश्रेष्ट असे तत्त्वज्ञान ही सर्व अभिमानानें जगाला *सांगण्याजोगीच आहेत.*

उपनिषदांमध्यें जें तत्त्वज्ञान सागितलेले आहे, तें सर्वश्रेष्ठ असून त्या तत्त्वज्ञानाच्या पुढे अद्याप जगाची मजल गेलेली नाहीं, यात शंका नाहीं. *मनुष्यप्राण्याला खाणेपिणें, प्रजा, पैसा, सुख व आनंद ही पाहिजे असतात.* निरतिशय आनंदाचें स्थान हे सामान्य सुखापलीकडे असल्यामुळें मनुष्याची बुद्धि दृश्य जगापलीकडे अर्थात् त्याच्या बुडाशी कांहीं आहे की काय धसा शोध करूं लागते.

मनुष्य हा ज्ञानवान् प्राणी आहे. मनुष्य व पशु यांत जर कांहीं अंतर असेल तर तें विवेक व ज्ञान हेंच होय! सामान्य ज्ञानामध्यें पुष्कळ माणसें

संतुष्ट असतात, त्याचें कारण त्यांचा बौद्धिक अधिकार तेवढाच असतो. खाणें, पिणें, मुलेंबाळें व सामान्य संसार एवढाच त्यांचा पुरुषार्थ असतो. कुशाग्र बुद्धीचीं माणसें विशेष ज्ञानाकडे वळतात व तीं विविध शास्त्रांमध्यें शोध लावून मानवी प्रगतीला साहाय्य करतात. सामान्य ज्ञान व विशेष ज्ञान यांच्या पलीकडे तत्त्वज्ञानाचे क्षेत्र आहे. कोणत्याही विषयांत खोल जाऊन त्यांतील मूळ तत्त्व पाहण्याची बुद्धि फार थोड्यांमध्यें असते, म्हणूनच जगांत तत्त्ववेत्ते फारच थोडे निर्माण होतात. तत्त्वज्ञानाचा विषय हा फार थोड्यांकरितां आहे, अर्थात् फारच थोडी माणसें या क्षेत्रात प्रवेश करतात.

वेदांतशास्त्रदृष्ट्या ब्रह्मज्ञानाचा अधिकार पाहिजे त्याला कधीही प्राप्त होत नाहीं. हें ज्ञान प्राप्त होण्याला जसा बौद्धिक अधिकार लागतो त्याप्रमाणेंच अन्तःकरणाची एक विशिष्ट भूमिका असावी लागते. हिंदुधर्मशास्त्रदृष्ट्या धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चार पुरुषार्थ आहेत. धर्म म्हणजे धारणपोषण, अर्थ म्हणजे द्रव्यप्राप्ति, काम म्हणजे उपभोग अर्थात् तो सर्व प्रकारचा. या तिहींतच बहुतेक माणसें गुरफटलेली असतात. चौथा पुरुषार्थ मोक्ष. हा क्वचित् एखाद्यास पाहिजे असतो. तीन पुरुषार्थ ज्यानें साध्य केले, जगातील उपभोग ज्यानें बहुतेक सर्व घेतले, जाणावयाच्या लौकिक गोष्टी बहुतेक ज्यानें जाणल्या, मग 'ततः किम्' पुढें काय? पुढें कांही आहे कीं नाहीं असें म्हणून ज्याची बुद्धी शोध करूं लागली, तोच या विषयाचा जिज्ञासु अधिकारी होय. मोक्षाबद्दलची तळमळ व तत्त्वज्ञानाची जिज्ञासा हीं उत्पन्न होण्यास पुष्कळ अंशी आकस्मिक आपत्ति, वैराग्याचे प्रसंग आणि विवेक वैराग्य ही कारणीभूत होतात. म्हणूनच मनुष्याच्या उतार वयांत त्याला जसजसा आपला अंतकाल जवळ आला असें वाटतें; तसतसी या विषयाकडे त्याची थोडीबहुत प्रवृत्ति होते. पण ती खरी टिकाऊ अशी नसल्यामुळें मोक्षमार्गाकडे धावलेली थोडींच माणसें शेवटचें ध्येय गांठीत असतात. यास्तव गीतेंत हजारांतील एखादा मनुष्य या मार्गाकडे वळतो व जे लक्षावधी या मार्गाकडे वळतात त्यांतील एखाद्यालाच ब्रह्मतत्त्व कळतें असें म्हटलें आहे.

शेकडा नव्वद मनुष्यांचे पुरुषार्थ धर्म, अर्थ व काम हेच होत.

उद्या जर खरोखराच परमेश्वर येऊन एखाद्या गावातील लोकांना तुम्हाला मोक्ष देतो असे म्हणू लागला तर त्या ईश्वराबरोबर सुद्धा मोक्षाकरिता कोणी जाणार नाहीत. विद्यार्थी म्हणतील आमच्या परीक्षा पास होऊ द्यात. पदवीधर तरुण व तरुणी म्हणतील की आमचा आधी जम होऊ द्यात. बहुतेक प्रत्यकजण म्हणेल की ईश्वरा आम्हाला पैसे दे. कोणी म्हणेल मुलगा दे. कोणी म्हणेल बायको दे पण मोक्ष दे व आम्ही तुझ्याबरोबर येतो असे म्हणण्यास् कोणीहि तयार होणार नाही. फार काय प्रत्यक्ष तुकाराम महाराजांच्या बायकोने आपल्या पतीला असेच आशयाचे उत्तर दिल्याचे सांगतात! यावरून वाचकांनी हेच बोध घ्यावयाचा की मनुष्य स्वभाव म्हणजे मनुष्याची सामान्य प्रवृत्ति हीच की अथ जाया मे स्यात्। अथ वित्त मे स्यात्। म्हणजे मला बायको पाहिजे मुले पाहिजेत, पैसा पाहिजे आणि मला काम पाहिजे पुरुषार्थ पुरुषार्थ जो म्हणतात तो हाच होय! म्हणून श्रीकृष्णासारख्या सर्वश्रेष्ठ तत्त्ववेत्त्याला युद्धाच्या प्रसंगीच तत्त्वज्ञानाचा प्रश्न विचारणारा एक अर्जुन भेटला व दुसरा निर्वाणकाली तत्त्वपृच्छा करणारा उद्धव भेटला! पहिला अर्जुन दुसरा उद्धव व तिसरा अश्वत्थामा धर्मराज या खेरीज शिष्याशिवाय श्रीकृष्णालासुद्धा कोणी तत्त्व जिज्ञासु आढळला नाही यावरूनहि या विषयाचे अधिकारी फार थोडे असतात असे दिसून येईल.

आपल्या धर्मशास्त्रकर्त्यांना आश्रमाची व्यवस्थाहि हेच मानसशास्त्र लक्षात घेऊन केली असावी. नेम म्हणता येते ब्रह्मचर्य व गार्हस्थ्य हेच खरे संसाराचे आश्रम. प्रत्येक मनुष्य तीन ऋण घेऊन जन्माला येतो.

'जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणैर्ऋणवाञ्जायते यज्ञेन देवेभ्य प्रजया पितृभ्य स्वाध्यायेन ऋषिभ्य' म्हणून त्याने यज्ञ करून देवाचे प्रजन पितराचे व ज्ञानवान होऊन ऋषींचे ऋण फेडले पाहिजे किंवा निराळ्या तऱ्हेने बोलावयाचे तर मनुष्यलोक पितृलोक व देवलोक हे माणसाने मिळवावयाचे असतात. या लोकप्राप्तीची साधने–

'मनुष्य लोक पुत्रेणैव जय्यो नान्येन कर्मणा। कर्मणा पितृलोको विद्यया देवलोक'

पुत्र, कर्म व विद्या ही होत. याकरिता तीन आश्रम सांगितलेले आहेत. कोणत्याहि द्विजानें अनाश्रमी असू नये. 'अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकमपि द्विजः।' अनाश्रमी राहिल्यानें दोष आहे. गृहस्थाश्रमामध्यें तीन ऋणें फेडावीत व मोक्षाचा विचार नंतर करावा असेच मनूचेंहि म्हणणें आहे.

ऋणानि त्रीण्यपाकृत्य मनो मोक्षे निवेशयेत्।
अनपाकृत्य मोक्षं तु सेवमानो व्रजत्यधः॥ मनु अ. ६-३५॥
अधीत्य विधिवद्वेदान्पुत्रांश्चोत्पाद्य धर्मतः।
इष्ट्वा च शक्तितो यज्ञैर्मनो मोक्षे निवेशयेत्॥ मनु अ. ६-३६॥

वरील श्लोकात तीन ऋणें न फेडणारा अधोगतीस जातो असे सांगून पुढें ब्रह्मचर्यांत अध्ययन, गृहस्थाश्रमांत पुत्रोत्पादन व यज्ञ संपादन करून मग मन, मोक्षमार्गाकडे लावावें, म्हणजे या जबाबदाऱ्या पार पाडल्यावरच मोक्षाचा अधिकार प्राप्त होतो असे म्हटलेले आहे.

तीन आश्रम यथास्थित पार पाडून चौथ्या आश्रमाकडे वळणारे लोक फार थोडेच असतात. तीन आश्रम पार पाडणें, तीन ऋणांतून मुक्त होणें व इतकें केल्यावर ब्रह्मज्ञानाच्या विचारास लागणें ही गोष्टहि पुष्कळांना शक्य नसते. यावरूनहि मोक्षमार्गाचा अधिकारी किती दुर्मिळ आहे याची कल्पना येते.

वैदिक वाङ्मयापैकीं उपनिषद् ग्रंथामध्ये या ब्रह्मज्ञानाचा म्हणजे तत्त्वज्ञानाचा व त्याच्या अधिकाऱ्याचा विचार पुष्कळच केला आहे. मानवी अन्तःकरणाचें निरीक्षण करून उपनिषदांतील या तत्त्ववेत्त्यांनी असें ठरविलें आहे कीं तीन एषणांच्या म्हणजे इच्छांच्या पलीकडे जो गेला आहे, तोच या ज्ञानाचा अधिकारी होय! त्या तीन एषणा म्हणजे पुत्र, वित्त व लौकिक या होत किंवा विषय, वित्त व लौकिक असें म्हटलें तरी चालेल. जोंवर स्त्रीविषयी आसक्ति, द्रव्याविषयी प्रेम व लौकिकाची हाव आहे. तोंवर ब्रह्मज्ञानाची खरी जिज्ञासा त्या मनुष्याला झालेली नाही असे खुशाल समजावें. विषयाविषयीं अनासक्ति, लौकिक आणि पैसा यांच्याविषयी वैराग्य उत्पन्न होणें हें खरोखरीच फार कठीण आहे.

'एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति। एतद्ध स्म वैतत्पूर्वे

विद्वांसः प्रजां न कामयन्ते । किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्मा नोऽयं लोक इति । ते ह स्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति । ' (बृ आ.अ. ४ ब्रा. ४ मं.२२.)

आत्मलोकाची इच्छा करणारे सन्यासी, पुत्र, वित्त व लौकिक याच्या एषणा टाकून या मार्गाकडे वळतात. जगांतील विषय, वित्त व लौकिक या संबंधीच्या ज्याच्या सर्व इच्छा नष्ट झालेल्या आहेत, तेच चतुर्थाश्रमी होतात व मोक्षविचार करतात.

सर्व जग या तीन एषणातच म्हणजे इच्छांमध्येच गुरफटलेलें आहे. परमार्थाच्या मार्गात, विषय, वित्त आणि लौकिक हे मोठे खळगे असून सर्व साधक या ना त्या खड्ड्यांतच पडतात. एषणात्रयीच्या पलीकडे जाऊन शम, दम, उपशम तितिक्षा, वैराग्य व त्याग या दैवी साधनांत रंगून जाणारा मनुष्य खरोखरीच विरळा असतो ! तीन एषणांचा त्याग हा कांही सामान्य त्याग नव्हे. जगांतील विग्रह, युद्धें व मारामाऱ्या ही सर्व या एषणात्रयीमुळेंच होत आहेत. या तीन एषणा म्हणजे जगांतील त्रिविध पुरुषार्थ होत.

परमार्थ ग्रंथामध्यें माणसाचे बद्ध, मुमुक्षु, साधक आणि सिद्ध असे चार वर्ग केलेले आहेत. पैकीं सर्व जग बद्धच आहे. मुमुक्षु फारच थोडे, साधक लक्षामध्यें एखादा व सिद्ध तर कोटी मनुष्यांमध्यें एखादा असतो की नाहीं याची शंकाच आहे. इतका हा मार्ग खडतर व कठीण आहे. •

मोक्षाधिकाऱ्याविषयी श्रीमत् आद्य शंकराचार्य लिहितात.—अपरा विद्येविषयी ज्याला विरक्ति उत्पन्न झाली आहे तोच पराविद्याधिकारी होतो. आत्मविद्येला संन्यासच विहित आहे. कारण इतर आश्रमातील बंधनें तेथें नसतात. इतर आश्रमातील कर्मे न केलीं तर दोष आहे. व करूं लागलें तर चित्ताला व्यग्रता येते. शमदमादि साधनांना चतुर्थाश्रमच पाहिजे. कारण तेथें अननुष्ठाननिमित्त-प्रत्यवाय नाही व आश्रमधर्मांची व्यग्रता नाहीं. साधकानें शमदम, उपशम, तितिक्षा इत्यादि अंतरंग साधनांनीं बुद्धीची समता व चित्तशुद्धी संपादन केली पाहिजे.

"परा व अपरा अशा दोन विद्या असून त्यांच्या सहाय्यानें व अभ्युदय व

निःश्रेयस प्राप्त होतात. अन्नाचा व मनाचा संबंध आहे. म्हणून आहार-शुद्धीनेंच चित्तशुद्धी होते. साधकानें चित्तविक्षेपकारक सर्व गोष्टी त्यजाव्या. साक्षात्काराला चित्तविक्षेप बाधक होतो. वृत्तीची एकतानता सदैव राहिली पाहिजे व त्याचकरितां वागादीचा संयम सांगून योगाचें आचरणहि सांगितलेलें आहे. ( सामान्य व्यवहारांत इंद्रियसंयम पाहिजेच पण त्याहि-पेक्षां तो परमार्थात पाहिजे) आत्म्याची आराधना भक्ति, ध्यान व प्रणिधान यांनीं होते. पण तें होण्यास वृत्ति अन्तर्मुख व्हावी लागते. चित्तप्रसाद ही बाब फार मोठी आहे. चित्तप्रसादामुळें संतुष्ट असलेले योगी परंज्योतीला पाहूं शकतात."

. जगाच्या बुडाशीं म्हणजे ह्या नामरूपालीकडे कोणतें तत्त्व आहे हें जिज्ञासाबुद्धीनें जाणणें, त्याचा विचार करणें व ते सर्व सिद्धान्त ध्यानांत बागवून नेटका प्रपंच करणें हा विषय निराळा व ब्रह्म काय आहे हें समजून घेऊन त्याचा निदिध्यास लावून घेऊन तद्रूप होणें; हा विषय निराळा. जगांतील तत्त्ववेत्ते व हिंदुस्थानांतील तत्त्ववेत्ते यांमध्यें हाच मोठा फरक आहे असें समजण्यांत येतें. जगांतील तत्त्ववेत्त्यांनीं मळ तत्त्वाचा म्हणजें ब्रह्माचा शोध करण्याचा यत्न केला, व त्यांनी ते तत्त्व असें असें आहे, आपल्याला इतकें इतकें बुद्धीने कळलें असे सांगितलें. अर्थात् तें लावून सांगितलें, जवळून म्हणजे तद्रूप होऊन सांगितलें नाही. पण हिंदुस्थानांतील तत्त्ववेत्ते बहुतेक आत्मसाक्षात्कारी होते. त्यांनीं त्या तत्त्वाचा निदिध्यास लावून घेतला व ते तद्रूप झाले म्हणून त्यांचे बोल हे अनुभवाचे बोल होत असें समजतात. परंतु सर्व ब्रह्मवेत्त्यांचे ब्रह्मज्ञानविषयक सिद्धांत सारखे नसल्यामुळें आपल्या इकडील ब्रह्मवेत्त्यांनासुद्धां ब्रह्म हें कितपत कळलें होतें याची शंकाच येते. सर्वांना जर या तत्त्वाचें सारखेंच आकलन झालेलें होतें तर सूत्रकार, भाष्यकार, साधुसंत व भगवद्भक्त यांमध्यें एकवाक्यता दिसावयास पाहिजे होती. पण ती तशी नाही हे स्पष्ट आहे. वास्तव तत्त्व समजून घेणें व तत्स्वरूप होणें, मोक्ष मिळविणें हा मार्ग कांहींचे करितां सोडून देऊन तत्त्वज्ञानाचे सिद्धांत समजून घेऊन कोणत्या वृत्तीनें, कोणत्या युक्तीनें, कोणत्या बुद्धीनें, स्वतःचा, समाजाचा व राष्ट्राचा प्रपंच करावा

हेंच मुख्यत सर्वसामान्य माणसांनी शिकावयास पाहिजे ज्याचा शोध अद्याप पूर्णपणें लागलेला नाहीं, ज्याविषयी पूर्ण व स्पष्ट कल्पना नाहींत, त्या पदार्थांत न पडतां जें बुद्धीला व युक्तीला पटण्याजोगें बुद्धीच्या व शक्तीच्या आटोक्यातलें असें आहे, तेंच स्वसमाज व स्वराष्ट्र यांचें ध्येय डोळ्यापुढें ठेवून तत्त्वज्ञानातील सिद्धांत ध्यानांत बाळगून मलीन व युक्तीन नेटानें प्रपंच करण्याचा मार्गच सर्वांनी आक्रमावा हेच श्रेयस्कर आहे।

प्रस्तुत पुस्तकांतील विवेचन ब्रह्मरूप होणाऱ्या साधकांकरितां नाहीं, तर तें प्रापंचिकांकरितां आहे जे लोक अज्ञानानें, अनधिकारानें व भ्रमानें उगाच या ब्रह्ममार्गांत पडतात व फजीत होतात, त्यांना ब्रह्मविद्येचे मुख्य मुख्य सिद्धांत काय आहेत, हे येथे सांगावयाचे आहे तसेंच, गुरुकृपा व अनुग्रह, श्रद्धा व भावना, ईश्वर व त्याची भक्ति, साधु व चमत्कार इत्यादि विषयांचा ऊहापोहहि प्रस्तुत ग्रंथांत करावयाचा आहे थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ब्रह्मज्ञान व तदनुषंगिक अनेक विषय मांडून त्यांचें यथार्थ ज्ञान नसल्यामुळें लोक बुवाशाहीच्या जाळ्यांत कसे सांपडतात हे दाखविण्याकरितां हा ग्रंथ आहे

ब्रह्मज्ञान म्हणजे जगताच्या मूल तत्त्वाचें ज्ञान होय हें ज्ञान सर्व ज्ञानांत श्रेष्ठ आहे याच्या प्राप्तीला परमार्थ म्हणतात परमार्थ, ब्रह्मज्ञान, ईश्वरप्राप्ति याच्यामागें जो लागलेला असतो त्याला साधक, अधिकारी, यति, संन्यासी म्हणतात परमार्थ, ईश्वरभक्ति, ब्रह्मज्ञान हा कधींहि धंदा होऊंच शकत नाहीं. याचा जे लोक धंद्याचें स्वरूप आणतात ते लुच्चे होत या धंद्याच्या निमित्तानें जे इतरांना प्रतारित करितात, दुसऱ्याचें द्रव्य लुबाडतात व त्यास कुमार्गाला प्रवृत्त करितात, ते परमार्थ मार्गांतील कापडी नसून ढोंगी होत त्याचें जें समाजावर अवास्तव वजन व दडपण असतें, त्याची जी समाजात प्रतिष्ठा असते, त्याच्या अलौकिकपणा-विषयीं जनमनावर जी पगडा असते, तीच बुवाशाही होय किंवा परमार्थ मार्गांतील लुच्चेगिरी म्हणजे बुवाशाही होय प्रत्येक धंद्यांतील लुच्चे-गिरी म्हणजे बुवाशाही नव्हे तसेंच राजकारण व धर्मकारणादि क्षेत्रांतील अव्वलशाही, म्हणजेहि बुवाशाही नव्हे परमार्थ व ब्रह्मज्ञान येथच्या मर्यादित

क्षेत्रातील लुच्चेगिरी म्हणजेच बुवाशाही होय. न्यायालये, कचेऱ्या व निर्बंध (कायदे) इत्यादि मार्गांनी इतर क्षेत्रातील दोष नष्ट करिता यतात पण परमार्थ व ब्रह्मज्ञान हें क्षेत्र असे आहे की तेथ कायदा पोचत नाही व लोकाना या विषयातील ज्ञान येताचे असत म्हणूनच ते बुद्धिहत होतात पारमार्थिक क्षेत्रातील बुद्धिहत्या थांबावी हा या ग्रंथाचा उद्देश आहे तो कितपत साधला आहे हे वाचकानीच ठरवावयाचे आहे

---

प्रकरण २ रे

## ब्रह्म व जगत्

जगाचे आदिकारण मग ते ब्रह्म असो, ईश्वर असो, त्याचे सम्यक् ज्ञान अद्याप कोणालाहि झालेले नाही, असे गेल्या प्रकरणात म्हटले, त्याचा प्रथम थोडा विचार करू वेदातील तत्वज्ञानाचा विचार केला तर असे दिसते की ऋग्वेदातच (संहितेत) कुठें कुठें तत्वज्ञानाचे इतस्तत काही विचार विखुरलेले आहेत विश्वाचे सम्यक् स्वरुप ऋग्वेदातील मंत्रद्रष्ट्याना ज्ञान झाले होते असे दिसत नाही पृथ्वी, अतराल व आकाश हे तीन लोक त्यावेळी मानले होत, व द्यौ, वरुण, मित्र, सूर्य, सविता, विष्णु अर्यमा, उषा, चद्र, मातरिश्वा, इद्र, मरुत् इत्यादि देवता त्या काली होत्या सृष्टी ही कोणा एका कर्त्याने घडविली का ती आपोआप उत्पन्न झाली, या संबधाचे दोन्ही प्रकारचे विचार ऋग्वेदात आढळतात यापक्षा सृष्टीच्या उत्पत्ती-संबधाने काही निराळचा कल्पनाहि सागितलेल्या दिसतात

ऋग्वेदात सुमारे पचवीस ठळक ठळक देवता आहेत त्व तीत काही अनुरागी भाळणाऱ्या, काही गम्याचक, काही दस्युघातक असाहि आहेत देवताच्या सगुण स्वरूपाच्या कल्पना ऋग्वेदात पुष्कळ आहेत काही कारणानें वैदिक ऋषींना अनेक देवता मानणे हे बरे वाटले नाही असावें त्यानी एकेश्वरत्वाची कल्पना परिणत केली काही ठिकाणी त्या

ईश्वरानें सृष्टी उत्पन्न केली तर कांहीं ठिकाणी ती स्वयंभ आहे, असेहि विचार त्यांनी प्रदर्शित केले आहेत. नासदीय सूक्त, हिरण्यसूक्त व पुरुषसूक्त यामध्येंच विशेषत. सृष्टीच्या उत्पत्तीसबंधाचे व तत्त्वज्ञानाचे इतर विचारहि आढळतात. ऋग्वेदातील ऋषीना गोंधळात टाकणारे अनेक तात्त्विक प्रश्नहि दिसतात. त्यांची उत्तरे त्यांनी दिलेलीं नाहीत. पण प्रश्न मात्र उत्पन्न करून ठेवलेले आहेत. पुष्कळ नीतिकल्पनांचा उहापोह ऋग्वेदामध्यें थालेला आहे.

तत्त्वज्ञानाचा विचार वरीलप्रमाणे जो थोडाबहुत आहे तो ऋग्वेद संहितेमध्ये आहे. यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद यांमध्यें तो जवळ जवळ नाहीच. वेदांतील मंत्रद्रष्टे ऋषी हे भाविक, साधेभोळे, प्रापंचिक असे दिसतात. ते आपल्या भोंवती अतिमानुष अशा देवता व शक्ति या सर्वत्र पाहतात. देवतांची अवकृपा होऊ नये व आपणाला दु:ख प्राप्त होऊं नये अशा इच्छेनें ऋग्वेदातील ऋषी हे देवतांच्या सारख्या स्तुत्या करीत आहेत असा भास होतो. देवतांची स्तुति करून, त्यांना लोभवून, त्यांना द्रव्यें देऊन संतुष्ट करण्यांत त्या कालचे ऋषी मग्न झालेले दिसतात!

वेदानंतर तत्त्वज्ञानाचे प्रमाणग्रंथ म्हणजे उपनिषदें होत., उपनिषदांमध्यें तत्त्वज्ञानाचे अनेक विचार सिद्धांत म्हणून मांडलेले आहेत. संहितावाङमयामध्यें इतिहास, कथा, दंतकथा, प्रार्थना, गीतें, कवनें इत्यादि आहेत. परंतु उपनिषदांत विद्वत्तायुक्त प्रौढ भाषा, ज्ञानाचें तेज, तज्जन्य आनंद, सांगितलेल्या सिद्धांताविषयीं आत्मविश्वास, तर्क व स्फूर्ति इत्यादि सर्व आढळतात. उपनिषदें हीं प्राय: तत्त्वज्ञानप्रधान असल्यामुळें विषयाचो विवेचनपद्धति मोठी सरस आहे. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत हिंदुलोक उपनिषदांना प्रमाण मानतात. हीं उपनिषदें अनेक असली तरी मुख्यत: दहाच उपनिषदें प्रमाणभूत आहेत. सर्व उपनिषत्कर्ते निरनिराळे असल्यामुळें प्रत्येकाचें स्वतंत्र मत दिसतें. हिंदुस्थानांतील तत्त्वज्ञानविषयक विविध पंथांना उपनिषदांचाच आधार आहे. अर्थात् त्यांमध्यें ब्रह्म, ईश्वर, अविद्या, जीव, कर्म, पंचकोश, मरणोत्तर आत्म्याची स्थिति वगैरे अनेक विषय आलेले आहेत. ब्रह्मसूत्रें ही उपनिषद् वाक्यांचा समन्वय करतात. आणि

गीता ही उपनिषदांचाच पुष्कळ अंशी अनुवाद करते प्राचीन ऋषींना ज तत्त्वज्ञान स्फुरले त्याच्यापुढ अद्याप जगातील तत्त्वज्ञानाची मजल गेलेली नाही ते त्याच बुद्धिवैभव पाहून अभिमान तर वाटतोच पण त्याच्याबद्दल अत्यत आदरहि उत्पन्न होतो कारण ज्या वेळेला जगातील इतर मानव समाज पूर्ण मनुष्यस्थितीलाहि आलेले नव्हते, अशा वेळी वैदिक आर्यांनी समाजाच्या विविध अगावा विचार करून तत्त्वज्ञानाचे श्रेष्ठ सिद्धात सागितले, ही खरोखरीच अभिमानास्पद गोष्ट होय।

उपनिषदातील तत्त्वज्ञानाचा परिचय करून दणं ह येथ अप्रस्तुत आहे कारण त कार्य पुष्कळांनी आजवर केल आहे उपनिषदातील ऋषींनी जें तत्त्वज्ञान म्हणून सागितल आहे त्याचा आढावा घेतल्यास जगताच्या आदि कारणाचा पूर्ण व समाधानकारक असा शोध त्यानाहि लागल्याच दिसत नाही उपनिषदात युक्तिवाद नाही, अनुमान नाही, सर्व सिद्धातवाद आहे सूत्ररूपान, कथाना पऊन, दृष्टात दऊन, थोडें सवादाचाहि आश्रय करून गहन विषय समजून सागण्याचा यत्न फार उत्तम तऱ्हेने कला आहे उपनिषदातील वियक्त सवाद असे आहेत की तो प्रश्नोत्तर पाहून त्या वेळच्या ज्ञानाची कल्पना येत त्या वेळच्या वादविवादात साक्षात्कारी ब्रह्मवेत्यानी म्हणून जी उत्तर दिली आहत ती उत्तर आजकालचा एखादा पडितहि देऊ शकेल अस वाटत त्या काळी साधन बताची, भौतिक शास्त्राची मदतहि अपूर्ण, अस असल्यामुळें त्याचे ज्ञान त्या कालाच्या मानान पुष्कळच उच होत असे म्हटल पाहिजे

प्रश्न आहे तो असा की उपनिषदातील ऋषींच ज्ञान ह बुद्धिनिष्ठ होत का साक्षात्कारनिष्ट होत ? आपली बुद्धि इतकी चालत, आपल्याला तर्कान इतक इतकेच जाणता येते, असं त्यानी काही ठिकाणी म्हटलेले आहे तर्काच्या सहाय्यान हाणार ज्ञान व साक्षात्कारजन्य ज्ञान यामध्यें फरक आहे उपनिषदात ज्याची ज्याची नाव ज्ञानी म्हणून पुढें आलेली आहत, त्या सर्वांना ब्रह्मतत्त्वाचा खरोखरीच साक्षात्कार झाला होता की नाही याबद्दल शका वाटते साक्षात्कारी माणसाच ज्ञान ह अस पाहिजे की त अतिम तत्त्वाच्या स्वरूपालाच जाऊन भिडाव। तस त नसल्यामुळ उप

निपदातील सर्व ऋषी हे साक्षात्कारी नव्हते तर ते महाबुद्धिमान् होते. त्या काळात ते श्रेष्ठ ज्ञानी होते, असेच म्हणणे योग्य वाटते

उपनिषदातील काही ऋषींनी तर प्राजलपणाने आपले अज्ञान कबूल केले असून काही ठिकाणी तसे प्रश्नहि आपल्यापेक्षा जाणत्याना विचारले आहेत. पण सामान्य लोकाची समजूत मात्र अशी की सर्व वैदिक ऋषी हे साक्षात्कारी होते, म्हणून पडितानीहि उपनिषदातील सर्व वाक्याची ओढा-ताण करून एकवाक्यता करण्याचा प्रयत्न केला आहे साक्षात्काराच्या अगी आदि तत्त्वांच्या प्रत्यक्ष दर्शनाची शक्ति आहे व तसा साक्षात्कार आपणास झाला आहे असे सागणारे लोक आजहि आढळतात[1] साक्षात्कार झाला असे म्हणणारे बुवा व महाराज व त्याच्यावर अधश्रद्धा ठेवणारे त्याचे भक्त याच्याशिवाय इतर कोणीहि त्याना विश्वाचे आदि कारण कळले आहे असे समजत नाहीत, हे एकपरी बरे आहे

उपनिषदामध्ये विश्वोत्पत्तीचा विचार आला असून पूर्वी काही नव्हते, ही सृष्टि अनादि आहे, परमेश्वराने ती निर्माण केली, अशी विविध उत्तरे दिलेली आहेत ब्रह्म, आत्मा, ब्रह्मात्मभेद, त्याच्या प्राप्तीचे मार्ग, मरणोत्तर जीवाची स्थिति वगैरे विषय उपनिषदात असून जगाचे आदि कारण ब्रह्म आहे, ते निर्गुण आहे, ते सर्वसत्ताधीश आहे, विभु आहे व व्यापक आहे, असे म्हटले आहे जगाचे आदि कारण अशा तऱ्हेचे असले तरी त्यासबधी मनुष्यमानाचे कर्तव्य काय हा प्रश्न उपस्थित होतोच कारण एकदा विश्व निर्माण झाल्या-वर त्याचा जर मूळ कारणाशी काही सबध राहात नसेल तर शुद्ध जिज्ञासे-शिवाय ते जाणण्याचे दुसरे काही कारण राहात नाही परतु उपनिषदामध्ये ब्रह्माची उपासना करावी व उपासनेने ज्ञान प्राप्त करून घ्यावे, असेहि म्हटले आहे

ब्रह्माचे जे स्वरूप वर्णन केले आहे ते ग्रहण करणेच मुळी कठिण जाते अर्थात् त्याचे सम्यक् ज्ञान होणे व उपासना घडणे हे किती तरी कठीण वाटते तथापि ब्रह्मसाक्षात्काराचा अनुभव सुषुप्तीमध्ये येतो व तो घ्यावा असे ठिकठिकाणी सागितले आहे गाढ निद्रेचे वेळी आत्मा ब्रह्मस्वरूपा-प्रत जातो, पण तो पुन्हा ,ससारात पडतो म्हणून निराळे यत्न करून आत्मप्राप्ति सपादन करावी असे उपनिषदाचे मत आहे

जगाचे मूळ ब्रह्म आहे, तर मग सर्व प्राणी नित्य असे जर आहे तर या सृष्टीत आपल्याला जे नानात्व भरलेले दिसते त्याची वाट काय ? या प्रश्नाचे उत्तर उपनिषदांतहि माया किंवा आभास हेच आहे. माया शब्द उपनिषदांतहि आलेला आहे. एकाचे अनेक का व्हावे, शुद्ध ब्रह्मापासून ही नामरूपात्मक सृष्टि कशी उत्पन्न झाली, याचे समर्पक उत्तर उपनिषदांतहि नाही. एकापासून अनेक कसे झाले? या क्लिष्ट प्रश्नाचे उत्तर देण्याकरिता उपनिषदामध्ये मृत्तिका व घट, सुवर्ण व अलंकार, लोह व त्याचे विकार इत्यादि अनेक दृष्टांत दिलेले आहेत, पण ते दृष्टांत समाधानकारक वाटत नाहीत. आजची ज्ञानाची साधने, शोध व प्रगति लक्षात घेता उपनिषदांतील विचारसरणी सर्वस्वी बिनचूक व समाधानकारक अशी वाटत नाही. त्या काळात उपनिषदांतील कांहीं ऋषींचे ज्ञान श्रेष्ठ होते यात शंका नाही. पण ते पूर्णत्वाला गेले होते असे म्हणवत नाही. उपनिषदांवरूनहि जगाच्या आदि कारणाचा शोध अद्याप पूर्णपणे लागलेला नाही, असे म्हणता येते.

आजपर्यंतचा मानव जातीचा इतिहास पाहिला तर असे दिसून येते की त्या त्या परिस्थितीप्रमाणे त्या त्या मानव समाजात जगण्याकरिता तत्त्वज्ञान हे उत्पन्न केले. मनुष्य समाजाच्या बाल्यावस्थेत असे दिसते की जिकडे तिकडे मानव जातीच्या टोळ्या स्थिर होण्याकरिता भटकत होत्या व मारामाऱ्याहि करीत होत्या. शिकार करणे व त्यावर जगणे, धाडशी वृत्तीने जगणे, आज इकडे तर उद्या तिकडे अशा पद्धतीने गाई, मेंढ्या धरून स्थिर होण्याचा यत्न करणे, असे करीतच मनुष्य समाज स्थिर झाला आहे. अर्थात् भटकेपणा, स्थैर्य व स्वास्थ्य अशी जी जी समाजाची स्थिति असेल, त्या त्या स्थितीला अनुरूप असे तत्त्वज्ञान वेळोवेळी उत्पन्न झालेले आहे.

माणसाचे मनात विचार असतात, अर्थात् समाजाचे मनहि विचारी असते. समाजाच्या मनात जे जे विचार येतात त्यातूनच तत्त्वज्ञान उत्पन्न होते. अर्थात् ते तत्त्वज्ञान कुणी तरी त्या त्या काळचा मोठा मनुष्य बोलतो. त्या मोठ्या माणसाच्या साध्या बोलण्यालासुद्धा सिद्धांताचे स्वरूप येते व लोक ते खरे मानू लागतात. वैदिक आर्यांचे तत्त्वज्ञान, बुद्ध व ख्रिस्त यांचे

चार्य यांच्या शारीरभाष्याचा आधार घेतलेला आहे श्रीमत् आचार्य हे अद्वैत सिद्धांत प्रस्थापित करणारे आहेत महाराष्ट्रातील पुष्कळ विद्वान् व समजस लोक या मताचे अनुयायी आहेत महाराष्ट्रातील सर्व प्रसिद्ध असे साधुसंतहि भक्तीपुरता द्वैत संबध मान्य करीत असले तथापि शेवटी अद्वैत सिद्धांतालाच ते मान देतात बृहन्महाराष्ट्रापुरते बोलावयाचे तर तो अद्वैत मतानुयायी आहे असे म्हटल्यास फारसे वावगे होणार नाही माध्व, रामानुज व वल्लभ सांप्रदायी लोकहि महाराष्ट्रात बरेच आहेत त्यामध्ये विद्वान् व समजस अशा लोकांची सख्याहि काही कमी नाही जीव, जगत् आणि ब्रह्म अथवा जीव, जगत् आणि ईश्वर यांचा संबध काय हाच काय तो सर्वांमध्ये मतभेदाचा प्रश्न आहे पुनर्जन्म, कर्म, पचकोश मरणोत्तर स्थिति, चित्ताची उभारणी व सहारणी या बाबतीत मात्र सर्व आचार्यांची बहुतेक एकवाक्यता आहे) आचार्यांमधील हे मतभेद या पुस्तकात देणे शक्य नाही बृहन्महाराष्ट्रावर अद्वैत मताचीच छाप पुष्कळ आहे म्हणून श्रीमत् शकराचार्यांच्या शारीरभाष्याच्या आधारच पुढील सकल्पनात्मक विचार देत आहे

उपनिषदातील वेदवाक्याचा समन्वय करण्याकरिता ब्रह्मसूत्रे उत्पन्न झाली आणि त्या ब्रह्मसूत्रावरील शारीरभाष्यामध्ये उपनिषदे व ब्रह्मसूत्रे यांचे सार अत्यत तर्कशुद्ध व शास्त्रशुद्ध पद्धतीने माडलेले आहे

शारीरभाष्यात वेदांतातील निरनिराळी प्रमेये इतस्तत विषयानुरोधाने योग्य अशी सांगितलेली आहेत प्रत्यक विषय अगदी प्रकरणवार एकापुढे एक असा मुळीच आलेला नाही सूत्रार्थ सागणे, उपनिषद् वाक्यातील विरोधपरिहार करणे, स्वपक्षाचे समर्थन व परपक्षाचे खडन करिताना वेदांताच्या अनेक सिद्धांताचा आचार्यांनी निरनिराळ्या ठिकाणी पुरस्कार केलेला आहे म्हणून ब्रह्मसूत्र भाष्याची विषयवार विभागणी करून एकेक विषयावरील सर्व ठिकाणी आलेली वाक्ये एकत्र केली पाहिजेत हे काम मोठे किचकट, त्रासदायक, बराच वेळ घेणारे असे आहे शिवाय ब्रह्मसूत्र भाष्याची ज्याने अनेक पठणपाठणाचे निमित्ताने पारायणे केली आहेत असाच अधिकारी मनुष्य हे साक्षेपाचे कार्य करण्यास हवा ईश्वरकृपेने परमहंस परिव्राजक श्री केवलानंद सरस्वती (गुरुवर्य नारायणशास्त्रीबुवा मराठे)

भिन्न भिन्न नाही त सत्य व अनत असल्यामुळे सर्वत्र एकच आहे ब्रह्मा वाचून जगात दुसरे काही नाही

सर्वस्यहि जनिमतो वस्तुजातस्य जन्मादि ब्रह्मणो भवति इति निर्धारितम् । (शा भा अ ३ पा २ सूत्र ३२)

भोक्ता, भोग्य ही सर्व ब्रह्मच होत ज्ञान, विज्ञान व प्रज्ञान स्वरूप अस ते ब्रह्म आहे ( मिठाचा खडा अतरबाहय खारट, गुळाचा खडा अतर बाहय गोड, कापराची वडी अतरबाहय सुगधित, तसेच) ब्रह्म ह अतर-बाहय ज्ञानमय आहे ते कूटस्थ, नित्य व विज्ञानमय असल्यामुळे त्याचा उच्छेद होत नाही जगात जें जें म्हणून उपलब्ध होते त ब्रह्मज्योतीमुळेच होय ब्रह्म ह इतराना प्रकाशक आहे, इतरामुळें त प्रकाशित होत नाही चैतन्यरूप ब्रह्मामुळेच अखिल जगत् भासते त सुखविशिष्ट, ज्ञानविशिष्ट, आनद-विशिष्ट, अजर, अमर, सुखरूप व एकरस अस आहे निष्कल, निष्क्रिय, शात, निरजन, अस्थूल, अनणु, अदीर्घ, अन्हस्व अस ते आहे समस्त उपाधिरहित व निर्विकल्प असे जगाचे मूलतत्त्व असून तच ब्रह्म आहे ते सर्वात्मक, सर्व-शक्तिमान, नित्य व सर्वव्यापी अस आहे

वाड्मनसातीत अविषयात पाति प्रत्यगात्मभूतं नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्त-स्वभाव ब्रह्म । अ ३ पा २ सू २२+

ब्रह्म ह सापडण्यास कठीण आहे, त सर्वगत असले तरी त्याचे स्थान मनुष्यहृदयात आहे मनुष्यहृदयाच्या अपेक्षेनें परब्रह्माला अगुष्ठमात्र असे म्हटले आहे याच्या प्राप्तीने अमृतत्व मिळत त चराचराच बीज आहे

चराचर बीजस्य ब्रह्मण सर्वात्मकस्य । अ १ पा १ सू २४.

जें ज्यापासून उत्पन्न होत त त्यातच लीन होते म्हणून ब्रह्म हच या सृष्टीच कारण होय[1] परमात्मा हा सर्व विकारजाताचा उपसहार करणारा आहे ह ब्रह्म पूर्ण आहे अर्थात् पूर्णापासून उत्पन्न होत ते पूर्ण व त्यातून वजा केले तरी बाकी पूर्णच राहात सर्व जीव या परब्रह्मान अधिष्ठित आहेत ह ब्रह्म कधी बदलत नाही, ते मनापेक्षा वेगवान् आहे ते न धावता सर्वांच्या पुढें जाते

+टीप—हे आकडे ब्रह्मसूत्र भाष्यातील अध्याय, पाद व सूत्र याचे आहेत अस समजावे

ते दूरही आहे जवळहि आहे ते निष्पाप आहे व कपहि पावत ते विश्वाच्या आंतहि आहे व बाहेरहि आहे ते स्वयंभू आहे श्रोत्राचे श्रोत्र मनाचे मन, वाचेची वाचा प्राणाचा प्राण असे ते आहे ज्याच्या आश्रयाने इंद्रियें काम करतात, पण ती कोणी कल्या त्याला जाणत नाहीत ब्रह्म हे इंद्रियांना अविषय आहे तथापि ब्रह्म जाणणे हाच पुरुषार्थ होय।

ब्रह्म हे जाणलेले व न जाणलेले या पलीकडचे आहे ज्याच्या सत्तेने सर्व जाणता येते, त्या मूळ सत्तेला कोण कसा जाणू शकेल?

ब्रह्म जर अविषय आहे तर ते शास्त्राला विषय कसे होते? याचे उत्तर असे की शास्त्र हे कसा असा ते हेच ब्रह्म आहे ते असे असे जाणा असे न सांगता आत्म्याशी अभिन्न असलेले ब्रह्मतत्त्व ज्या अविद्येमुळें म्हणजे अज्ञानामुळें कळत नाही त्या अज्ञानाची निवृत्ति करण्याकरिता शास्त्र आहे अज्ञान-निवृत्ति हेच शास्त्राचे प्रयोजन होय।

ब्रह्म हे शास्त्रसिद्ध आहे ते सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् असल्यामुळें वेदानाहि अगोचर आहे तर्काचा येथे प्रवेश नाही ब्रह्मासारख्या अगम्य विषयात तर्काचा प्रवेश नाही

ब्रह्म हाच खरा जाणण्याचा विषय आहे कारण तेच या जगताचा आधार आहे सर्व वेदांत वाक्याचे पर्यवसान ब्रह्मज्ञान व्हावे एतदर्थ आहे

ब्रह्म हें आकाशाप्रमाणे सर्वगत असल्यामुळें त्याचे जाणे येणे संभवत नाही ते सर्वत्र असले तरी अविद्यानाशाशिवाय त्याचे स्वरूप कळत नाही ते इंद्रियग्राह्य नाही मन व वाणी यापलीकडचे आहे म्हणूनच ते सांगता येत नाही, ऐकता येत नाही व जाणताहि येत नाही ब्रह्म सांगणारा, ऐकणारा व जाणणारा हा एक आश्चर्यच समजला पाहिजे

अविद्यानिवृत्तीचे साधन ब्रह्मज्ञान हेच होय। त्या ज्ञानामुळें शोक व मृत्यु हे नष्ट होतात या विज्ञानाशिवाय अमृतत्वाची म्हणजे मोक्षाची प्राप्ति नाही सर्व आचार्यांच्या मते ज्ञानानेच मोक्ष होतो असा सिद्धांत नित्य शुद्ध बुद्ध स्थितीत असणे हेच मोक्षाचे स्वरूप होय। हा मोक्ष आनंद देतो, कर्मक्षय करतो व अभय देतो मोक्ष हा कर्मसाध्य नाही ज्ञानादेव तु कैवल्यम् असाच सिद्धांत आहे

या ब्रह्मज्ञानामध्ये नियोग अथवा प्रेरणा नाही. द्वैत प्रपंचाचा प्रविलय केल्याशिवाय ब्रह्मज्ञान नाही अविद्याध्यस्त हा जो कार्यप्रपंच ब्रह्मावर भासतो, त्याचा ज्ञानाने निरास करणे म्हणजेच प्रविलय होय.

ब्रह्म हे जगाचे निमित्त व उपादान कारण आहे मनुष्याच्या साधु कर्माने ब्रह्म मोठें होत नाही व असाधु कर्माने ते लहानहि होत नाही सर्व काली व सर्व स्थली एका स्वरुपात राहाणारे असे हे तत्त्व आहे सत्य, ज्ञान, अनंत, आनंद, अजर अशा तऱ्हेच्या विविध विशेषणावरून सर्व संसारधर्म ज्यापासून निवृत्त झालेले आहेत असे ते तत्त्व आहे ब्रह्म हे परिणामी नित्य आहे

परब्रह्माची सत्ता ही पारमार्थिक सत्ता होय जगाची व्यावहारिक सत्ता, स्वप्न, रज्जु–सर्प, शुक्तिरजत यांची सत्ता प्रातिभासिक होय परमार्थावस्थेमध्ये सर्व व्यवहाराचा अभाव असला तरी ब्रह्मदर्शन होईपर्यंत हा सर्व प्रपंच व्यवस्थित असतो म्हणून व्यवहारावस्थेमध्यें ईश्वर, जीव, भोक्ता, भोग्य आणि इतर व्यवहार हे श्रुतींनीच मान्य केले आहेत म्हणून ब्रह्मज्ञान होईपर्यंत सर्व व्यवहार सत्य आहेत कोणत्याहि स्थितीत जो अर्थ अगदी एकरूपानें असतो तोच परमार्थतः खरा असतो, व तसेच ब्रह्म आहे.

## जगत् हें सत्य कीं मिथ्या ?

( जगताच्या मूलतत्त्वाचे स्वरूप येथवर पाहिले आता जें दृश्य जगत् आपणास दिसते ते सत्य की मिथ्या हे पाहू श्रीशंकराचार्यांनी जगत् हे मिथ्या म्हणजे खोटें, अभावरूप, भ्रमात्मक असे मानलेले आहे असा समज आढळतो, परन्तु तो चुकीचा आहे आचार्यांनी तीन सत्ता मानलेल्या आहेत. त्या व्यावहारिक, पारमार्थिक व प्रातिभासिक या होत ! भ्रमापेक्षा स्वप्न सत्य, स्वप्नापेक्षा जागृतींतील अनुभव सत्य, अर्थात् त्यापेक्षा ब्रह्मानुभव सत्य होय.

वंध्यापुत्र, खपुष्प, शशश्रृंग यासारखें जगत् नाही कारण हे पदार्थ जगात मुळी नाहीतच खपुष्पादिपेक्षा शुक्तिरजत, रज्जुसर्प, मृगजल याना सत्यांश अधिक आहे कारण भ्रमालासुद्धा जे अधिष्ठान पाहिजे ते येथें

आहे सर्पाला रज्जु, रजताला शुक्ति व पुरुषाला स्थाणु हे मूळ आहेतच, त्याशिवाय भ्रम शक्य नाही

व्यावहारिक सत्तेत पदार्थ प्रत्यक्ष अनुभवाला यतातच त्या दृष्टीने पंच-महाभूत ही सत्य असून ब्रह्माला त्या सत्याच सत्य असें म्हटलेले आहे शांकरभाष्यात शशविषाण, रज्जुसर्प इत्यादि दृष्टांत निराळ्या धोरणाने मधून मधून पुष्कळ ठिकाणी आलेले असले तरी त्याचा अर्थ जगत् हे मिथ्या अर्थात् खोटे म्हणजे अभावरूप असा मुळीच नाही

*नामरूपात्मक जगताला वेदांत्यांनी अनिर्वचनीय असे म्हटले आहे* म्हणजे जग सत्‌हि आहे व असत्‌हि आहे ब्रह्माच्या दृष्टीने ब्रह्माहून अभिन्न म्हणून जग सत्च आहे परंतु अधिष्ठान सोडून जर ब्रह्माचा विचार केला तर ते असत् आहे अलंकार हे सुवर्णाशी अनन्य म्हणून सत्च आहेत पण सुवर्ण सोडल्यास म्हणजे आधार सोडल्यास ते असत्च ठरतात अर्थात् पारमार्थिक दृष्ट्या जग हे ब्रह्मावर भासते म्हणून सत् आहे म्हणजे जगाला ब्रह्माहून स्वतंत्र अस्तित्व नाही

व्यावहारिक दृष्ट्या हें विश्व खरें असल तरी पारमार्थिक दृष्ट्या तो भ्रम आहे पण भ्रमाच्या कल्पनेला तरी काही आधार पाहिजेच कल्पना सुद्धा *आधाराशिवाय कशी निर्माण होईल ? रज्जूच्या ठिकाणी सर्प भासणे* व शिंपीवर रुप्याचा भास होणे याला एक पाहणारा निराळा लागतो परंतु भ्रमाचे हे सर्व दृष्टांत ब्रह्मविचार करताना लागू पडत नाहीत कारण पाहणारा जर ब्रह्माहून अन्य नाही तर भ्रम कोणाला आणि कशाचा होणार? अर्थात् हा भ्रम मायेमुळें होतो म्हणजे ब्रह्माच्या ठिकाणी जगत् सुद्धा मायेने भासते, असे उत्तर वेदांती देतात निर्गुण अशा परब्रह्मात मुळारंभी इंद्रियास दिसणारा हा जगताचा देखावा का दिसू लागला? किंवा परमेश्वराने ही जड सृष्टी केव्हा व का उत्पन्न केली, याचे उत्तर वेदांत्यांना नीटसे देता येत नाही म्हणून ते म्हणतात की हे जग अनादि आहे, जीव अनादि आहे व त्याचे कर्म अनादि आहे तात्पर्य, जग हे अनादि असल्यामुळें व्यावहारिक सत्तेमध्यें तें खरे आहे, असे समजणे भाग आहे जगन्मिथ्या याचा आचार्यकृत अर्थ हाच की, ज्याला ब्रह्मज्ञान झाले त्याला तें झाल्यानंतर

हें जगत् खोटें आहे आणि खोटें याचा अर्थहि हाच कीं परमसत्य माहीत झाल्यानंतर त्याच्या खालोखाल असलेलीं इतर सत्यें उपेक्षणीय म्हणजे असत्य होत. तात्पर्य ब्रह्म सत्य आहे म्हणून त्याच्या अपेक्षेने जग मिथ्या आहे, इतकेंच.

शबल ब्रह्मापासून ही पंचभूतात्मक सृष्टि झाली असें वेदांती मानतात. शबल ब्रह्म म्हणजे मायायुक्त ब्रह्म. त्यालाच ईश्वर म्हणतात. प्रथम भूतसूक्ष्में उत्पन्न झालीं. त्यांच्या सत्त्वांशापासून पंचज्ञानेंद्रियें, राजस अंशापासून पंचप्राण, आणि तामस अंशापासून कर्मेंद्रियें झालीं. भूतसूक्ष्मांच्या मीलित सत्त्वांशापासून मन, बुद्धि, चित्त व अहंकार हीं उत्पन्न झालीं. त्याचप्रमाणें या भूतसूक्ष्मांचें विशिष्ट प्रमाणांत मीलन होऊन ही सर्व भूतभौतिक सृष्टि उत्पन्न झाली. अशी ही सृष्टीच्या उत्पत्तीची सांख्यांची प्रक्रिया वेदांत्यांनीहि मान्य केलेली आहे.)

---

प्रकरण ३ रें : :

# ईश्वर व त्याची अविद्या

(गेल्या प्रकरणांत विश्वाच्या मूल कारणासंबंधी व जगतासंबंधी वेदांती काय म्हणतात हें सांगितलें. प्रस्तुत प्रकरणांत वेदांत्यांना ईश्वर कां मानावा लागतो, त्याचें कार्य काय, प्रयोजन काय, वगैरे प्रश्नांची उत्तरें दिली आहेत.)

जगाचें मूळ केव्हांहि एकच असणार. तें कारण ज्या स्वरूपाचें असेल त्याच स्वरूपाचें त्याचें कार्यहि संभवणार. वस्तुतः कार्य व कारण यांमध्यें अनन्यत्व असतें. कार्य हें कारणांत लीन असतें. याला सत्कार्यवाद म्हणतात. ब्रह्मापासून जग उत्पन्न होतें, असें मानलें तर ब्रह्म विकारी ठरतें. (ती आपत्ति टाळण्याकरितां वेदांत्यांनीं उपाधिविशिष्ट व उपाधिविवर्जित अशीं ब्रह्माचीं दोन रूपें मानलीं आहेत.) श्रुतिवाक्यांपैकीं पुष्कळ वाक्यें ब्रह्माच्या निर्गुण व सगुण स्वरूपाची चिकित्सा करतात. शुद्ध ब्रह्माला

शबलत्व येतें. मायेचा स्वीकार म्हणजेच शबलत्व. जरी स्थावरजंगम इत्यादि सर्व पदार्थांमध्यें एकच परमेश्वर आहे, तथापि त्या त्या ठिकाणी असणाऱ्या चित्तोपाधि–विशेष–तारतम्यामुळें कूटस्थ, नित्य, एकरूप जो आत्मा त्याच्या ठिकाणीहि तरतम भावाने उपाधीमुळें ऐश्वर्य व शक्तिविशेष हीं आढळतात. उपाधियुक्त ब्रह्म म्हणजे ईश्वर व निरुपाधिक ब्रह्म हेंच मूलत व आहे.

मृत्तिका व सुवर्ण ही जशी घट व अलंकार यांची उपादान कारणें आहेत, त्याचप्रमाणें सर्वज्ञ ईश्वर हा जगताचें उपादान कारण आहे. उत्पन्न झालेल्या जगताचें नियंत्रण हें ईश्वराकडेच आहे. तें तो सहज लीलेनें करतो. जगताचा लयहि ईश्वरांतच होतो. जारज, स्वेदज, अंडजादीच्या लयाचें कारण जसें पृथ्वी आहे, तसेच ईश्वर हा जगाच्या लयालाहि कारणीभूत आहे.

परमेश्वराने अमःप्रभृति सृष्टि उत्पन्न केली व ती सर्व स्वतःशिवाय कशी राहील ? या विचारानें त्याने तींत प्रवेश केला. परमेश्वरावांचून भूत, वर्तमान व भविष्य अशा सृष्टीचा कोणी नियंता नाहीं. अग्नि, वायु व सूर्य इत्यादींनीं युक्त असणारें हें जगत् त्या परमेश्वराच्या प्रशासनामुळेंच आपापल्या व्यापारामध्यें व्यापृत आहे.

नहि अन्यः परमेश्वरात् भूतभव्यस्य निरंकुशं ईशिता (१।३।२४)+

प्रशासन हें पारमेश्वर कर्म होय. द्यौ, पृथ्वी, अंतरिक्ष यांचें स्थान ईश्वर होय. गारुड्याला जशी स्वतःच्या मायेची बाधा (ती खोटी असल्यामुळें) होत नाहीं तशीच ईश्वरालाहि स्वतःच्या मायेपासून कांहीं बाधा होत नाहीं. कारण तो तिजपासून अगदी अलिप्त असतो. ईश्वरपर अनेक श्रुतिवाक्यें असली तरी त्या सर्वांनी एकच ईश्वर मानला आहे. उपाधि–भेदाने भेदनिर्देश असला तरी स्वरूपतः मुळींच भेद नाहीं.

यथा स्वयं प्रसारितया मायया मायावी त्रिष्वपि कालेषु न संस्पृश्यते, अवस्तुत्वात् । एवं परमात्मापि संसारमायया न संस्पृश्यते । २।१।९

न उपभोगगंधोऽपि शक्यः ईश्वरस्य कल्पयितुम् । १।२।८

सगुण व निर्गुण असे श्रुतीनें ब्रह्माचे दोन भेद कल्पिले आहेत उपाधि–युक्त सगुण ब्रह्म तो ईश्वर होय ! व उपाधि–विवर्जित जें तत्त्व तें निर्गुण

+ टीपः—आंकडे–अध्याय, पाद व सूत्र यांचे आहेत.

ब्रह्म होय। सगुण ब्रह्म हे सवितृमंडळामध्ये आहे, तसेच ते अन्यत्रहि आहे या ईश्वराला विभु, सर्वभासक, प्राज्ञ, परमात्मा असेहि म्हटलेले आहे प्राज्ञाच्या म्हणजे ईश्वराच्या ज्ञानाने शोकविच्छेद होतो असे तज्ज्ञ म्हणतात

प्राज्ञविज्ञानाद्धि शोकविच्छेदः इति वेदान्तसिद्धान्त ।।१।४।६

परब्रह्म व अपरब्रह्म असे ब्रह्माचे दोन भेद आहेत त्यातील अपरब्रह्म हे मनोमय, प्राणमय म्हणजे उपाधियुक्त असे मानलेले आहे सूर्यमंडळ, सत्यलोक इत्यादि त्या अपरब्रह्माची स्थाने आहेत त्यालाच हिरण्यगर्भ असेहि म्हणतात सर्वनियामक ईश्वर म्हणजेच हिरण्यगर्भ होय।

पशूपेक्षा मनुष्य ज्ञानी, मनुष्यापेक्षा विद्वान् ज्ञानी, त्याचेपेक्षा योगी ज्ञानी व सर्वांपेक्षा ईश्वर ज्ञानी असतो, हे वाय सांगावयास पाहिजे ? त्याला सृष्टि–स्थिति–संहार–विषयक ज्ञान पूर्ण असते म्हणूनच तो सर्वज्ञ होय अविद्यावस्थेमध्यें अभिमानानें कर्म करणाऱ्या जीवाचा ईश्वर हा कर्विता आहे कर्माध्यक्ष, सर्वभूताधिवास, साक्षी, चेता, असा जो ईश्वर त्याच्या अनुज्ञेनेच जीवाचे बरेवाईट होते ईश्वर हा पर्जन्याप्रमाणें आहे ज्याप्रमाणे गुच्छ, गुल्म, व्रीहि, यवादि बीजाच्या ठिकाणी जशी त्याची असाधारण शक्ति आहे व त्या शक्तीला प्रगट करण्याचे सामर्थ्य जसे पर्जन्यामध्ये आहे, त्याचप्रमाणें जीव–प्रयत्नापेक्षेनेच ईश्वर त्याला शुभाशुभ कर्माची फळे देतो संसार अनादि असल्यामुळे पूर्वप्रयत्न, पूर्वतर प्रयत्न व त्याच्या अपेक्षेनें फळ, असे हे रहाटगाडगे चालू आहे

या नामरूपात्मक जगताचे कारण शबल ब्रह्म म्हणजे ईश्वरच होय! तो ईश्वर सर्वज्ञ असल्यामुळे त्याला जाणणारा सर्वज्ञ होतो (आधुनिक शास्त्रज्ञहि जगताचे आदि कारण चित्‌जडात्मक असेच काही तरी असावे असे म्हणतात) शबल ब्रह्म म्हणजे चित् व जड यांचा संयोगच होय चित् म्हणजे ब्रह्म व जड म्हणजे अविद्या यापासूनच हा प्रपंच झाला आहे

जगताचे कारण अचेतन नाही ते चेतन आहे आत्मा, परमात्मा, ब्रह्म अशी जगताची निरनिराळी कारणें सांगितली असली तरी त्या सर्वांचा अर्थ सर्वशक्तिमान, सर्वज्ञ असा ईश्वर हेच जगत्कारण असा समजावा अनेक वेदांतवाक्यामध्यें ब्रह्माच्या आधाराने जगत् उत्पन्न झाले असे म्हटले

नाही हे अद्वितीय ब्रह्म बाह्य साधनाची बिलकुल अपेक्षा करिता जगत् निर्माण करिते महाप्रभावशाली हे असे स्वसामर्थ्याने बाह्यसाधननिरपेक्ष काय पाहिजे ते करू शकतात, तसेच ब्रह्माचेहि आहे ब्रह्म हे विचित्रशक्ति संपन्न आहे म्हणून त्यापासून विचित्र शक्तियुक्त जगत् उत्पन्न होत चेतन परमात्म्याला तो सर्वशक्तिमान असल्यामुळे हे जगत् लीलेने उत्पन्न करता येत (सामान्य माणसापेक्षा समाजाला महत्कार्य करता येत व त्याहिपेक्षा राजा मोठे कार्य करू शकतो ईश्वर हा राजाधिराज असल्यामुळे तो काय पाहिजे ते लीलेने उत्पन्न करू शकतो जी गोष्ट इतराना कठिण दिसते तीच तो लीलेने करू शकतो)

ईश्वर जर जगताचे कारण आहे असे सिद्ध झाले तर त्याच्या ठिकाणी निर्दयता व विषमता हे दोष आहेत असे नाही का म्हणता येणार ? कारण याने विषम सृष्टि उत्पन्न केली आहे त्यात सुखी, दुःखी, श्रीमंत, गरीब, सज्जन, दुर्जन असे लोक आहेतच ना ? त्यावर उत्तर असे की ईश्वराने प्राण्याची धर्माधर्म व पापपुण्ये इत्यादि कर्मे लक्षात घेऊन जगत् रचिले आहे त्यात ईश्वराचा दोष नाही ईश्वर हा पावसासारखा आहे पावसाचे पाणी जमिनीत ज्या जातीचे बीज पेरले असेल त्याला विकसित होण्याला मदत करते (पाणी हे कारले, ऊस व मिरची याच्या बुडाशी गेले की त्या त्या ठिकाणी जी बीजगत शक्ति असते तिचाच विकास करते ज्या बीजामध्ये जी शक्ति नाही, ती पाणी कधीहि उत्पन्न करू शकत नाही ) तात्पर्य, ही सृष्टि सापेक्ष आहे व ती अनादि असल्यामुळे ईश्वरावर कोणतेहि दोष येऊ शकत नाहीत ईश्वर हा सम, साक्षी, प्रभु व निर्लेप असा आहे एवढा ईश्वरापासून जगत् उत्पन्न झाले अशी प्रक्रिया स्वीकारली म्हणजे पुढील जगत्प्रक्रिया शास्त्याचे मताप्रमाणे सर्व व्यवस्थित जमते

(वेदान्त्याना शुद्ध ब्रह्मापासून हे विविध प्रकारचे जगत् कसे उत्पन्न झाले याचे बरोबर उत्तर देता आले नाही, म्हणून किंवा अधिक सयुक्तिक पद्धतीने पटावे म्हणून त्यानी शुद्ध ब्रह्माचा एक अंश शबल झाला आणि त्यापासून हे जगत् उत्पन्न झाले अशी मांडणी केली आहे हे शबल ब्रह्म म्हणजेच ईश्वर व त्याची शक्ति होय या शक्तीलाच अविद्या, प्रधान माया

लिप्त होत नाही जीवभाव हा अध्यवनाधीन आहे आत्म्यालाच शरीराभिमानी समजून सशरीरी समजतात

मुक्ताला पुनरुत्पत्ति प्रसग नाही याच कारण तो आपले मिथ्या ज्ञान नष्ट करतो

सम्यक् ज्ञानानच मिथ्या ज्ञानाच स्वरूप नष्ट होत म्हणजे ब्रह्मात्मैक्य तत्त्वज्ञानानें मिथ्या ज्ञानाला अपाय होतो देहादि अनात्म्याच्या ठिकाणी जो आत्मत्वाचा निश्चय लोकामध्यें दिसतो तो तत्त्वज्ञानाच्या अनवबोधामुळेंच होय

देहादींच्या ठिकाणी जो अहप्रत्यय आहे तो मिथ्या का गौण असा प्रश्न आल्यास तो प्रत्यय गौण नसून मिथ्याच आहे असे म्हणाव लागत ज्या दान वस्तूत प्रसिद्ध वस्तुभद असतो तेथेंच गौण प्रत्यय होतो उदा पुरुषाच्या ठिकाणी सिंह शब्द गौण अर्थानें वापरला जातो परतु भलत्या ठिकाणी जर सिंह शब्दाची योजना केली तर तो भ्रम समजावा भद अध कारामध्ये हा खाव आहे अस न समजल्यामुळें 'तो पुरुष आहे असा जसा भ्रम होतो तसाच अज्ञानान देहादि सघाताच्या ठिकाणी म्हणजे अनात्म्याच्या ठिकाणी होणारा आत्मप्रत्यय गौण नसून मिथ्या समजला पाहिजे

मिथ्या आहे अनुभव ज्याचा तोच भ्रम व त्यालाच अध्यास म्हणतात. जीवाचा मिथ्याभिमान प्रत्यक्ष आहे व तोच कर्मसबधाला कारणीभूत होता स्वदेहाचे ठिकाणी दाह अगर छद झाल्यास तन्निमित्तक जें दु ख होत त देहाभिमानाच्या भ्रांतिमुळेंच होय। त्याचप्रमाणे पुत्रमित्रादिकाना होणाऱ्या दु खान जो दु खानुभव यतो तो पुत्रमित्रादिकाचे ठिकाणी असलेल्या मिथ्या अभिमानामुळच होय। म्हणून मिथ्याभिमानजन्य जो भ्रम त्यामुळेंच हा दु खानुभव येतो ह नि सशय होय। जीवकृत घटाकाश मठाकाशादि भेदबुद्धि ही जशी मिथ्या आहे तशीच अविवेकान करणेंशी ईश्वर आणि ससारी जीव एतद्विषयक बुद्धीहि मिथ्याच होय। कर्तृत्वभोक्तृत्व ही मुद्दा अविवेकजन्य होत परस्पराच ज्ञान न झाल्यामुळ एकमेकाचा एकमेकावर जो भ्रम होतो त्यालाच अध्यास म्हणतात

शोकादीच कारण अविद्या होय। अविद्येची निवृत्ति ज्ञानाने होते

अविद्यानिवृत्ति हें ब्रह्मज्ञानाचें फल असल्यामुळें तिकडे जिवाची प्रवृत्ति होणें असंभाव्य नाहीं. अनात्म्याच्या ठिकाणी जी आत्मबुद्धी दिसते तो भ्रमानेच होय.

अविद्या ही एक बीजशक्ति म्हणून अवश्य मानली पाहिजे. ती शक्ति प्रभावी आहे. तिच्याशिवाय ईश्वराचें अस्तित्व सिद्ध होऊं शकत नाहीं. शक्तिरहित परमेश्वराला प्रवृत्त होण्याला कोणतेच कारण नसल्यामुळे ही शक्ति आहे म्हणूनच ईश्वराचें जगत्कर्तृत्व सिद्ध होतें. ती अविद्या कोणाला होते असें जर तू विचारशील तर जो तूं विचारणारा त्यालाच ती होते, म्हणजे त्याच्या ठिकाणी ती असते. विचारणारा अज्ञानी आहे म्हणूनच तो विचारतो. जर तो असें म्हणेल कीं "मी. ईश्वर आहे" आणि जर खरोखरी त्याला असे ज्ञान झाले तर अविद्या संपली; अविद्या ही त्याच्याकरितां नाहींच.

जगदुत्पत्तीच्या पूर्वी ईश्वर असतो. पण जगदुत्पत्तीपूर्वी असें कोणतें कर्म होतें की जें ईश्वराच्या ज्ञानाचा विषय झालें ? त्याला उत्तर हेंच की सतासताहून विलक्षण आणि अनिर्वचनीय अशीं जी अव्याकृत नामरूपे होती तीच कर्मे होत !

देहाचे ठिकाणी प्रेम, त्याला सुख देण्याविषयीं आस्था, त्याला कोणी त्रास दिल्यास त्यासंबंधींचा द्वेष व त्याचा उच्छेद करणाऱ्यावद्दल भय व मोह इत्यादि अनंत, भेद व अनर्थांचा समूह असा हा संसार सर्वांना प्रत्यक्ष आहेच! (हा संसार एकदम उपस्थित झाला काय ? तो कां व कसा झाला ? त्याचा व जीवकृत कर्मांचा कांहीं संबंध आहे काय ? याचा विचार पुढील प्रकरणांत करितों. )

प्रकरण ४ थें. : :

# संसाराचें अनादित्व व कर्म

वेदांत्यांनी संसार हा अनादि मानलेला आहे. हें जगत् जर आदिमान मानलें तर *अनवस्था प्रसंग येईल असें सर्व वेदांती म्हणतात.* वृक्ष आधी का बीज आधी हा उलगडा जसा कधीच होत नाही; कारण बीजाशिवाय वृक्ष नाही, वृक्षाशिवाय बीज नाही. त्याचप्रमाणे कर्माशिवाय सृष्टी नाही व सृष्टीशिवाय कर्म नाही. संसार जर अकस्मात् म्हणजे एकाएकीं उत्पन्न झाला तर ज्याना मुक्त असें समजतात त्यांना पुन्हा जन्म घ्यावा लागेल! सृष्टीत जी विषमता दिसते ती पूर्वकर्माच्या अपेक्षेनेच होय. एकरूप असणारी केवल अविद्या ही वैषम्याचें कारण होऊं शकत नाही. प्राण्याचे विकार व वासना यांनीं युक्त जी कर्में त्यांमुळेंच जगांत विषमता उत्पन्न होते.

शरीराशिवाय कर्म नाही, कर्माशिवाय शरीर नाही. मग पहिलें कर्म कोठून आलें, याचें उत्तर कर्म अनादि आहे हेंच होय!

" धाता यथा पूर्वमकल्पयत । नान्तोनचादिः ॥ "

इत्यादि श्रुतिस्मृति वाक्येंहि संसाराचें अनादित्वच सांगतात. तो अनादि आहे म्हणजे त्याचा आरंभ कळत नाही, असें म्हणूनच उपपत्ति लागते. पूर्वकर्म सापेक्ष उत्तरोत्तर जी सृष्टी निर्माण होते तीच पुढेंहि चालू असते.

जगत्‌रूपानें प्रगट होणारी शक्ति एकच आहे. जगताचा लय झाला तरी त्या शक्तीचा लय होत नाही. शक्ति अवशिष्ट असते म्हणूनच उत्पत्ति संभवते. अनेक शक्ती मानल्या तर अनवस्था प्रसंग येईल.

जें द्रव्य विशेष अवस्थेला प्राप्त होते तें कार्य होय. कार्य हें उत्पत्तीच्या पूर्वी नसते पण त्याचा अभाव असतो; असें नसून तें बीजरूपानें असतें. उत्पत्तीपूर्वी जर कार्याचा अत्यंत अभाव असेल तर ते कसें उत्पन्न होणार? कार्य हें कारणांत लीन असते म्हणूनच त्याची उत्पत्ति होते. उत्पत्ति होणें

म्हणजे क्रिया होणे होय ! व क्रिया म्हटली की तिला कर्ता पाहिजे कर्त्याशिवाय क्रिया होत नाही कर्ता, क्रिया व कार्य अशी ही परंपरा आहे

चेतन व शुद्ध असे जें ब्रह्म त्यापासून अचेतन व जड असे जगत् कसे उत्पन्न होईल ? कार्य हे कारणाशी अनन्य असतें, आणि कार्याचे गुण कारणात असतात, असे जर आहे तर ब्रह्मामध्यें जगत् रुपाने भासण्याचा काही धर्म आहे असे सिद्ध होऊ शकेल ! पण शुद्ध ब्रह्माचे ठिकाणी कोणताच धर्म नसल्यामुळें जगदुत्पत्तीला कारणीभूत असे शबल ब्रह्म मानणे सयुक्तिक दिसते अर्थात् त्या कारणात जग हे लीन असतें

कार्य व कारण यामध्यें अनन्यत्व असते मृत्तिकाघट, ततुपट, सुवर्ण व अलंकार यामध्यें अनन्यत्व आहे तसेच शबल ब्रह्म व जगत् यासही अनन्यत्व आहे घटरूपाने प्रगट होण्याची शक्ति मृत्तिकेत आहे अलंकाररूपाने प्रगट होण्याची शक्ति सुवर्णात आहे तशीच जगत् रुपानें प्रगट होण्याची शक्ति मायायुक्त व कर्मयुक्त अशा ब्रह्मामध्यें असल्यामुळे जगदुत्पत्ति संभवते जे ज्या ठिकाणी स्वरूपत नसते ते तेथून उत्पन्न होत नाहीं उदाहरणार्थ वाळूपासून तेल उत्पन्न होत नाही सत्कार्यवादानें कार्य-कारणाची व्यवस्था लागते, दुधामध्यें दह्याचे परिमाणु असतात म्हणूनच ते दधिरूपानें प्रगट होतात पाण्यापासून दही कधी होत नाही याचे कारण हेच की कारणाहून अन्य असे कार्य शेकडो वर्षे झाली तरी उत्पन्न होत नाही अभावापासून भावाची उत्पत्ति नाही मूळ द्रव्य विशेष अवस्थेला गेले की त्याला कार्य म्हणतात ब्रह्मानेच स्वत ला जगद्रूपाने विभागून घेतलें, ते त्यात प्रविष्ट झाले, इत्यादि वाक्ये आणि गीतेतील

अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।
विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥अ.१०–४२॥

एका अंशमात्राने या अखिल जगाचे धारण करून मी राहिलो आहे म्हणजे एका शबलांशापासून जगदुत्पत्ति झाली हाच सिद्धांत खरा ठरतो

कार्य व कारण यात अनन्यत्व असते कार्य हे कारणस्वरूपच असतें कारणामध्यें फेरबदल झाला की कार्याचा भास होतो पण तें कार्य कारण-

रूपच असतें. सर्व अवयव दुमडून बसलेला देवदत्त व हातपाय पसरून प्रशस्त बसलेला देवदत्त हे एकच होत. दुधामध्ये दह्याचे परमाणु असतात म्हणूनच ते कार्यरूपानें म्हणजे दधिरूपाने परिणत होतात म्हणजे ज्यांत जें नाहीं तें त्यापासून कधी उत्पन्न होत नाहीं अभावापासून भाव उत्पन्न होत नाही. एकच द्रव्य भिन्नभिन्न विशेष अवस्थाना अगर एकाच अवस्थेलाहि जाऊ शकते. भिन्नभिन्न अवस्थाची निरनिराळी कारणे नसून एकाच कारणाची ती परिणती होय !

सत्कार्यवाददृष्टचा शुद्ध, नित्य व सत् ब्रह्मापासून अशुद्ध, अनित्य व असत् असें जग कसें उत्पन्न झाले अशी शंका येते व त्या शंकेच्या निराकरणाकरिताच शुद्ध ब्रह्मापेक्षां निराळें अर्थात् शबल ब्रह्म म्हणजे मायाविशिष्ट ईश्वर हेच जगताचें कारण असें वेदात्यानी मानलेलें आहे. शुद्ध ब्रह्मापासून जगताची उत्पत्ति शक्य नाहीं. जगदुत्पत्तीला शबल ब्रह्म हेच कारण मानलें पाहिजे. चेतन, एकमेवाद्वितीय असे ब्रह्म हेच इतर बाह्य साधनाची अपेक्षा न करिता जगत् रूपाने परिणत होत असतें. अर्थात् परिणत होणारें शुद्ध ब्रह्म नव्हे. त्याने आपणा स्वत:ला जगत्‌रूपानें परिणत केलें अशी श्रुति आहे. त्यावरूनहि हाच सिद्धांत निघतो.

जगांत कोणतेहि व काहीहि अकस्मात् उत्पन्न होत नाही. तसें झाल्यास तो अनवस्था प्रसंगच होईल. कोणत्याहि कार्योत्पत्तीला निमित्त व उपादान कारणें लागतात. जें जेथून उत्पन्न होते, व जें ज्यांत लीन होते तेच त्याचें उपादान कारण होय ! निमित्तकारणें अनेक असू शकतात. जगत् हे ब्रह्मापासूनच उत्पन्न होते व शेवटीं ब्रह्मांतच लीन होतें, म्हणून त्याचें उपादान कारण ब्रह्मच होय ! कारण हें कार्यात्मक असत नाहीं. तर कार्यच कारणात्मक असते. कारणाव्यतिरिक्त कार्य असत नाही. कारणाधीन असणें हेच कार्याचें स्वरूप होय. जगांत सामान्यापासूनच विशेष उत्पन्न झालेलें दिसतें पण विशेषापासून सामान्य होत नाही.

जगताचें कारण एकमेवाद्वितीय ब्रह्मच आहे. असें ठरण्यास अनेक कारणें आहेत. एक जाणले असतां सर्व जाणले जातें. एकाचे ज्ञान होताच सर्वाचे ज्ञान होऊं शकेल, असें जर जगांत कांही असू शकेल तर ते ब्रह्मच

होय ! ( शुद्ध तर्कदृष्ट्या विचार केला तरी आधुनिक पंडितहि जगताचें कारण चित्जडात्मक असें एकच असावें असें म्हणतात ) घटाकाश मठाकाशादि जशीं महाकाशांत लीन होतात किंवा अलंकार सुवर्णरूप असतात, त्याप्रमाणें भोक्तृभोग्यरूप जो प्रपंच तोहि ब्रह्माव्यतिरिक्त असूं शकत नाहीं

ब्रह्मानेंच विचार करून हें जगत् उत्पन्न केलें म्हणजे चेतन ईश्वरानें तें उत्पन्न केलें असें समजावें

## कर्म

कर्म हेंच सर्व कांहीं करणारें आहे असा सिद्धांत आहे प्राणिमात्रांचीं जीं कर्में व अकर्में त्यांपासून उत्पन्न होणारा जो धर्म आणि अधर्म तत्सापेक्षच उत्तरोत्तर सृष्टि निर्माण होत असते सृष्टि ही अनादि असल्यें तरी कर्महि प्रवाहरूपानें अनादि आहे वैदिक, स्मार्त लौकिक असें कोणतेंहि कर्म केलें तथापि त्या कर्माचे जे अदृश्य परिणाम असतात व जे मानवबुद्धीस अगोचर असतात तेंच अदृष्ट किंवा अपूर्व होय ! कर्मापासून कांहीं अपूर्व उत्पन्न होतें म्हणजे पुण्य किंवा न कळणारा परिपाक तयार होतो कर्माचीं जीं प्रत्यक्ष फळें दिसतात त्यापेक्षा त्याचें न दिसणारीं अशीं कांहीं फळें असूं शकतात

कांहीच म्हणणें असें कीं जीं कर्में केलीं जातात त्यांचीं फळें भोगून जो अभुक्त असा फलावशेष असतो तोच अनुशय होय ! भांड्यांतील सर्व तेल ओतून बाहेर काढलें तरी जसा थोडा अंश त्याला चिकटलेलाच असतो तसाच जो कर्माचा अंश शिल्लक राहतो, तोच अंश विशिष्ट देश काल व जातीच्या ठिकाणीं मनुष्याला जन्म घ्यावयास लावतो या जगांतील आनंद भोगल्यावर इतर लोकांत जाऊन आनंदाचा अवशेष मागावा लागत असतो लौकिक कर्मामध्यें मी देहवान् आहे या अहंकारानेंच कर्म होतें देहाव्यतिरिक्त जें आत्मविज्ञान तें लौकिक कर्मामध्यें असत नाहीं सर्वांचा प्रवृत्ति दृष्टार्थाकडेच असते कर्में अहंकारानें केलीं कीं त्याचें फल या देहीं

अगर देहांतरांत भोगावें लागतें. पण देहाव्यतिरिक्त केवळ आत्मभावानें जर कर्म केले, तर तें कर्म अहंकार नसल्यामुळें कर्त्याला बधक होत नाही.

एक देह सोडून दुसरा देह घेण्याचे निमित्त कारण कर्मच होय! भूत-सूक्ष्में म्हणजे पंचमहाभूताचे सूक्ष्म अशाही एक कारण आहेच ! परंतु ते उपादान कारण असून निमित्त कारण कर्मच होय ! मिथ्या ज्ञानाच्या अभिमानानें जें कर्म केलें जाते तेच देहपातानंतर निराळ्या कर्मभोगाला प्रारंभ करते. विहित कर्में निष्ठेने जे जे करीत असतात ते ते या जगात कर्मफलाचा उपभोग घेऊन शेष जी कर्में राहातात, त्यामुळें देश, जाति, कुल, रूप, आयुष्य, श्रुत, वृत्त, वित्त वगैरे सर्व प्राप्त करून घेतात. मनुष्याला बऱ्यावाईट कर्मांची फळें भोगावी लागतात. बरेवाईट हे शब्द सापेक्ष आहेत. तथापि कर्त्याला त्या कर्मांचा अभिमान असतो म्हणून दोन्ही फळांचा त्याला उपभोग घ्यावा लागतो. कदाचित् दुष्कृत हे सुकृताच्या जोरामुळें जरी काही काल मार्गे पडलें तथापि केव्हा तरी तें (सुकृतांश कमी होताच) पुढें येते व कर्मफल भोगावयास लावतें. काही कर्मफलाना तात्पुरता प्रतिबंध करता आला तथापि देशकालनिमित्ताच्या अपेक्षेने ती कर्मेंहि विपाकाला उपस्थित होतात. शास्त्रसुद्धां अमुक कर्माचे अमुकच निश्चित फल असें सांगू शकत नाहीं. कांहीं कर्में वीर्यविशेषामुळें कल्पनेबाहेरहि फल देऊं शकतात. इष्ट फल, अनिष्ट फल व मिश्र फल अशीं त्रिविध फलें कर्मांपासून प्राप्त होत असतात. कर्मांचें फल हे तत्काल मिळतें असें नाही. कर्म-परिपाकाबद्दल नियम नाही.

(कांही पिकें तीन महिन्यांनी तर काही सहा, तर कांही नऊ व बारा महिन्यांनीही येतात. कर्मबीजाचेहि तसेच आहे.) उपासना या कर्माचें फल हे चित्तैकाग्र्य अगर समाधान या रूपाने लौकर अनुभवाला येतें. काहीं कर्मांचीं फलें अनित्य असली तरी ती या लोकांत अगर याहून अन्य लोकात भोगावी लागतातच.

## कर्मफलदाता कोण ?

( हें अखिल जगत् म्हणजे कर्म होय! कर्म व कर्माचा परिपाक याशिवाय जगांत काही नाहीं. कर्ममय अशा या जगांत मनुष्य रोज

अनेक कर्में करतो ती इतकी की रोजच्या कर्माचे मनुष्याला स्मरणही होणार नाही मनुष्याला जसे कर्माचे स्मरण अशक्य आहे, त्याप्रमाणेच त्याला मी हे अमुक एक कर्म केले व त्याचे हे अमुक फल आहे असे समजणेहि कठिणच आहे अहंकारयुक्त सर्व कर्में फल देतात ते फल कर्त्यालाच भोगावे लागते यांत संशय नाही कर्ता अनेक कर्में करून व त्यांची फळें भोगण्यापूर्वी जर नष्ट झाला तर त्या कर्माची फळें कोणी भोगावी ? अमुक कर्म अमुक करायचे आहे व अमुक कर्माचे अमुक फल आहे हे कोणी व कसे ठरवावे हा मोठा विचाराचा प्रश्न आहे मानवी बुद्धीला अद्याप हे कोडें उलगडले नाही ) म्हणून जो नियामक सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्वाध्यक्ष, सृष्टिस्थितिसंहार करणारा देश व काल यांचा नियामक असा जो परमेश्वर तोच कर्म करणाऱ्या जीवाना कर्मानुरूप फळ देतो व त्याना ती भोगावी लागतात, हा सिद्धांत मानावा लागतो

कर्माचे फल हे कर्माच्या अपेक्षप्रमाणे (सापेक्ष) किंवा अपूर्वापेक्ष प्रमाणें ईश्वरच देत असतो ईश्वर हाच जगताचा आधार व अधिष्ठान आहे तोच आपल्या कूटस्थ, तटस्थ व उदासीन सत्तेने सर्वांना त्याच्या त्याच्या संस्काराप्रमाणे प्रेरणा करतो व तदनुरूप कर्में घडून येत असतात अर्थात जो प्रेरक तोच फलदाता होय[1] प्राणिमात्रांना आपल्या कर्मानुरूप फलें भोगता यावी म्हणून ईश्वर या विचित्र सृष्टीला उत्पन्न करीत असतो

ईश्वर हा उगाच विचित्र म्हणजे वैषम्ययुक्त सृष्टि निर्माण करीत नाही तो तो जर तशी करील तर मोठा अन्याय होईल ईश्वराचे सर्व करणें सापेक्ष (म्हणजे प्राणिमात्राच्या कर्माप्रमाणेच) असते तो सर्वाध्यक्ष व सर्वशक्तिमान् असल्यामुळें कर्मसापेक्ष बरोबर फळ देतो

कर्माचे फल कोण देतो, याबद्दल ब्रह्मसूत्र अध्याय ३ पाद २ मध्यें सूत्रें ३८ ते ४१ मध्यें चर्चा आहे त्यांत धर्म, अपूर्व वगैरे फलदात्री न मानता ईश्वर हाच कर्मफलदाता आहे असे बादरायणाचार्यांनी मानलेले आहे

सदाचार व असदाचार असे दोन कर्मविभाग होतात तेहि सापेक्ष

आहेत. श्रौतस्मार्त कर्मेंहि देशकालसापेक्षच आहेत. अर्थात् त्या त्या कालांत जो जो सदाचार (व त्याविरुद्ध असलेला जो दुराचार) त्याप्रमाणे फल उत्पन्न होतें. ज्यांचें चारित्र्य, आचार व शील ही चागली आहेत (म्हणजे जे समाजोपयुक्त व्यवसाय करून पोट भरतात, आपला भार दुसऱ्यावर घालीत नाहीत आणि जे पवित्र, शुद्ध, निर्मलपणे परस्त्री व परद्रव्य-विषयक शुचिता राखून जगात वावरतात) त्यांना सद्‌गति मिळते.

सुकृत व दुष्कृत ही सापेक्ष असतात. त्यांची सार्वकालिक एक व्याख्या ठरवितां येत नाही. मनुष्य (आपल्या मनांत घोळवून घोळवून) जें करूं लागतो ती क्रिया. ती नेहमी पुरुषाधीन असते. पण वस्तु मात्र पुरुष-निरपेक्ष असते. वस्तु व क्रिया यातील पहिली स्वतंत्र व दुसरी परतंत्र आहे. तसेंच पहिली निरपेक्ष व दुसरी सापेक्ष आहे. क्रिया ही ज्याच्या आश्रयाने होते त्यालाच ती फलरूपानें भोगावी लागते. कायिक, वाचिक, मानसिक अशीं कर्में आहेत. तीं कर्में कशीं करावीत हे समजण्याकरितां व अभ्युदय व्हावा म्हणून धर्म समजून घ्यावा असें शास्त्र सांगते.

मनुष्यापासून अगदी ब्रह्मदेवाच्या देहापर्यंत जें सुख–तारतम्य असते ते धर्माधर्माचेच फल होय! त्याचप्रमाणें मनुष्यलोकाच्या खालचा जो नरकादि लोक आहे त्याचीहि संगति लागते. धर्म हा आचरण्याकरितां (तसाच अधर्महि टाकण्याकरितां) जाणावयाचा असतो. उच्च उच्च स्थितीला प्राप्त होणें हें धर्माचें फल व नीच स्थितीला जाणें हे अधर्माचें फल होय! दुःख प्राप्त न व्हावे म्हणूनच अधर्माचरण करूं नये! मीमांसकांनीं अधर्माचरण घडल्यास जें प्रायश्चित्त सांगितले आहे तें चित्तशुद्धीकरितां आहे. त्यामुळे अशेष दुरितांचा जरी क्षय होत नसला तथापि ते एक निमित्त आहे (व त्यामुळे मनाला थोडें बरें वाटतें असा सिद्धांत आहे. प्रायश्चित्त म्हणजे शिक्षा. व्यवहारांतहि अपराधाबद्दल शिक्षा भोगली की अपराधाचा दोष नष्ट होतो.)

शास्त्रांत सांगितलेलीं (पण आज अशुद्ध व विपरित वाटणारीं) कर्में हीं धर्म्य का अधर्म्य असा एक प्रश्न आहे परंतु मीमांसक म्हणतात कीं तीं वेदांनीं सांगितलेलीं आहेत म्हणून धर्म्य आहेत. (परंतु आजच्या जगाला हें अमान्य आहे.) प्रत्येकानें आपापली नित्य नैमित्तिक कर्में निष्कामतेनें करावीं.

चित्तशुद्धि हे त्याचे फल होय। नित्य नैमित्तिक कर्मे केल्याने विशेष फल मिळते असे नाही पण ती न केल्याने जो प्रत्यवाय घडतो त्याला प्रतिबंध होतो पूर्वजन्मार्जित कर्माचा नित्यनैमित्तकाशी विरोध नाही तीन आश्रमामध्ये जें जें करावयास सांगितले आहे, ते न केल्याने पाप लागते पण संन्याशाला विधीने तो त्याग करतो म्हणून काहीहि दोष लागत नाही, ब्रह्मवेत्त्याने शमदमादि साधनातच निमग्न असावयाचे असते गृहस्थाश्रमातील पंचयज्ञादि कर्मे आणि इतर कर्मे ही सर्व लोकयात्रा वर्णचित्तशुद्धि याकरिता आहेत

आपत्कालामध्ये सर्वान्न–भक्षणाला अनुमति आहे उषस्त चाक्रायणाने सारवानाजवळील हुलगे खाल्ल्याची गोष्ट प्रसिद्धच आहे जीवजगण्याकरिता कुणाचेहि व काहीहि खाल्ल तरी दोष नाही (याप्रमाणे वेदांत्यानी ब्रह्म, जगत्, ईश्वर, अविद्या, संसार व कर्म याचा विचार केला आहे )

---

प्रकरण ५ वे . १

# आत्मविचार व जीवस्वरूप

मागल्या तीन प्रकरणात ब्रह्म व जगत्, ईश्वर व अविद्या, संसार व कर्म याचा विचार केला, आता आत्मा व जीव याचे स्वरूप पाहू (जगात ब्रह्म आहे की नाही अशी शंका कुणालाहि घेता येईल, पण आपण स्वत आहो की नाही याची शंका मात्र घेता येणे शक्य नाही कारण मी नाही असा बोध कोणालाहि होत नाही उलट, मी सदैव आहे ही जाणीव प्रत्येक जीवाला असते चार्वाकादिकाचे म्हणणे असे की शरीर, मन, बुद्धि, याच्या मिश्रणामुळे चेतन आत्मा निर्माण होतो अर्थात् आत्मा हा शरीराचा गुण आहे ) परंतु वेदांती म्हणतात की, आत्म्याचे धर्म व देहाचे धर्म हे भिन्न भिन्न आहेत रूप, आकार, वजन, आदीरूपी, हे देहधर्म आहेत मृतावस्थेमध्ये मुद्दा हे धर्म असतात पण प्राण, चैतन्य, स्मृति हे

आत्म्याचे धर्म देह असूनहि मृतावस्थेमध्ये आढळत नाहीत देह असून जे धर्म उपलब्ध होत नाहीत ते आत्म्याचे धर्म होत अर्थात शरिराहून आत्मा भिन्न असला पाहिजे

पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या भूतांव्यतिरिक्त चैतन्य म्हणून काही आहे की नाही ? जर असेल तर ते भूतांचा धर्म होऊ शकत नाही अग्नीची उष्णता ही अग्नीला जाळीत नाही शिकलेला चांगला नट स्वत च्या खांद्यावर बसत नाही त्याप्रमाणेच चैतन्य हा जर पंचभूतांचा धर्म असेल तर ते त्या पदार्थांना आपले विषय करू शकणार नाही घटाला व पटाला आपले रूप दृष्टीस पडत नाही परंतु चैतन्य मात्र सर्व पदार्थांना विषय करते त्यावरून देहाव्यतिरिक्त आत्मा असला पाहिजे

आत्म्याच्या उपलब्धीला देहाची जरूरच आहे असे नाही कारण स्वप्नामध्यें हा देह स्वस्थ पडला असतानासुद्धा आत्म्याचे अस्तित्व अनुभवाला येते तेथे सूक्ष्म देहाने आत्मा पाहिजे तिकडे संचार करतो यावरून देहाव्यतिरिक्त आत्मवस्तु आहे असे मानणे भाग आहे शिवाय भूत, भविष्य व वर्तमान या तीनहि वस्तु जरी ज्ञेय रूपाने भिन्न भिन्न असल्या तरी ज्ञाता हा अभिन्नच असतो तीन्ही अवस्थेत त्याचे स्वरूप कायमच आहे म्हणून देहाचा नाश झाला तरी आत्म्याचा नाश होत नाही असे म्हणावे लागते

सुषुप्तीमध्यें जीव परब्रह्माशी एकरस होतो पण तो अनुभव टिकाऊ नसतो सुषुप्तीमध्यें अविद्या बीजरूपाने अवशिष्ट असल्यामुळें ती जीवाला जागी करते व पुन्हा संसारात पाडते सुषुप्तीत बीजरूपाने असलेले संस्कार तेच जागृतीमध्यें अभिव्यक्त होतात बुद्धीचा सबधहि सुषुप्तीमध्यें बीज-रूपानेच असतो जें सूक्ष्मरूपानेच असते तेच अभिव्यक्त होते कोणत्याहि वस्तूची उत्पत्ति एकाएकी संभवत नाही गाढ निद्रेप्रमाणेच मरणसमयी अविद्या बीजरूपाने राहाते, म्हणूनच ती पुनर्जन्माला कारणीभूत होते

केवळ आत्मा हा कर्ता नाही, बुद्धिसंयोगामुळें तो कर्ता होतो केवळ बुद्धि ही जड असल्यामुळें ती कर्ती होत नाही आत्मा व बुद्धि मिळून कर्तृत्व संभवते हें कर्तृत्व जीवाला अविद्येमुळे किंवा मायेमुळेच आहे

जगात प्रत्येक मनुष्याला जाया, पुत्र आणि इतर भोग्यभूत वस्तु केवळ स्वत करिता म्हणजे जीवाकरिता प्रिय असतात जीव हा चेतन असून, तो शरिराचा अध्यक्ष आणि प्राणाना धारण करणारा असा आहे वागादिक जी इद्रिये व त्यावडून होणारी जी कार्ये त्याचा अध्यक्ष नि प्राण धारण करणारा असा हा जीव आहे

ईश्वर व जीव याचा व्यवहार ईश व ईशितव्य या न्यायाने होतो जीव व ईश हे मुळात एक असले तरी अविद्यामुळे नामरूप व कार्यकारण•सघाता भिन्न जो जीव त्यावर ईश्वराची सत्ता असत शरीररूपी पिंजऱ्यात जीव हा पक्षी बसलेला असून, तो कर्मफले चाखतो, पापपुण्य करतो, व सुखदु खे भोगतो जीव हा ईश्वराश असला तरी प्रत्येक शरीरामुळे तो भिन्नत्वाप्रत गेलेला आहे प्रत्येक जीव ईश्वरस्वरूप असला तरी, तो पाहतो, ऐकतो बोलतो असाच व्यवहार होतो जीव हा स्वरूपज्ञान होईपर्यंत (शरीर, इद्रिय, मन, बुद्धि, विषय व त्याचे ज्ञान या उपाधीमुळे) तो पृथक्त्वाने राहतो अन्नमयादि पचकोशाच्या पलीकडे जीव आहे तथापि, विज्ञानमय व आनदमय कोशच त्याच्या अस्तित्वाची साधन आहेत मन ही एक जीवाची उपाधि आहे स्नान, आचमन इत्यादि क्रियेमुळे जीवाच्या देहाला सस्कार करतात मी देह आहे असे समजणारा जो जीव त्या करिताच हे सस्कार होत मी सुसस्कृत आहे, मी शुद्ध आहे, अशी जी बुद्धि दिसत ती देहसहत आत्म्याचीच होय

जीवो हि नाम चेतन शरीराध्यक्ष प्राणाना धारयिता प्रसिद्धेर्निर्वचनाच्च। १।१।६

अस्त्यात्मा जीवाख्य शरीरेन्द्रियपजराध्यक्ष कर्मफलसबधी। २।३।१७

जीवाचे स्वरूप वरीलप्रमाणे आहे तथापि स्वामी व भृत्य याप्रमाणेच जीव व ईश याचा सबध आहे अग्नीच्या ठिणगीप्रमाणे जीव व ईश मानले तर त्याचा अवयव अवयवी असा सबध येईल परतु ब्रह्म हे निरवयव असल्यामुळे अविद्यामूलकच जीव व ईश याचा भेद मानला पाहिजे ईश्वराचा एक अश म्हणजे जीव होय गीतत 'ममैवाश' असे म्हटले आहे निरवयव ब्रह्माचे अश व अशी हे भाव सभवत नाहीत म्हणून एकच पर-

मात्मा सर्व भूतांतरात्म्याच्या स्वरूपानें नटलेला आहे असें मानावें लागतें. यावर अशी शंका येते की जीव व ईश्वर यामध्यें ज्ञान व ऐश्वर्य या दृष्टीनें मोठा भेद दिसतो. दोहोंत जर अंशांशी भाव आहे तर जीवाच्या ठिकाणीं ईश्वराहून विपरीत धर्म का दिसावेत ? त्याचें उत्तर देहोपाधीमुळें (अविद्येमुळें) जीव हा ज्ञान व ऐश्वर्य याचा तिरस्कार करणारा असा होतो, हें होय.

जीवःपरमात्मांशएव सन् तिरस्कृतज्ञानैश्वर्यो भवति देहयोगात्। ३।२।६

उपाधिविशेषामुळें ब्रह्मच असणारा जीव कर्ता व भोक्ता होतो उपाधिसंबंधानें जीव ही संज्ञा व उपाधिराहित्यामुळें ब्रह्म ही संज्ञा दिली जाते.

बुद्ध्याद्युपाधिकृतं तु विशेषमाश्रित्य ब्रह्मैवसन् जीवः कर्ता भोक्ता च इत्युच्यते। १।१।३१

शरिराचा स्वामी तो आहे म्हणून जीवाला शारीर आत्मा असें म्हणतात. शरीर या उपाधीनें तो शारीर होतो. या शारीरचेतन जीवाला धर्माधर्माची पापपुण्यें ही फलें भोगावी लागतात. कर्तृत्व भोक्तृत्वादि संसारधर्मानें जो युक्त तो क्षेत्रज्ञ होय. क्षेत्र म्हणजे शरीर, त्या उपाधीनें बद्ध तोहि क्षेत्रज्ञच होय! जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन्हींचा जीव हा साक्षी होय! जीव हा उपाधीमुळें परिच्छिन्न आहे. आकाशाच्या ठिकाणी जशीं घटाकाश, महाकाश, हीं उत्पन्न होतात. तसाच उपाधि-निबंधनामुळें जीव हा उत्पन्न होतो. तात्पर्य, जीव उपाधितंत्र आहे. आत्म्याच्या ठिकाणीं या सर्व उपाधींचा आरोप केलेला आहे. स्फटिक जसा रक्तपुष्पसंन्निकर्षानें तांबडा दिसतो, तसेंच आत्मवस्तूचें होतें. बुद्ध्यादि उपाधिसंबंध जोंवर असतो तोंवरच जीवाचें जीवत्व असतें. मी ब्रह्म आहें, असे अविद्या-निरासपूर्वक जीवाला समजलें की तो मुक्त होतो. स्थाणूच्या ठिकाणीं पुरुष बुद्धीचा प्रथम भ्रम होतो. तो नष्ट झाला की स्थाणूचें स्वरूप कळतें.

बुद्धि ही जीवाची उपाधि होय. तिचे कर्तृत्व भोक्तृत्वादि धर्म आहेत. त्यांमुळेंच नित्यमुक्त अशा आत्म्याचे मागें संसार लागतो. देहादि जो इंद्रियसंघात तोच मी असें विपरीत ज्ञान आत्म्याला होतें. मी जातों, चालतो, इत्यादि शरीरधर्मयुक्त व्यवहार होतात. ही भ्रांति नष्ट होण्यास ज्ञान हेंच

साधन होय जीव हा शरीररूप होऊन राहातो, पण ईश्वर हा शरीरात (शरीराहून वेगळा) राहातो एवाच पाण्याचे मिठाचा खडा व बर्फ हे विकार होतात, व जल हे द्रवरूप असले तरी घन होते तसच अहकारामुळें जीवाला जीवत्व येत

ब्रह्मज्ञान होईपर्यंत उपाधि सुटत नाही बुद्धीचा व आत्म्याचा संयोग झाला की तो संसारी होतो व तो त्याचा ससारीपणा बुद्धि-सयोग नष्ट झाल्याशिवाय जात नाही सुषुप्ति व प्रलय या ठिकाणी बुद्धीचा सबध नसतो असे नाही तो सबध असतो म्हणूनच जागें होणे, पूर्व व्यवहार करणे वगैरे घडते बुद्धिसयोगजन्य ससार आहे व बुद्धिवियोग-जन्य मोक्ष आहे भिन्न भिन्न जीवामध्येंहि उपाधिमुळेंच भेद आहे परमार्थत भेद नाही एका शरिराचा अभिमानी एकच जीव कर्ता व भोक्ता आहे

जीवाचे परिमाण काय याबद्दल वाद आहे कोणी म्हणतात तो अणु आहे, कोणी म्हणतात तो महत् आहे केसाच्या टोकाच्या शभराव्या हिश्श्या-इतका जीव सूक्ष्म आहे असेहि म्हणतात जीव अणु असेल तर तो एक-देशस्थ होईल व सकल देहगत त्याचे अस्तित्व जाणवणार नाही हरिचदन नावाच्या चदनाचा टिळा कपाळाला लावला तर तो सकल शरिराला आल्हाद देतो, तसाच अणु आत्माहि सकल देह व्यापतो शरीरातील त्वचा सबध शरीरभर असते, त्यामुळें चदनाची शीतलता पसरते, तशीच आत्म्या-चीही स्थिति आहे (अशी चर्चा करून जीवाचे परिमाण मध्यम मानलेले आहे) ज्या उपाधीशी तो सलग्न असतो, तेवढाच जीव लहान मोठा बनतो एवच बुद्धीचे गुण आत्म्यावर लादलले असतात व त्यामुळें तसा निर्देश होतो

आकाश सर्वत्र असले तरी उपाधिमुळेंच जसा त्यावर आरोप होतो, तसेच जीवाचहि येणे व जाणे बुद्धि उपाधीमुळें होत उपाधिविहीन जीव कुठें जात नाही व येत नाही जीव हा अणु, व्यापि व मध्यम परिणामक मानला तरी त्यावर आपत्ती येतातच म्हणून तो स्वत सिद्ध आहे, आगतुक नाही इतर प्रमाणान त्याच्या सिद्धीची जरूर नाही असेच समजले पाहिजे जीव हा जन्मत नाही व मरत नाही, व त्यावर सस्कारहि होत नाहीत पण तो जगतो व मरतो हे व्यवहार गौण होत देहप्रादुर्भावामुळेंच हे सगळे भाषा-

प्रयोग आहेत. जो स्वयंसिद्ध अज, नित्य व शाश्वत आहे तो कसा उत्पन्न होणार? क्वचित् त्याच्या उत्पत्तीचें व प्रलयाचे विवेचन असले तरी तें औपाधिकच समजावें वर्तमान, अतीत, अतीततर व अनागत या सर्वांचे ज्ञान आत्म्याला असते म्हणून तो सदा सर्वदा असणारा आहे. शरिराचे संयोग व वियोग, यावरून त्याला जन्म व मरण ही सज्ञा प्राप्त होते. जीव जें आपलें शरीर समजतो त्याला जर पीडा होऊ लागली तर तो तेथून निघून जातो.

जीव हा नित्य चैतन्य स्वरूप आहे, का आगंतुक चैतन्य स्वरूप आहे, कां स्वतः अचेतन आहे असे प्रश्न आहेत. वेदांती म्हणतात कीं तो नित्य चैतन्य स्वरूप आहे. सुषुप्तीत चैतन्य नाही असें नाहीं. तेथे विषयाचा अभाव असल्यामुळें चैतन्याची प्रवृत्ति नसते इतकेंच. म्हणून नित्योपलब्ध म्हणजे सदैव असणारा हेंच आत्म्याचें स्वरूप होय. 'नित्योपलब्धिस्वरूपत्वात्'.।। २।३।४०

चैतन्य हा आत्म्याचा गुण आहे का नाही असा प्रश्न येतो. त्याचे उत्तर तो त्याचा गुण असल्यामुळेंच त्याचें सर्व शरीरभर ज्ञान होतें हें होय. परब्रह्म म्हणजे जीव असा जर सिद्धांत आहे तर त्याचे सर्व धर्म जीवामध्यें आहेतच.

युक्त असा जीव स्वच्छेने पाहिजे तो कर्मे करतो शेती करणे, नांगर धरणे इत्यादि कर्मांत जशी ईश्वराची अपेक्षा नसते, त्याचप्रमाणे जीवाची कर्मेहि ईश्वरनिरपेक्षच व्हावयास पाहिजेत, हे खरे पण ईश्वर हा हृदयामध्ये राहून प्रेरणा करीत असल्यामुळे त्याच्या अधिष्ठानावर म्हणजे साक्षित्वानच सव क्रिया होतात ईश्वर हा जीवाकडून बऱ्यावाईट गोष्टी जर करवून घेत असेल तर त्या ईश्वरावर निर्दयता व विषमता हे दोष येतील, आणि अकृताभ्यागम व कृतप्रणाश म्हणजे न केलेले कर्म चिकटणे व केलेले कर्म नष्ट होणे हे दोनहि येतील तस्मात् जीवकडून धर्माधर्मलक्षण जी कर्मे घडतात, त्याचे जे संस्कार असतात त्याच्या अपेक्षेप्रमाणे ईश्वर कर्मे करवितो 'पर्जन्यवत् ईश्वरो द्रष्टव्य निमित्तत्व मात्रेण' ज्या तऱ्हेचे बीज असेल तसे त्याचे विकसन करणे हा जसा पर्जन्याचा धर्म तसच ईश्वराचहि आहे

जीवाचे कर्तृत्व पूर्वप्रयत्नापेक्ष असले तरी जीवाला अगदीच स्वातंत्र्य नाही असे नाही म्हणूनच जीव करतो व ईश्वर त्याचेकडून करवितो अशी भाषा वापरतात 'कुर्वंत हि त ईश्वर कारयति' पूर्वप्रयत्नाच्या अपेक्षेने ता आता कर्म करवितो व पूर्वतर प्रयत्नाच्या अपेक्षेने पूर्वीची कर्मे करवितो असा सिद्धांत निघतो

जीव जर कर्ता आहे आणि स्वतंत्र आहे तर स्वहिताला अनिष्ट व विपरीत असे कर्म का करतो ? याचे उत्तर हेच की जीवाला अत्यंत स्वातंत्र्य नाही कोणत्याहि क्रियेला देशकाल, निमित्त व साधन याची अपेक्षा असते ती जशा असतील तसे कर्म घडते ज्ञान, बुद्धि आणि संगति याचाहि कर्मांशी संबंध आहे आचार्याचे कर्तृत्व उदक, अग्नि व शिवा याच्या आधीन असले, तथापि त्याच्या ठिकाणी मुळीच कर्तृत्व नाही असे म्हणता येत नाही

प्रयोग आहेत जो स्वयंसिद्ध अज, नित्य व शाश्वत आहे तो कसा उत्पन्न होणार? क्वचित् त्याच्या उत्पत्तीचे व प्रलयाचे विवेचन असले तरी ते औपाधिकच समजावे वर्तमान, अतीत, अतीततर व अनागत या सर्वांचे ज्ञान आत्म्याला असते म्हणून तो सदा सर्वदा असणारा आहे शरिराचे संयोग व वियोग, यावरून त्याला जन्म व मरण ही संज्ञा प्राप्त होते जीव जें आपले शरीर समजतो त्याला जर पीडा होऊ लागली तर तो तेथून निघून जातो

जीव हा नित्य चैतन्य स्वरूप आहे, का आगंतुक चैतन्य स्वरूप आहे, का स्वतः अचेतन आहे असे प्रश्न आहेत वेदांती म्हणतात की तो नित्य चैतन्य स्वरूप आहे सुषुप्तीत चैतन्य नाही असं नाही तेथे विषयाचा अभाव असल्यामुळें चैतन्याची प्रवृत्ति नसते इतकेच म्हणून नित्योपलब्ध म्हणजे सदैव असणारा हेच आत्म्याचे स्वरूप होय 'नित्योपलब्धिस्वरूपत्वात्'.॥ २।३।४०

चैतन्य हा आत्म्याचा गुण आहे का नाही असा प्रश्न येतो त्याचे उत्तर तो त्याचा गुण असल्यामुळेंच त्याचे सर्व शरीरभर ज्ञान होते हे होय परब्रह्म म्हणजे जीव असा जर सिद्धांत आहे तर त्याचे सर्व धर्म जीवामध्यें आहेतच

जीव हाच कर्ता आहे व म्हणूनच विधिवाक्ये सार्थ होतात जीव हा कर्ता, बोद्धा, विज्ञाता नसता तर या आज्ञा व्यर्थ ठरल्या असत्या तो प्राण धारण करणारा आहे, बुद्धियुक्त आहे, म्हणूनच लौकिक व वैदिक क्रियामध्यें त्याला कर्तृत्व आहे "श्रोतव्य, मतव्य" ही वाक्ये सुद्धा कर्तृत्वा-नेच उपदिष्ट आहेत हा जीवच भोक्ता आहे, कारण तो कार्यसम्पन्न भोगेच्छा धरतो जीवाला मिथ्या ज्ञानजन्य कर्तृत्वाचा उपभोग घ्यावा लागतो व अज्ञान नष्ट झाले की शरिरादीचा अभिमान नष्ट होतो व जीव परम सुखी होतो

प्रश्न —जीवाच्या कर्तृत्वाला ईश्वराची अपेक्षा असते का नसते?

उत्तर —अविद्येच्या उपाधीमुळें जीवाच्या ठिकाणी कर्तृत्व संभवते. पण ते कर्माध्यक्ष, सर्वभूताधिवास, साक्षी, प्रेरक, असा जो ईश्वर त्याच्या अनुग्रहानें संभवते व त्याच्याच अनुग्रहानें मोक्षसिद्धि होते रागादि दोषानें

युक्त असा जीव स्वेच्छेने पाहिजे ती कर्मे करतो शेती करणे, नागर धरणे इत्यादि कर्मांत जशी ईश्वराची अपेक्षा नसते, त्याचप्रमाणे जीवाची कर्मेहि ईश्वरनिरपेक्षच व्हावयास पाहिजेत, हे खरे पण ईश्वर हा हृदयामध्ये राहून प्रेरणा करीत असल्यामुळे त्याच्या अधिष्ठानावर म्हणजे साक्षित्वानेच सर्व क्रिया होतात ईश्वर हा जीवाकडून बऱ्यावाईट गोष्टी जर करवून घेत असेल तर त्या ईश्वरावर निर्दयता व विषमता हे दोष येतील, आणि अकृताभ्यागम व कृतप्रणाश म्हणजे न केलेले कर्म चिकटणे व केलेले कर्म नष्ट होणे हे दोषहि येतील तस्मात् जीवाकडून धर्माधर्मलक्षण जी कर्मे घडतात, त्याचे जे संस्कार असतात त्याच्या अपेक्षेप्रमाणे ईश्वर कर्मे करविती 'पर्जन्यवत् ईश्वरो द्रष्टव्य. निमित्तत्व मात्रेण' ज्या तऱ्हेचे बीज असेल तसे त्याचे विकसन करणे हा जसा पर्जन्याचा धर्म तसेच ईश्वराचेहि आहे

जीवाचे कर्तृत्व पूर्वप्रयत्नापेक्ष असले तरी जीवाला अगदीच स्वातंत्र्य नाहीं ऐसे नाहीं म्हणूनच जीव करतो व ईश्वर त्याचेकडून करवितो अशी भाषा वापरतात 'कुर्वंतं हि तं ईश्वर कारयति' पूर्वप्रयत्नाच्या अपेक्षेने तो आता कर्म करवितो व पूर्वतर प्रयत्नाच्या अपेक्षेने पूर्वीची कर्मे करवितो असा सिद्धात निघतो

जीव जर कर्ता आहे आणि स्वतंत्र आहे तर स्वहिताला अनिष्ट व विपरीत असे कर्म का करतो ? याचे उत्तर हेच की जीवाला अत्यंत स्वातंत्र्य नाही कोणत्याहि क्रियेला देशकाल, निमित्त व साधने याची अपेक्षा असते ती जशी असतील तसे कर्म घडते ज्ञान, बुद्धि आणि संगति याचाहि कर्माशी संबंध आहे आचाऱ्याचे कर्तृत्व उदक, अग्नि व शिधा याच्या आधीन असले, तथापि त्याच्या ठिकाणी मुळीच कर्तृत्व नाहीं असे म्हणता येत नाही

प्रश्न —जीवाच्या ठिकाणी असणारे कर्तृत्व हे स्वाभाविक आहे का औपाधिक आहे? जर ते स्वाभाविक असेल तर अग्नि व उष्णता, सूर्य व प्रकाश याप्रमाणे जीव व कर्म, याचा संबंध असल्यामुळे मोक्ष अशक्यच होईल

उत्तर —जीवाच्या ठिकाणचे कर्तृत्व स्वाभाविक नसून औपाधिक

आहे अविद्येमुळेंच तो कर्ता, भोक्ता, सुखी, दुःखी असा होतो अविद्येचा निरास केला की कर्तृत्व संपले ! जसा एखादा सुतार, वाक्स, किकरे याच्या सहाय्याने मजुरीस गेला म्हणजे काम करतो पण तो घरी आल्या वर स्वस्थ व निर्व्याप असतो, तसाच जीवहि शरीरोपाधीमुळें व अहंकारामुळें कर्ता व भोक्ता होतो त्या उपाधीचा अहंकार सुटला की जीव मुक्त होतो

अविद्येच्या व्यवधानामुळेंच जीव व ईश्वर याच समानधर्मत्व असतांना सुद्धा ज्ञान व ऐश्वर्यविहीन जीव होतो

उपाधीचा अभिमानी जीव झाला की, त्याचा निर्लेपपणा गेला जीवाच अल्पत्व उपाधीमुळेंच नष्ट करता येत नाही व त्यामुळेंच सर्वज्ञत्वाचा असंभव असतो

नहि शारीरस्य उपाधि–परिच्छिन्न दृष्टे. सर्वज्ञत्वं सर्वविरत्व वा संभवति । १।२।२१

अवस्थात्रयीचा जो साक्षी तो त्या अवस्थाहून भिन्न आहे व तो नाही असे म्हणता येणें अशक्य आहे सर्व प्राणी सारखे असले तरी ज्ञान व ऐश्वर्य यामध्यें परस्पर कमी अधिकपणा दिसतो याचे कारण प्राण्याच्या कर्मामुळें उत्पन्न झालेले प्रतिबंध ह होय जितके प्रतिबंध कमी तितकी बुद्धि शुद्ध होय, व ती ज्ञान आणि ऐश्वर्य यांना अनुकूल असते (अविद्यात्मक देह ही जीवाची उपाधि आहे ही पंचकोशानीं युक्त असत त्या पंचकोशाची चर्चा पुढील प्रकरणात करितो )



प्रकरण ६ वे

# पंचकोश व मरणोत्तर स्थिति

वेदात्यानी अनमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनदमय असे पाच कोश मानलेले आहेत या पाचापलीकडे आत्मतत्त्व आहे सर्व कोशात आत्मा अनुस्यूत आहे जीवाला हे शरीर त्याच्या कर्मामुळच मिळालेले आहे शरीर हे वात, पित्त व कफ या त्रिधातूचे आणि तेज, आप व अन्न याच बनलेले आहे मूढाना अनमय शरीर हाच आत्मा वाटतो चैतन्य युक्त जो देह तोच आत्मा असे चार्वाक मानतात

स्थूलाप्रमाणेच सूक्ष्म शरीरही आहे त्यामध्य पचप्राण, पच ज्ञानेंद्रियें, पच कर्मेंद्रियें, अत करणचतुष्टय, व पचविषयाचे सूक्ष्म सस्कार याचा अन्तर्भाव असतो सूक्ष्म शरीर आहे, याचे निदर्शक अगातील उष्णता हे होय मेल्यानतर शरीरात उष्मा नसतो याचे कारण सूक्ष्म शरीर स्थूल शरीराबाहेर गेलेले असत शरीरात जो वायु तोच मुख्य प्राण होय। त्याचे पाच प्रकार आहेत प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे त होत वायु हा प्राण होऊन नासिकत प्रविष्ट झाला अग्नि हा मुखात प्रविष्ट झाला, सूर्य नेत्रात प्रविष्ट झाला, इत्यादि वाक्यावरून भूतसूक्ष्माची कल्पना येते प्राण हा उच्छ्वसन करणारा असून तो समोर जात असतो अपानवायु हा खाली जाणारा असून निश्वासादि कर्मे करतो व्यान हा या दोन वायूंच्या सधीमध्यें असतो व तो वीर्य उत्पन करतो उदान हा उत्क्रांतीला कारणीभूत असून त्याची गती ऊर्ध्व असते, आणि समानवायु हा सर्वांगामध्यें सम प्रमाणात अनरस पाचवीत असतो नाभि हे एव प्राणाचे स्थान आहे प्राण हा एक सर्वात्मा आहे, असे प्रतिपादन केले आहे सर्व इद्रियें थकली तरी प्राण कधीच थकत नाही परतु प्राण म्हणजे काही आत्मा नव्हे, कारण तो जड आहे प्राण हा जीवाचा सर्वाधिकारी

आहे पण स्वतंत्र नाही प्राण म्हणजे इंद्रिय नव्हे प्राण हा सूक्ष्म व परिच्छिन्न आहे प्राणाचे कार्य गर्भधारणेपासून सुरु होते म्हणूनच तो ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे तो क्रियाशक्तिमान असल्यामुळे त्यापासून आयुष्य शरीराची हालचाल व धारणा ही प्राप्त होते। सुषुप्तीत इंद्रियें निजली तरी प्राण जागाच असतो तो जागून शरीराची धारणा करतो आयुष्य म्हणजेच प्राण होय, व आयुष्य म्हणजेच अन्न होय। इंद्रियें मन व बुद्धि ही प्राणापेक्षा निराळी आहेत करण (इंद्रिय) सूक्ष्म व परिच्छिन्न आहेत ती अकरा आहेत पंच ज्ञानेंद्रिये पंच कर्मेंद्रिय व मन ही ती होत इंद्रियांचा संबंध जीवाशी आहे अंतःकरण हे एक निराळे मानले आहे त्यालाच मन, बुद्धि, चित्त अहंकार इत्यादि नावे आहेत लाक्षणिक अर्थानें क्वचित् प्राणाला इंद्रियें असेहि म्हटले आहे

मन व बुद्धि यांचे मूलद्रव्य एकच आहे कार्य व कारणसंघातामध्यें बुद्धि ही मुख्य आहे ज्ञानशक्ति हे बुद्धीचे लक्षण असून ती बुद्धि हृदयात असते मनहि प्रायः हृदयातच असते व हृदय पुंडरिकात सापडते, असेहि म्हणतात मनाच्या योगशास्त्रसिद्ध पांच वृत्ती आहेत त्या म्हणजे श्रवणादि इंद्रियद्वारा विषयाकडे जाणे या होत। श्रद्धा हा एक मनाचा आणि बुद्धीचा किंवहुना जीवाचा धर्म आहे असे म्हणता येईल, श्रद्धा म्हणजे प्रत्ययविशेष होय। जाण्या जीव हा श्रद्धाळु आहे जीवाला जसजसा बरा वाईट अनुभव येईल तसतसा तो नंतर संशयी बनतो श्रद्धा व संशय हे दोन्ही धर्म, मन व बुद्धीचे होत

कोणत्याही जीवाला जे विषय ज्ञात असतात त्याबद्दलच सुख किंवा दुःख उत्पन्न होते अज्ञात विषयाबद्दल कधीच कोणाला सुखदुःख होत नाही जीवाला जसजसे भिन्न विषयांचे ज्ञान होते तशी तशी त्याची आकांक्षा वाढते व ती जसजशी वाढेल तसतशी इच्छा परिपूर्ति न झाल्यास दुःख, द्वेष, संताप इत्यादि उत्पन्न होतात

जीवाला प्राण व इंद्रियें यावाचून भोग होत नाही आणि प्राण व इंद्रियें ही कशाही आश्रयावाचून राहात नाहीत अर्थात् या देहातून भूतसूक्ष्माच्या आश्रयाने असणारे प्राण व इंद्रियें ही देह सोडून बाहेर जातात व ती तशी

बाहेर गेली म्हणजे दुसऱ्या देहामध्ये जीवाला भोग देतात जीवाबरोबर भूतसूक्ष्माचे अश है मोक्ष होईपर्यंत असतात भूतसूक्ष्मेंहि भर्जित बीजवत् आर्ली की जीवाला मोक्ष मिळतो भूतसूक्ष्में आहेत तोवरच जीवाला बंध आहे, त्याचा लय झाल्यानंतर जीव हा ब्रह्मरूप होतो

जीवाच्या मुख्य अवस्था तीन आहेत त्या जागृति, स्वप्न व सुषुप्ति या होत या शरिरातून बाहेर पडणे ही एक चवथी अवस्था असून मूर्च्छा हीहि एक पाचवी अवस्था मानलेली आहे विषयाचे ग्रहण करून मनोपाधि विशेषाने त्याचा भोग जीव जागृतीतच घेतो जागृतीतील विशेष वासना स्वप्नामध्ये उद्भूत होतात व तेथे तो स्वप्नाचा भोग घेतो जागृति व स्वप्न याचा पूर्ण उपरम जेथें होतो, तेथें उपाधिविरापाच्या अभावामुळे जीव आपल्या ठिकाणीच लीन होतो व म्हणून तिला सुषुप्ति म्हणतात जागृतीत जीव हा देह व इंद्रियरूपी पिंजऱ्याचा अध्यक्ष असतो जागृतीमध्ये जीव हा विषयासक्त असतो व इंद्रियाचे योगाने विषयाचे शोधन करतो स्वप्न हे जागृतीतील वासनामूलकच आहे स्वप्नात वासना–निर्मित सृष्टीचा अनुभव जीव घेतो व जागृतीत आल्यावर मी अमुक अमुक पाहिले असे म्हणतो स्वप्नामध्यें सर्व सृष्टि मनोमात्रच असते स्वप्नाचा कर्ता जीवच असतो स्वप्न हे वासनामूलक असते (गाढ झोप ज्याला येत नाही, मेंदूचा विकार ज्याला आहे, अज्ञानाचा प्राय पुष्कळ स्वप्ने पडतात ' मनी वसे त स्वप्नी दिसे ' ही म्हण प्रसिद्ध आहे त्यावरून मनाचा व स्वप्नाचा सबध दृढ आहे असे दिसते )

इंद्रियाचे सर्व व्यापार जेथें लीन झालेले असतात व जेथें तो काही एकत नाही, पाहात नाही, विशेष ज्ञान करून घेत नाही, जेथें तो सद्रूपी जो आत्मा त्याशी लीन झालेला असतो जेथे तो कुणालाहि ओळखीत नाही, ती सुषुप्ति अवस्था होय ! सुषुप्तीचे कारण श्रम हे होय ! सर्व इंद्रियें जेव्हा थकतात तेव्हाच सुषुप्ति प्राप्त होते सुषुप्तीमध्यें जीवाचा विनाश होत नाही फक्त जीवाला विशेष विज्ञान नसते पण सुषुप्तीनतर मी गाढ निजलो होतो असे जीव सागतोच सुषुप्तीमध्ये जीव हा ब्रह्मरूपत्र होतो मात्र ती अवस्था अज्ञानमिश्रित असते सुषुप्ती-

मध्यें जीवाचें स्थान ब्रह्मच असते, प्रज्ञानघन जो आत्मा त्याला जीवानें आलिंगन दिल्यानंतर मग त्याला बाहेरचें कांहीहि स्मरत नाही. सुषुप्तीमध्यें मन हें पुरीतती नाडीमध्यें शयन करीत असल्यामुळें ते एकटें झाले जाते. तेथें दुसरा विषयच असत नाही. (जीवाला दररोज आत्मसुख पाहिजे असतें. तें सुख गाढ सुषुप्तीतच मिळतें. अज्ञानमिश्रित आत्मसुखच का होईना पण तें जीवाला पाहिजे असतें. त्या सुखाविना जीवाला बरें वाटत नाही. जो गाढ झोपी जातो त्याचें आरोग्य चांगलें असते ) जो निजलेला असतो, तोच जागा होतो. कारण त्याचे कर्म व अविद्येचे संस्कार हे लगेच जागृत होतात व ते त्या जीवाला काही वेळाने प्रेरणा करितात समुद्रांत टाकलेला जलबिंदु पुन्हा शोधून काढता येत नाही, पण जीव हा महासमुद्रस्थानीय परब्रह्मांत जरी झोपेंत लीन झाला असला तरी तेथून त्याला बाहेर काढता येतें. याचें कारण जीवाचें कर्म व अविद्या हेंच होय ! अविद्येचे जें सूक्ष्म बीज सद्भावानें असते त्यामुळेंच जीव उत्थान पावतो व तो उत्थान पावल्यावर पुनश्च पूर्वसंस्कारानुरूप सर्व व्यवहार नेमके करतो. सुषुप्तीत त्याची अविद्या सुप्त असते. ती जागृतीत पुन्हां प्रगट होते व जणु ब्रह्माशी कांही संबंध आलाच नाही अशा प्रकारें जागृतीतील व्यवहार सुरू होतो.

मूर्च्छा हें मरणाचें द्वार होय ! मरण म्हणजे अपसरण होय. एका देहांतून दुसऱ्या देहांत जाताना मूर्च्छा येते. मूर्च्छेमध्यें जीवाला ज्ञान नसतें. पण सुषुप्तीतील सुख असतें असेंहि नव्हे. मूर्च्छेतून मनुष्य शुद्धीवर येतो, तेव्हां तो एवढा वेळपर्यंत मला कांहीच कळलें नाही वगैरे बोलतो. मूर्च्छिताचा देह पृथ्वीवर पडतो. त्याला शुद्धि असत नाही, व देहावर झालेले आघात त्याला कळत नाहीत. दुःखाच्या असह्य वेदनेंतून मूर्छा उत्पन्न होते. सुषुप्तीमध्यें दुःखाच्या असह्यतेचा भागच नसतो. तात्पर्य, जीवाच्या जागृत, स्वप्न, सुषुप्ति, अपसरण व मूर्च्छा अशा पांच अवस्था असून जीव शरीर हें पंचकोशानी युक्त आहे. पंचकोशांपैकी अन्नमय व प्राणमय कोश हे स्थूल शरीरांतील असून मनोमय, विज्ञानमय व आनंदमय हे कोश सूक्ष्म शरीरामध्यें अन्तर्भूत होतात. स्थूल व सूक्ष्म देहापलीकडे आत्मा आहे, म्हणून सुषुप्तीला कारण देह असेंहि म्हणतात.

## मरणोत्तर जीवाची स्थिति

कर्मप्रयुक्त इद्रियविषयात्मक जीवाला बधन असते तो कर्माश्रित असतो म्हणून पचभूताच्या उपादानाने त्याला दहातराची प्राप्ति होने जीवाची अनेक अनारब्ध कर्मे असतात त्याचा भोग भोगण्याकरिता दुसऱ्या दहात जाणे जरूर असत व तच त्याच अभिव्यजक होय [1] ज्यांची परस्परविरुद्ध फल आहेत, अशा अनेक कर्मांची फल जीवाला एकदम भोगणे शक्य नसते म्हणून फलभोगार्थ जीवाला पुनजन्म आहे जर अनत कर्मांची फल जीवाला एकदम भोगता आली, तर विविध ठिकाणी जाऊन विविध देहानी फल भोगण्याचा प्रसगच जीवावर यणार नाही

एका दहातून दुसऱ्या देहात जाताना जीव हा भूतसूक्ष्माच्या सह (चिकटून) जातो आकाश पजन्य, पृथ्वी पुरुष व स्त्री अशा पच अग्नीतून तो श्रद्धा, सोम, वृष्टि, अन्न व रेत इतक्या स्वरूपाने जातो मुख्य प्राणाचे उत्क्रमण झाल्यावर त्याचे मागोमाग पचप्राण जातात पचप्राणाची गति ही आश्रय असल्यावाचून सभवत नाही भूतसूक्ष्मेंहि सर्वत्र असतात त्याच्या आश्रयाने जीव (मुख्य प्राण) पचप्राण पच-ज्ञानेद्रियें पच-कर्मेंद्रियें व अत-करण यासह जातो भूतसूक्ष्माच्या आश्रयाशिवाय प्राणाची गति सभवत नाही

एका दहातून दुसऱ्या देहात जाताना जीवाबरोबरच विद्या व कर्म ही जात असतात विद्या म्हणजे ससारविषयक विद्या व इतरहि सर्व सस्कार, आणि कर्म म्हणजे विहित व प्रतिषिद्ध कर्मे म्हणजे पूवप्रज्ञा भूतसूक्ष्में, विद्या व कर्म ही चार जीवाबरोबर जातात जीवाचा मुख्य मनी प्राण आहे त्याच्यासह सेंद्रिय, समनस्क, पूर्वप्रज्ञायुक्त असा जीव एक दह सोडून दुसऱ्या दहात जातो

देहाद्देहातर प्रतिपत्तौ देहबीजैर्भूतसूक्ष्मै सपरिष्वक्तो रहति ...रेण ...क फल,

जीवो मुख्य प्राणसचिव सेंद्रिय समनस्कोऽविद्या-कर्म ... तत्त्वमसि

परिग्रह पूर्वदेहं विहाय देहातरं प्रतिपद्यते । ३।१।१ ... अवस्थेत मुळीच

... शाचे उत्क्रमण असे होते—वाणी मनात, मन ...

दर्शयतिच-यत्रत्वस्यसर्वमात्मैवाभूत इत्यादिना ब्रह्मात्मत्वदर्शिनंप्रतिसमस्तस्य क्रियाकारकफललक्षणस्य व्यवहारस्याभावं ॥ २।१।१४

ज्ञान झाल्यानंतर ज्ञानपूर्व व ज्ञानोत्तर कर्माचा लेप ज्ञान्याला लागत नाहीं ज्ञान झाल्यानंतर जे क्रियमाण होतात त्यात मी कर्ता आहे ही जाणीव नसते व पूर्वप्रसिद्ध जे कर्तृत्व व भोक्तृत्व त्याहून मी निराळा अशी जाणीव असल्यामुळे संचित कर्माचा संबंध ज्ञान्याकडे येत नाहीं ज्ञान्याला कर्तृत्वादि व्यवहार नाही व त्याला इतराप्रमाणे यथापूर्व संसारहि नाही

यत्रत्वस्य सर्वमात्मैवाभूत् इति विवेकिनः कर्तृत्वादि व्यवहार वारयति ।१।२।१२

ज्ञानानेच ब्रह्मात्मदर्शन होते शरिरादिकाच्या अभिमानाने जे दुःख-भयादि भाव उत्पन्न होतात तेच ज्ञानाने पुढें नष्ट होतात देहाभिमानाची निवृत्ति झाली की मिथ्या ज्ञान आणि दुःखभयादि भाव हे नष्ट होतात

पुण्य व पाप ही सर्व उडवून ब्रह्मवेत्ता निरंजन अशा परमपदाला जातो त्याची पुण्ये त्याच्या मित्राकडे व पापें त्याच्या शत्रूकडे जातात प्रिय ज्ञातिबांधव व अप्रिय ज्ञातिबांधव यामध्यें त्याचे सुकृत व दुष्कृत वाटले जाते ज्ञानानें सर्व कर्मांचा नाश होतो, अशी ही ब्रह्मविद्या आहे ब्रह्म-वेत्त्याला पुनर्जन्म नाही 'अमृतत्व हि विद्वान् अश्नुते' अशी स्मृतीहि आहे.

ब्रह्मवेत्त्याला क्रियमाण व संचित याची बाधा होत नसली तरी प्रारब्धकर्म हें त्याला भोगावयाला लागतेच

**भोगेनत्वितरे क्षपयित्वा संपद्यते ४।१।१९**

**इतरे तु आरब्धकार्ये पुण्यपापे उपभोगेन क्षपयित्वा ब्रह्म संपद्यते।**

ब्रह्मवेत्त्याला कर्तव्य नाही आत्मज्ञान झाल्यावर तो कोणाकरिता कशाची व काय बरे इच्छा करणार ? म्हणून त्याला विधि नाही, निषेध नाही व कर्तव्यहि पण नाही

अलंकारोह्ययमस्माकं यत् ब्रह्मावगतौ सत्यां सर्वकर्तव्यताहानि कृतकृत्यता चेति १।१।४

आत्मानुभवी कृतकृत्य होतो म्हणून त्याला कसलेच कर्तव्य उरत नसत

आत्मैकत्व ज्याचे झाले आहे व जे आप्तकाम आहेत, त्यांनी क्लेशबीज विशेषत्वाने दग्ध केली आहेत त्यांना प्रारब्धभोगाच्या क्षयावाचून दुसरी कसलीही अपेक्षा नसते

नहि आत्मैकत्वदर्शिनां आप्तकामानां इहैव दग्धाशेषक्लेशबीजानां आरब्धभोग-कर्माशयक्षपणव्यतिरेकेण अपेक्षितव्यं किंचिदस्ति। ३।३।३०

ब्रह्मज्ञानोत्तर सर्वत्र एकात्मभाव आरूढ झाल्यानंतर 'भूय कदाचित् आकांक्षा नोपजायते' कसलीच आकांक्षा उत्पन्न होत नाही कारण पुरुषार्थाची समाप्ति ज्ञानानें होते, व तो नित्य तृप्त होतो ४।३।१४

ब्रह्मात्मदर्शन झाल्यानंतर कोणत्याहि यत्नांतराची जरूर नाही कारण हा अधिकारी अनियोज्य असतो नियोज्य म्हणजे ज्याचा नियोग करता येतो तो पण हा अधिकारी विधिनिषेधाच्या पलीकडचा असल्यामुळें तो कोणालाहि आज्ञा करण्यास योग्य असा होत नाही विधिनिषेध हे नियोज्याच्या मागें असतात आत्म्याहून अन्यत् दुसरी कोणतीहि वस्तु हा पाहात नसल्यामुळें तेथें नियोज्य-नियोजक भावच नसतो शरीराचा अहंकार जेथ आहे तेथें वेदाचा निग्रह लागू पडतो परंतु शरीराव्यतिरिक्त आत्म्याचे ज्यांना दर्शन झालं आहे, त्यांना वेदाचा निग्रह किंवा अनुग्रह काहीच संभवत नाही म्हणूनच ब्रह्मज्ञान्यांना अग्निहोत्रादि कर्में करण्याचें कारण नाही

ब्रह्मवेत्त्याला विधिनिषेध, निग्रह, अनुग्रह वगैरे काहीच लागू नसतात, तर मग तो पाहिजे तसा वागतो की काय?

नच नियोगाभावात् सम्यग्दर्शिनो यथेष्टचेष्टाप्रसङ्ग सर्वत्राभिमानस्यैव प्रवर्तकत्वात् अभिमानाभावाच्च सम्यग्दर्शिनः

२।३।४८

ब्रह्मवेत्ता यथेष्टाचार करू शकत नाही कारण त्याच्या ठिकाणी अभिमान नसतो अभिमान हाच नसत्या गोष्टीला प्रवृत्त करणारा असतो• आजवर साधक स्थितींत त्यानें जे नियम पाळले त्याचेंच आचरण स्वभावतः त्याच्याकडून होत असल्यामुळें तो पाहिजे तसा वागणें शक्य नाही

'कुर्वन्नेव इह कर्माणि' 'न कर्म लिप्यते नरे' इत्यादि वाक्यावरून ज्ञानोत्तरहि कर्म संभवतच ज्ञात्यांनी जरी लोकसंग्रहार्थ कर्मे केली तरी त्यांना त्यांचा लेप लागत नाही

ब्रह्मवेत्त्याचा सर्व कर्मे क्षीण झाली असल्यामुळे त्याच्या प्राणांची उत्क्रांति व गति होत नाही पुण्यपाप जाऊन निष्कलंक निरंजन अशा पर ब्रह्मामध्ये तो लीन होतो विद्वन म्हणजे ज्ञानाने बीजशक्तीचा म्हणजे वासनेचा दाह झाल्यामुळे मुक्ताला पुनरुत्पत्ति नाही मुक्त हा परब्रह्माशी अविभक्तपणानेच असतो तो परमज्योतीशी प्राप्त होऊन स्वरूपातच लीन होतो मुक्त हा ब्रह्माशी कसा एकरूप होतो याबद्दल विविध मत आहेत तो शरीरात असूनहि शरीराभिमानी नसल्यामुळे काहीच करीत नाही व त्याला कशाचाहि लेप लागत नाही

अज्ञानामुळेच आत्म्याला शरीर धारण करावे लागते शरीरपातानंतर साधक मुक्त होतो असे नव्हे तर तो देहात असतानाच जिवंतपणी मुक्त होतो मिथ्या शरीराभिमान हाच मुळी बंधन हेतु आहे तो गेल्यानंतर बंध कसला व मुक्ति कसली ?

( ब्रह्मज्ञानोत्तर पूर्व आणि उत्तर म्हणजे संचित व क्रियमाण यांचा दाह होतो हे पूर्वीच सांगितले आहे फक्त प्रारब्ध मात्र भोगून संपवावयाचे असते प्रारब्धकर्मांचा क्षय झाला की देहपात होतो व देहपातानंतर पुन्हा देह घेण्याचे कारण पडत नाही प्रारब्धाचा मात्र ब्रह्मज्ञानाने नाश होत नाही प्रारब्ध कर्म हे भोगावेच लागते कारण त्या कर्मानेच हा देह प्राप्त झालेला असतो प्रारब्धकर्म जर नष्ट होईल तर ज्ञान होताच मृत्यु येईल अहो, 'ज्ञानाग्नि सर्व कर्मे भस्म करतो' असे जर आहे तर काही कर्मांचा दाह व काही कर्मांचा अदाह हे योग्य आहे काय ? त्याचे उत्तर असे की देहाचा म्हणजे प्रारब्धकर्मांचा आश्रय न करता मुळी ज्ञानच उत्पन्न होत नाही कुंभाराच्या चक्राची जी गति असते तिला जर प्रतिबंध नसेल तर ती गति आपोआपच थांबावी लागते प्रारब्धकर्माला प्रतिबंध नसल्यामुळे ज्ञान्यालाहि ते भोगावे लागते )

भोगेन तु इतरे क्षपयित्वा संपद्यते ।' ४।१।१९

म्हणजे प्रारब्धकर्माच्या क्षयानेच मोक्ष मिळतो जीवन्मुक्त हा सर्वज्ञ असतो म्हणजे त्याला सर्व काही करता येते असे नव्हे, काही ब्रह्मवेत्ते लोकोपकारार्थ त्याना विशिष्ट अधिकार असतो म्हणून काही कालपर्यंत कर्मे करतात व ब्रह्मत्वाप्रत जातात

ब्रह्मज्ञान हे अनुभवारूढ आहे ब्रह्मज्ञान होताच मी सर्वात्मा आहे असा बोध होतो ब्रह्मज्ञानी काही कालपर्यंत शरीरधारणा करतो की नाही? कारण एकाच हृदयात ब्रह्मवेदन व देहधारण कसे संभवेल? त्याचे उत्तर असे की ब्रह्मज्ञान होताच ज्ञानी मरत नाही तर त्याचा देहात्मभाव नष्ट होतो व तसे झाल्यावर काही काल म्हणजे प्रारब्धक्षयापर्यंत देहधारण संभवते ३ संसारी ब्रह्माचे ज्ञान झाल्यावर प्रवृत्तिनिवृत्तीचे विधि तेथ नाहीत

तत्त्वमसि वाक्याने ब्रह्मज्ञान होताच, विद्या उत्पन्न होऊन अविद्या नष्ट होते तत्त्वज्ञानाशिवाय प्रपचप्रविलय करा असे शेकडो वेळा जरी सांगितले तरी शक्य नाही ज्ञानक्षेत्रात नियोग, आज्ञा, प्रेरणा, बलात्कार ही संभवत नाहीत प्रपचावस्थेत जो जीव नियोज्य असतो तोच ज्ञानावस्थेमध्ये अनियोज्य होतो जीवाचे जीवत्व हे अविद्याकृत असल्यामुळे ते नियोज्य असते, पण ब्रह्माच्या ठिकाणी नियोगाचा अभाव असतो

ज्ञानापूर्वी विधिनिषेध उपपन्न आहेत त्यानतर ते नाहीत 'दृष्टव्य श्रोतव्य' ही वाक्यें विधि नसून ती स्वाभाविक बहिर्मुख वृत्तीचा त्याग करून अतर्मुख वृत्तीने विचार करा असे सांगतात

ब्रह्मज्ञानानतर झालेली कर्मे कर्त्याला चिकटत नाहीत आणि अविद्येमुळे झालेली पूर्व कर्मे नष्ट होतात कमलपत्राला जसे पाणी चिकटत नाही त्याचप्रमाणे कर्माचे होते ब्रह्मविद्येमध्ये कर्मक्षयार्थ प्रायश्चित्त नसले तरी अवगतिमबोधानच कर्मक्षय होतो कर्तृत्व भोक्तृत्वाचा माझ्या ठिकाणी संबंध नाही अशी ब्रह्मवेत्त्याची भावना असते, म्हणूनच मोक्ष उपपन्न होतो नाही तर अनादि कालापासून प्रवृत्त असलेल्या कर्मांचा क्षयाभाव असल्याने मोक्ष असंभवच झाला असता अवगतिमबोध ज्याला झाला आहे त्याला सुकृत दुष्कृत सर्व सारखेच होते

सम्यक् ज्ञानाशिवाय काम्य व निषिद्ध वर्जनाची वृत्ति मरेपर्यंत जाणें शक्य नाही. कारण अत्यंत निपुण लोकसुद्धां अपराध करु शकतात. तत्वज्ञानानेच अशेष कर्मांचा क्षय होतो तात्पर्य ब्रह्मज्ञान झालें म्हणजेच कर्मसंबंध नष्ट होतो. अकर्त्रात्मबोध हा ब्रह्मज्ञानावाचून नसतोच. तो ज्याला उत्पन्न झाला त्याला सुकृतदुष्कृतांची मुळीच पर्वा नसते. ज्ञानामुळें कर्मबीज दाह होतो, असे मानलेच पाहिजे, नाही तर एका कर्माचा क्षय झाल्यावर अदग्ध बीज दुसरे कर्म तेथें येऊन बसेल सम्यक् दर्शनानें ज्यांचा तमोध्वस झाला आहे, त्यांना पुनर्जन्म नाही मुक्ताला मात्र अनेक शरीरे घेण्याची अपेक्षाच नसते. अध्यात्मविद्येचें फल मोक्षच होय.

ब्रह्मज्ञान्याला दुःखाचा अनुभव असतो काय? देहाभिमान्यालाच मिथ्या ज्ञानाने मी सुखी, मी दुःखी, मी कर्ता, मी भोक्ता असा अनुभव असतो. जागृतींतील दुःखें सुषुप्तीत नसतात, आणि केवळ चैतन्य स्थितीत तर सर्व दुःखविमुक्तता असून आत्मानुभव प्रतीत होतो.

(अद्वैत वेदांत परपरेंतील श्रीशंकराचार्य हे एक मोठे तत्त्ववेत्ते आहेत आणि त्यांचे सिद्धांतच आज विद्वानांमध्यें मान्य आहेत. त्यांनी ब्रह्मवेत्ता कसा वागतो, त्याची लक्षणें काय व तो यथेष्ट आचार करतो की काय याचे विवेचन आणखी काही ठिकाणीं फार उत्तम केलेले आहे. तें मूळ भाष्य आणि त्यांचा भावार्थ यांसह येथें देतो. हेतु हा की हें वाचून तरी या ब्रह्मनिष्ठ म्हणवून घेणाऱ्या महाराज लोकांकडे पाहाण्याची लोकांची दृष्टि थोडी निवळावी.)

### बृहदारण्यक अ. ३ ब्रा. ५

यस्मात्पूर्वे ब्राह्मणा एतमात्मानम् साधनफलस्वभाव विदित्वा सर्वस्मात्साधनफलस्वरूपादेषणालक्षणाद्व्युत्थाय भिक्षाचर्यं चरन्ति स्म। दृष्टादृष्टार्थं कर्म तत्साधनं च हित्वा। तस्मादद्यत्वेऽपि ब्राह्मणो ब्रह्मवित्पाण्डित्यं पण्डितभावमेतदात्मविज्ञानं पाण्डित्य निर्विद्य निःशेष विदित्वाऽऽत्मविज्ञानं निरवशेषं कृत्वेत्यर्थः। आचार्यत आगमत- श्चैषणाभ्योव्युत्थाय। एषणाव्युत्थानावसानमेव हि तत्पांडित्यम्। एषणानिरस्कारोद्भवत्वादेषणाविरुद्धत्वात्। एषणामतिरस्कृत्य न

ह्यात्मविषयस्य पाण्डित्यस्योद्भव इत्यात्मज्ञानेनैव विहितमेषणाव्युत्थानम् । आत्मज्ञानसमानकर्तृकक्त्वाप्रत्ययोपादानलिङगश्रुत्या दृढीकृतम् ।

भावार्थ—पूर्वीचे ब्रह्मवेत्ते आत्म्याला जाणून एषणाचा त्याग करून भिक्षाचर्यनें राहात असत ब्रह्मनेने ब्रह्मविद्या जाणून व एषणाचा त्याग करून असतात विषय, वित्त व लौकिक या एषणाच्या तिरस्काराशिवाय आत्मज्ञान होतच नाही म्हणून आत्मज्ञानाचे साधन एषणात्याग हें होय । ज्याच्या ठिकाणी एषणा म्हणजे इच्छा आहेत तो ब्रह्मवेत्ताच नव्हे

तस्मादेषणाभ्यो व्युत्थाय ज्ञानबलभावेन बाल्येन तिष्ठासेत्स्थातुमिच्छेत् । साधनफलाश्रयण हि बलमितरेषामनात्मविदाम् । तद्बल हित्वा विद्वान्साधनफलस्वरूपात्मविज्ञानमेव बल तद्भावमेव केवलमाश्रयेत् तदाश्रयणे हि करणान्येषणाविषय एन हृत्वा स्थापयितु नोत्सहन्ते । ज्ञानबलहीन हि मूढ दृष्टादृष्टविषयाणामेषणायामेवैन करणानि नियोजयति, बल नामा ऽऽत्मविद्याऽशेषविषयदृष्टितिरस्करणम् । अतस्तद्भावेन बाल्येन तिष्ठासेत् । तथा " आत्मना विन्दते वीर्यम् " इति श्रुत्यन्तरात् । " नायमात्मा बलहीनेन लभ्य " इति च ।

भावार्थ—ब्रह्मवेत्ता एषणात्याग करून बालभावान राहातो आत्मज्ञान हच त्याचे बल असते त्यामुळें त्याचीं इंद्रियें लौकिक एषणात त्याला ओढून नेऊ शकत नाहीत ज्ञानबलहीन जो मूढ असतो, त्याचीं इंद्रियें त्याला पाहिजे तिकडे ओढतात पण आत्मवज्ञान् आत्मनिष्ठाला इंद्रियें काहीं करू शकत नाहीत

बाल्यं च पाण्डित्य च निर्विद्य निःशेष कृत्वाऽथ मानान्मुनिर्योगी भवति । एतावद्धि ब्राह्मणेन कर्तव्य यदुत सर्वानात्मप्रत्ययतिरस्करणमेतत्कृत्वा कृतकृत्यो योगी भवति । अमौन चाऽऽत्मनानात्मप्रत्ययतिरस्कारौ पाण्डित्यबाल्यसंज्ञकौ निःशेष कृत्वा मौन नामानात्मप्रत्ययतिरस्करणस्य पर्यवसान फल तच्च निर्विद्याथ ब्राह्मण कृतकृत्यो भवति । ब्रह्मैव सर्वमिति प्रत्यय उपजायते । स ब्राह्मण कृतकृत्योऽतो ब्राह्मण ॥

राजे आणि माकडें । येक कैसी ॥ १४ ॥
भागीरथीचें जळ आप । मोरी सवदणीचें तेंहि आप ।
कुश्चिळ उदक अल्प । सेववेना ॥ १५ ॥
या कारणें आचारशुद्ध । त्या वरी विचारशुद्ध ।
वीतरागी आणि सुबुद्ध । ऐसा पाहिजे ॥ १६ ॥

ब्रह्मनिष्ठसुद्धा आचारशुद्ध, विचारशुद्ध, विरक्त आणि सुबुद्ध असा पाहिजे असे श्री समर्थ म्हणतात

तुकारामासारखे सत्पुरुषसुद्धा काय सांगतात ते पाहा—

परपीडक तो आम्हां दावेदार । विश्वीं विश्वंभर म्हणवुनी ।

म्हणजे सर्वाभूतीं जरी विश्वंभर असला, म्हणजे एक तत्त्व असले तरी परपीडकाचा तिरस्कार अवश्य केलाच पाहिजे आणि जशास तसें, नेमकें, तत्तोतंत असेंच सापेक्ष वर्तन केलें पाहिजे

तुकाराम एके ठिकाणी म्हणतात की,

" सर्पविंचू नारायण । परी ते वंदावे दुरून ॥ "

सर्पविंचू इत्यादि प्राणीसुद्धा नारायणरूप असले तथापि त्यांना जवळ जाऊन मिठी मारावयाची नाही, तर दुरूनच त्याच्याकडे पाहावयाचें जो जसा भेटेल व जसा असेल त्याच्याशीं त्याचें यथातथ्य स्वरूप समजून घेऊन तसेंच वागणें, हेंच खरें समत्व होय ! तसें वर्तन न घडल्यास हानि होण्याचा प्रसंग येतो

समत्व बुद्धियुक्त ज्ञानी देशकाल पाहतात, कुल, समाज व दश पाहतात, पात्रापात्रविचार करतात आणि घटापुढें भट व 'संटनटापुढें रटनट' आणून सापेक्ष वर्तन करतात एर्‍हवीं निरपेक्ष वर्तन हें कधींच शक्य नाहीं

आता वृत्तीचें किंवा बुद्धीचें समत्व म्हणजे हर्ष, विषाद, शोक, मोह, स्तुति, निंदा, मानापमान, शुभ, अशुभ या सर्व स्थितींत वृत्तीचें स्थैर्य कायम ठेवणें हें होय यालाच गीतेमध्यें 'समत्व योगमुच्यते' असें म्हटलें आहे सिद्धि व असिद्धि या ठिकाणीं वृत्ति सम ठेवून अखंड धर्म करीत राहणें हेंच समत्व होय हें समत्व अंगीं बाणण्याकरितां अनेक कार्ये करावी

लागतात विचार उत्पन्न होण्याचे म्हणजे समत्व ढळण्याचे विविध प्रसंग ज्या वेळेला येतील त्याच वेळी समत्ववृत्ति दृढ होते तात्पर्य समत्व म्हणजे सर्व सारखें व सर्व सारखे म्हणजे ना बरे ना वाईट, अशी जी समजूत आहे ती सर्वथैव चुकीची आहे असो

समाजात ब्रह्मवेत्त्यासंबंधी जशा चुकीच्या कल्पना आहेत तशाच त्या गुरूसंबंधीहि आहेत तथापि त्यांचा विचार विस्तारभयास्तव पुढील प्रकरणावरच टाकणे बरे।

---

प्रकरण ८ वे .

## गुरुकृपा व मोक्ष

गेल्या प्रकरणात मुख्यत शांकरभाष्याधारे मुक्ताच्या स्वरूपाचे विवेचन केले आता आपल्या समाजामध्ये मनुष्याला जें काही मिळते ते गुरूच्या कृपेनेच मिळते, मोक्ष किंवा ब्रह्मज्ञान हे गुरुकृपेवाचून होत नाही जर मोक्ष संपादन करावयाचा असेल तर गुरूलाच शरण जावे, त्याची सर्व प्रकारची सेवा करावी, त्याला प्रसन्न करून घ्यावे म्हणजेच मनुष्य कृतार्थ होतो अशा ज्या समजुती आहेत, त्यांना अनुसरून प्रस्तुत प्रकरणामध्ये गुरूची लक्षणें कोणती, तो कसा असावा, ज्ञानप्राप्ति कशामुळे होते अशा प्रश्नांचा विचार करण्याचे योजिले आहे

प्रथम हे लक्षात ठेवले पाहिजे की आजच्या या ज्ञानयुगामध्ये ज्ञानाची साधनं पुष्कळ सुलभ झाली असल्यामुळें या कालात कोणी गुरूचे महत्व अवास्तव सांगू लागेल तर हसूच येईल मुद्रणकलेने आणि वाहतुकीच्या साधनांनी ज्ञानाची द्वारं सर्वांना सताड उघडी केली असल्यामुळें आज आपणास गुरूचें महत्त्व व श्रेष्ठत्व पूर्वीइतके वाटत नाही, हे सहजच आहे परंतु ज्या काली मुद्रणकला नव्हती, फार काय पण लिपीहि नव्हती, अशा काळी जें ज्ञान

पठणपाठण परंपरेने समाजात वावरत होते त्या वेळी त्या ज्ञानाची व त्या ज्ञानदात्या मनुष्याची किंमत श्रेष्ठ वाटावी, यात काही आश्चर्य करण्याजोगे नाही पूर्वी आजच्यासारख्या मुक्तद्वारी शाळा नव्हत्या ज्ञानाची देवाण-घेवाण ही विशिष्ट वर्गातच होई त्यामुळें विशिष्ट वर्गच ज्ञानसंपन्न असे. सर्वसामान्य समाज हा विद्या व ज्ञान यापासून बराचसा दूर होता

अव्वल इंग्रजीत इंग्रजी जाणणारे दुर्मिळ होते, त्यामुळ इंग्रजी पाच-चार इयत्ता झालेल्याना ओढून नेऊन मामलेदार व मुन्सफ करीत असत ! आज तशी स्थिति आहे काय ? हीच स्थिति फार प्राचीन काळी विद्वानाची असली पाहिजे वेद, वेदांगें, उपवेद, शास्त्रें वगैरे चौदा विद्या जाणणारे लोक समाजात थोडे होते आणि त्यांच्याकडे शिकायचयाला मुद्दा फार थोडेच लोक जात असत म्हणून शिकविणाऱ्याची मिजास एवढी होती की १२।१२ वर्षे शिष्य झाडलोट करीत राहिले तरी ते त्याना शिकवीत नसत अगदी अलीकडील शास्त्री, वैदिक, गवई याच्या आख्यायिका जरी आपण घेतल्या तरी हेच दिसते की बारानबारा चोवीस वर्षे ज्यानी गुरुगृहामध्यें पाहिजे ती गुरुसेवा करून काढली त्यानाच विद्या प्राप्त झाल्या ! !

गुरूचे घरीं झाडितो सारवीतो । मला तो गमे भूतळींचा रवी तो ॥

या प्राकृत कवितेपासून तो गुरुगीतेतील 'गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु' या श्लोकापर्यंत गुरुस्तुति व गुरुसेवा याचेच वर्णन आहे, झाडणे, लोटणे तर राहोच पण मलमूत्र स्वच्छ करण्यापर्यंतची सर्व कामें शिष्यानी केली! गुरुच्या पिकदाण्या धुणे, गाजा चोळून देणे व तंबोरा छेडणे असली कामें कित्येक वर्षे केल्यानतर ज्याना गायनविद्या आली असले गवई आजहि हयात आहेत, पण ते मात्र आज दुसऱ्याकडून पूर्वीप्रमाणे सेवेची इच्छा करीत नाहीत, हहि तितकेच खरे आहे ज्ञानवानाची सख्या कमी असणे व ज्ञानप्रसाराची साधन बिलकुल नसणे, या स्थितींतूनच विद्वान गुरूचे महत्त्व उपस्थित झाल अर्थात् त्या मानानें ब्रह्मज्ञान देणाऱ्या गुरुचे वर्णन देवाइतके झाले असल्यास काहीच आश्चर्य नाही श्वेताश्वेतर उपनिषदामध्यें पुढील श्लोक आहे

यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।
तस्यैते कथिता ह्यर्था प्रकाशन्ते महात्मन ॥

त्यावरून देव व गुरु यांच्या ठिकाणी ज्याची दृढभक्ति असते, त्यालाच हे ज्ञान होतें असें दिसतें पण सांप्रत भौतिक शास्त्राच्या वाढीमुळें पुष्कळसे निसर्ग-नियम कळूं लागल्यामुळे देवाचेंहि महत्त्व कमी झालें आणि विद्वानांची वाढती संख्या व ज्ञानप्रसाराचीं वाढती साधनें यामुळ विद्येची आणि गुरूचीहि अपूर्वाई पहिल्यासारखी राहिलेली नाहीं

आता मोक्षाकरिता गुरुला शरण जाण्यासंबधी तत्त्वज्ञानप्रधान अशा उपनिषदामध्यें काय विचार केला आहे तो पाहू

परीक्ष्य लोकान्कर्मचितान्ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृत कृतेन।
तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणि श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्॥१२॥

प्रथम मुंडक द्वि खं

अर्थ-वेदविद्यासपन्न मनुष्य कर्माच्या योगानें प्राप्त होणाऱ्या लोकाचे परीक्षण करून व नुसत्या कर्मानें आत्मज्ञान होत नाहीं हे पाहून त्याला वैराग्य उत्पन्न होतें अशा माणसानें समिध हाती घेऊन तें आत्मस्वरूप यथातथ्य जाणण्याकरिता वेदविद्यासंपन्न व ब्रह्मनिष्ठ अशा गुरूला शरण जावें

वरील मंत्रात उपभोगलालसा ज्याची कमी झाली त्यानें ब्रह्मविद्येमध्यें निष्णात व वैदिक धर्मामध्यें निष्णात अशा गुरूला शरण जावें, व पुढील मंत्रात अशा विद्वानानें प्राप्त झालेल्या अशा शिष्यास विद्या शिकवावी असें म्हटलें आहे विरक्त असा अधिकारी पाहून अशा ज्ञात्या गुरुनें मस्तकावर हात ठेवून त्याला कृतार्थ करावें असें येथ बिल्कुल म्हटलेलें नाहीं पुढील काहीं मंत्रामध्यें ब्रह्मज्ञानाचीं साधनं सांगितलेलीं आहेत, जर्यात् तींहि विचारार्ह आहेत

वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्था। संन्यासयोगाद्यतय शुद्धसत्त्वा॥
ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले। परामृता परिमुच्यन्ति सर्वे॥६॥

—तृतीय मुंडक द्वि ग

अर्थ-वेदतात्पर्य ज्यांना सुनिश्चित झालें आहे आणि ज्याचें अंत-करण वैराग्यानें शुद्ध झालेलें आहे, ते ब्रह्मलोकामध्यें जाऊन मरणाचे वेळीं मुक्त होतात

या मंत्रात वेदांताचे ज्ञान व विज्ञान (अनुभव) सुनिश्चित पाहिजे व पूर्ण वैराग्यहि पाहिजे. ज्ञान व वैराग्य ही मोक्षाचा साधनें सांगितली आहेत.

सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा । सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम्।
अन्तःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो। यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः ॥५॥

—तृतीय मुंडक प्र. ख.

अर्थ—सत्याने, तपाने, ब्रह्मचर्याने आणि सम्यक् ज्ञानानेच आत्मप्राप्ति होते. ज्यांच्या अंतःकरणातील मल, विक्षेप व आवरण इत्यादि दोष गेलेले आहेत असे यति त्या आत्म्याला आपल्या अंतःशरीरात पाहातात.

येथेंहि सत्य, ब्रह्मचर्य, सम्यक् ज्ञान हेच मोक्षाचे उपाय सांगितले असून सम्यग्ज्ञानहोण्याकरितां गुरूकडे जावे असाच निष्कर्ष निघतो. गुरुकृपा संपादन करून वरदहस्त प्राप्त करून घ्यावा असें यथेंहि म्हटलेलें नाही. याहिपेक्षा साधनाचें स्पष्टीकरण पुढील मंत्रात आहे.

नायमात्मा प्रवचनेन लभ्यो । न मेधया न बहुना श्रुतेन ।
यमेवैष वृणुते तेन लभ्य । तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम् ॥३॥

—तृतीय मुंडक द्वि. ख.

अर्थ—हा आत्मा नुसत्या व्याख्यानाने प्राप्त होत नाहीं, तत्वबुद्धीनें प्राप्त होत नाही किंवा बहुश्रुतपणानेहि प्राप्त होत नाही. तर जो योगी या आत्म्याचा शोध मोठ्या निष्ठेने प्रमाने व सदभावाने करितो त्यालाच तो आत्मा आपले स्वरूप दाखवितो.

येथेंहि तीव्र जिज्ञासा शुद्ध व कुशाग्र बुद्धि हीच आत्मप्राप्तीची साधनं सांगितलेली आहेत. गुरुकृपा व वरदहस्त यांचा मुळीच संबंध नाही.

(तत्वज्ञानप्रधान अशा उपनिषद ग्रंथामध्यें गुरुकडून कानमंत्र घेणे, त्याची सेवा करणें व त्याला प्रसन्न करून घेणें या विषयाचा मागमूसहि नाही. मात्र उत्तरकालीन वेदांतग्रंथामध्यें ही कल्पना अनेक सांप्रदायिकानीं घेतली असल्यामुळें दीक्षागुरुच महत्त्व फार वाढले. वास्तविक त्रैवर्णिकांना उपनयनाचे वेळी जो गायत्री मंत्राचा उपदेश होतो, तीच खरी दीक्षा होय। पण अलीकडे दीक्षागुरु, मोक्षगुरु असे गुरु निघू लागले व त्याचे महत्त्वहि वाढले।

कोणतेहि ज्ञान संपादन करण्याला गुरूची आवश्यकता आहेच आजच्या वैज्ञानिक युगातसुद्धा त्याची जरूर कमी नाही, पण ती जरूरी दिशा दाखविण्यापुरती आहे आणि ती दाखविली गेली म्हणजे बाकीचा मार्ग हा ज्याचा त्यानेच आक्रमण करणेचा आहे जिज्ञासा, बुद्धिमत्ता अवलोकन, दीर्घप्रयत्न याच्या योगाने दिशा कळल्यावर ज्ञानसंपन्न व्हावयाचे असते, परंतु समाजात मात्र अगदी विपरित कल्पना वावरत आहेत)

उपनिषदांमध्ये राजा जनक व याज्ञवल्क्य, नारद व सनत्कुमार, नचिकेता नि यम उद्दालक व श्वेतकेतु इत्यादिकांचे तत्त्वज्ञानविषयक मोठे गंभीर मजेदार संवाद आलेले आहेत पुष्कळ ठिकाणी शिष्य व गुरु असहि नाते आहे पण कोठेहि गुरूने शिष्याच्या मस्तकावर हात ठेवून ब्रह्म दाखविण्याची कृति स्वीकारलेली नाही सनत्कुमार व नारद यांची बरीच प्रश्नोत्तरं झाली आहेत त्याचप्रमाणे जनक व याज्ञवल्क्य, नचिकेता व यम यांचीहि झाली असून तेथें कोठहि, " शिष्या ये, तुझ्या डोक्यावर हात ठेवता व तुला आता कृतार्थ करतो असं म्हटलेले नाही पण आश्चर्य असे की शिष्यसेवेने गुरु संतुष्ट झाला की तो शिष्य मस्तकावर वरदहस्त ठेवतो व तो ठेवल्याबरोबर विजेचे बटन दाबताच जसा प्रकाश पडतो तसा हृदयात ब्रह्मज्ञानाचा प्रकाश पडून तो कृतार्थ होतो, अशी भ्रामक समजूत आहे या समजुतीला उपनिषदादि ग्रंथामध्ये मुळीच आधार नाही भारत, भागवत, गुरुचरित्र आणि अलीकडील प्राकृत ग्रंथ यामध्येंच या कल्पनेला आधार मिळतात, परंतु ते अर्थवादात्मक म्हणजे स्तुतिपर समजले पाहिजेत)

कोणतहि शास्त्रीय ज्ञान संपादन करावयाचे झाल्यास सर्व ठिकाणी गुरूची आवश्यकता सारखीच भासते गुरूकडे जाणे, त्याला प्रश्न विचारणे त्याचेकडून विषयाचे ज्ञान करून घेणे आणि त्याच्या सहवासात राहून त्याची सेवा करणे हे तेज्ञान मिळविण्याचे मार्ग होत श्रीमत् भागवतामध्यें यदु व अवधूत यांचा संवाद आला आहे, त्यात अवधूताने चोवीस गुरू केल्याचे सांगितलं आहे त्या चोवीस गुरूमध्यें पृथ्वी, आप, तेज यासारखे जड पदार्थ, पक्षी, एक लहान मुलगी, पिंगला नामक वेश्या आणि लोहार यांचाहि

समाविष्ट झालेला आहे, म्हणजे इतक्या गुरूंकडून अवधूताने एकेक गुण घेतला व तो अंगी बाणविण्याचा अभ्यास केला, एवढेंच यावरून निष्पन्न होतें. अवधूताच्या या गोष्टीमध्यें गुरुसेवेला फारशी जागाच राहात नाही अर्थात् गुरुसेवाच जेथें नाही तेथें कृपेचा प्रश्न कसा उद्भवणार ?

जिज्ञासु मनुष्य प्रत्येक पदार्थापासून आणि व्यक्तीपासूनहि कणाकणाने ज्ञान संपादन करीत असतो तसा ज्ञानसंचय करून व तो पचवून मनुष्य ज्ञानी होतो उपनिषदामध्येंहि (केन)

' भुतेषुभूतेषु विचिंत्य धीरा: प्रेत्यास्माल्लोकादमृता भवंति । '

असे सांगितले आहे त्या दृष्टीने पाहिल्यास ज्ञान संपादन करण्यास ग्रंथ, व्यक्ति, गुरु व स्वतः चे अवलोकन यांची जरूर असून श्रद्धा, संयम व दीर्घ प्रयत्न यांची जर त्यास जोड मिळाली तर ते ज्ञान मोक्षोपयोगी होते असे दिसते केव्हाहि ज्ञान हे बुद्धीचा विषय असल्यामुळें व ते वस्तुतंत्र असल्यामुळें तेथें गुरुकृपेपेक्षा कुशाग्र बुद्धीचा योग अधिक इष्ट आहे तात्पर्य कृपेने ज्ञान होणार नाही, कृपेने काही मिळणार नाही, तर जें काही मिळवयाचे ते कर्माने व यत्नाने मिळते असाच सिद्धांत आहे

उपनिषदामध्ये गुरुसेवा व गुरुकृपा यांना महत्त्व दिलेलें नसून कुशाग्रता, बुद्धिमत्ता आणि परिश्रम यांना महत्त्व दिलेले आहे प्रणिपात व सेवा ही परिप्रश्नाची अंगें होत कारण कोणाकडेही गेल्यावर (नम्रतेने वागून) आपलेपणा उत्पन्न झाल्याशिवाय कोण कोणाशीं मनमोकळेपणाने बोलणार आहे ? प्रश्नोपनिषदामध्यें पुढील वाक्य आहे

" तान्ह स ऋषिरुवाच । भूय एव तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संवत्सरं संवत्स्यथ । यथाकामं प्रश्नानपृच्छत । यदि विज्ञास्याम: सर्वं ह वो वक्ष्याम इति "

अर्थ— ब्रह्मज्ञान संपादन करण्याकरिता आलेल्या शिष्यांना पिप्पलादि ऋषि म्हणतात, ' पुन्हां एक वर्षपर्यंत तप, ब्रह्मचर्य आणि श्रद्धा यांनीं युक्त होऊन तुम्ही असेच राहा, जसे सुचतील तसे प्रश्न विचारा, व आम्हाला कळेल तसे आम्ही तुम्हास सांगू

याहि वाक्यावरून श्रद्धा, तप, जिज्ञासा व ब्रह्मचर्य हींच ज्ञानसाधनें होत असे ठरतें

छांदोग्योपनिषदामध्ये याहिपेक्षा जास्त स्पष्ट असा ज्ञानप्राप्तीचा मार्ग सांगितलेला असून तेथें गुरुकृपेचा मुळींच संबंध नाही हे वाचकांना पुढील विवेचनावरून कळून येईल

"यथा सोम्य पुरुष गंधारेभ्योऽभिनद्धाक्षमानीय तं ततोऽतिजने विसृजेत्स यथा तत्र प्राङ्वोदङ्वाऽधराङ्वा प्रत्यङ्वा प्रध्मायीता भिनद्धाक्ष आनीतोऽभिनद्धाक्षो विसृष्ट (६-१४-१) तस्य यथाभिनहन प्रमुच्य प्रब्रूयादेतां दिशं गंधारा एतां दिशं व्रजेति सग्रामाद्ग्राम पृच्छन् पंडितो मेधावीगन्धारानेवोपसंपद्येतैवमेवेहाचार्यवान् पुरुषो वेद।"

(६-१४-२)

अर्थ—वत्सा ! ज्याचे डोळे बांधले आहेत असा मनुष्य कंदाहार देशातून आणून पुढें त्याला ओसाड प्रदेशांत सोडावा मग तो ज्याप्रमाणे त्या ओसाड जागी पूर्व, उत्तर, दक्षिण किंवा पश्चिम या दिशेकडे तोंड करून 'डोळे बांधलेल्या स्थितींत आणलेला आणि डोळे बांधलेल्या स्थितींतच सोडलेला असा मी आहे, कोणी तरी साह्य करा' असें मोठ्याने ओरडतो, व ज्याप्रमाणे त्याचें बंधन सोडून, या दिशेकडे गांधार देश आहे त्या दिशेकडे जा असें कोणी तरी त्यास सांगितलें म्हणजे तो चतुर, बुद्धिमान् मनुष्य या गांवाहून त्या गांवास विचारीत विचारीत नेमका जसा कंदाहार प्रांताला जातो, त्याच रीतीनें गुरूचें साह्य घेणारा मनुष्य ब्रह्मज्ञान संपादन करतो.

येथें या गांवाहून त्या गांवास जाणारा मनुष्य जसा विचारीत विचारीत आपले स्थान गांठतो त्याप्रमाणेच जिज्ञासु मनुष्य ज्ञानवानाच्या साहाय्यानें ज्ञान प्राप्त करून घेतो असें म्हटलेले आहे यांत गुरुसेवा व गुरुकृपा याचा मागमूसहि नसून अनेकांच्या साह्यानें मुख्यत स्वत च्या प्रयत्नानें साधकाला संपादिता येतें असेंच उघड दिसतें

आता "तत्वमसि" या महावाक्याचें श्रवण गुरुमुखातूनच घडलें

पाहिजे व तसे झाले की लगेच ब्रह्मज्ञान होते असे जे म्हणतात त्या समजुतीचाहि थोडा विचार करू

तत्त्वमसि हें महावाक्य छांदोग्योपनिषदामध्यें आलेले आहे तेथे पितापुत्राचा संवाद आहे सहाव्या अध्यायातील आठव्या खंडापासून तो सोळाव्या खंडाच्या अखेरपर्यन्त प्रत्येक खंडाचे शेवटी दृष्टांत व दार्ष्टांत याचा समन्वय करून तत्त्वमसि हे वाक्य शेवटी उच्चारलेले आहे हे महावाक्य गुरूनें सांगितल्याबरोबर प्रकाश पडतो व शिष्य कृतार्थ होतो असं येथे मुळीच दिसत नाही कारण श्वेतकेतून मला पुन्हा हें महावाक्य निराळ्या तऱ्हेने समजावून द्या, अशी प्रार्थना केली असून गुरून म्हणजे पित्यान प्रत्येक वेळी निरनिराळे उदाहरण देऊन तच तच तत्त्व वेगवेगळ्या रीतीने समजावून दिलेले आहे, म्हणजे महावाक्य उपदेशरूपाने ग्रहण केल्यावरसुद्धा परिप्रश्न संभवतात हें येथे सिद्ध आहे

आता या महावाक्याचा थोडा निराळ्या दृष्टीने विचार केल्यास असे दिसत की या महावाक्याचे अर्थ किती तरी वेगवेगळे केलेले आहेत सांप्रदायिक आचार्यांनी या वाक्याची ओढाताण अनेक तऱ्हांनी करून त्यातून अनेक सिद्धांत काढलेले आहेत शिवाय हे वाक्यहि हल्ली सामान्य अधिकाऱ्यानासुद्धा इतके परिचित झालेले आहे की त्यातील गूढ असं मुळीच शिल्लक राहिलेले नाही सामान्य जनतेत ब्रह्मविद्येचा प्रचार झाल्यामुळें आणि या महावाक्यांचे कुतूहलहि पूर्वीसारखें राहिलेले नसल्या-मुळें त्या वाक्याचा उपदेश होताच यक्षिणीची कांडी [illegible]र्शविल्याप्रमाणे शिष्याच्या अंतःकरणात ब्रह्मज्ञान ठसते हे म्हणणे सर्वस्वी चुकीचे आहे अर्थात् महावाक्याचे श्रवण, मनन, निदिध्यास या साधनानीच साधकाने ज्ञानसंपन्न व्हावयाचे असते गीतेतहि या स्वतःच्या प्रयत्नालाच प्राधान्य दिलेले आहे

श्रीमत् भगवद्गीतेमध्यें भगवंतानी अर्जुनाला त्याच्या डोक्यावर हात ठेवून मुळीच कृतार्थ केलेले नाही किंवा 'मी सांगतो तें तू ऐक' असेहि म्हटलेले नाही तर मी जें सर्व सांगितले ते ऐक, त्याचा नीट विचार कर, तुला पटेल त्याप्रमाणे वाग असेच शेवटी सांगितले आहे

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया
उपदेक्ष्यति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ गीता अ ४ श्लो ३४

यथें ज्ञान हे प्रणिपाताने परिप्रश्नाने व सेवेने मिळते असे सांगितलेले आहे प्राचीन काळी गुरुला शिष्याच्या सेवेची अपेक्षा हल्ली पेक्षा जास्त होती आणि गुरुची मर्जी प्रसन्न राहून त्याने प्रसन्नतेने उत्तर द्यावीत म्हणून शिष्य हे सेवाहि करीत असत हल्ली पूर्वीसारख्या सेवेची जरूरी नाही व अपेक्षाहि नाही तथापि विनय नम्रता दक्षपणा याची जरूर आहे श्रीसमर्थेहि दासबोधामध्यें केवळ सेवा करणाऱ्या शिष्यापेक्षा सावध, साक्षपी दक्ष आणि प्रज्ञावंत शिष्यालाच महत्त्व देतात शिष्य प्रज्ञावंत पाहिजे अनन्य पाहिजे म्हणजेच त्याला ज्ञानप्राप्ति होते

सावध साक्षेपी विशेष । प्रज्ञावंत आणि विश्वास ।
तयास साधनीं सायास । करणेंचि नलगे ।। दा बो ६।८।४९

ज्ञान हा विषय बुद्धीचा आहे प्रज्ञा हीच यथें मुख्य आहे प्रज्ञाहीन व भावनाप्रधान शिष्यच सेवेत विशेष तत्पर राहातात बुद्धिमान मनुष्य विशेषत शारीरसेवातत्पर नसतो तात्पर्य सेवा ही गौण असून नम्रता, बुद्धिमत्ता आणि जिज्ञासा यामुळेंच ज्ञान प्राप्त होते आणि ते ज्ञान गुरुकडून म्हणजे ज्ञात्याकडून एकदा समजून घेतल्यानंतर

तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति । गीता अ ४ श्लो ३८

ते ज्ञान योगसंसिद्ध पुरुष स्वत आपल्या ठायीं कालकरून अभ्यासाच्या योगानें प्राप्त करून घेतो म्हणजे ज्ञानाचा परिपक्वता ही स्वतःचा मूल अभ्यास आणि परिश्रम यावरच अवलंबून असते गुरुकृपेचा व वरद हस्ताचा काही संबंध नाहीं असें गीतेवरूनहि सिद्ध होते

श्रीमत भागवतामध्येंसुद्धा गुरूला शरण जावें असें लिहिलेलें आहे व त्याचाच अनुवाद पुष्कळ प्राकृत ग्रंथामध्यें साधुसंतांनींहि केलेला आहे तेव्हा त्याचाहि विचार करणें योग्य होय त्यामुळें गुरूचीं लक्षण कोणती हे समजून येईल

तस्मात् गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम् ।
शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम् ।।
—भा स्कं ११ अ ३ श्लो २१

निरपेक्ष मुनिं शान्त निर्वैरं समदर्शनं ।
अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यङ्घ्रिरेणुभिः ॥
—भा. स्कंद ११ अ. १८ श्लो. १६

वरील दोन श्लोकावर श्रीएकनाथांनी चांगलं निरूपण केलेलं आहे. ते म्हणतात, 'उसाचा घाणा जसा करकर वाजतो परंतु स्वतः तो कोरडा असतो, तसा जो गुरु वक्तृत्वाने कितीहि ज्ञान दाखवूं लागला तरी ते कोरड्या पाषाणासारखेंच होय ! त्या बडबडीनं योगक्षेम चालेल, प्रतिष्ठा मिळेल, पण ब्रह्मज्ञानाचा गंधहि असणार नाही. असला गुरु ही अगदी निरुपयोगी होय ! जो तटस्थ, इंद्रियनिग्रही आणि द्वैतभावाने शून्य असेल तोच खरोखरी अधिकारी होय. त्याच्या सद्गुरुबद्दलचं मत त्यांच्याच शब्दांत देतो.

एवं अनुभवा आले ब्रह्म । फिटला बाध्यबाधकतेचा भ्रम ।
मोडलें द्वैत भावाचें कर्म । जगीं विषम असेना । अ. ३ श्लो. ९२
तरी तो कायावाचामनें । अति कृपाळू दीनाकारणें ।
तोडी शिष्यांची भवबंधनें । उठवी ठाणें अहंकाराचें ॥ ९७ ॥
जो शब्दज्ञान पारंगतू । ब्रह्मानंदें सदा डुल्लतू ।
शिष्यप्रबोधनीं समर्थू । यथोचित् निजभावें ॥ ९८ ॥
आपुल्या योगक्षेमाचें सांकडें । स्वप्नींहि न घाली शिष्याकडे ।
शिष्यसंकट अतिगाढें । निवारी रोकडें निजांगें जो ॥ १०४ ॥
मी एक अकर्ता निजात्मयोगी । म्हणौनि विषयातें न भोगी ।
अथवा विषयो निःशेष त्यागी । हाहि आग्रहो अंगीं असेना ॥ १०५ ॥
तो विषय भोगी ना स्वयें त्यागी । तो अदृष्टाच्या निजविभागीं ।
लावूनिया देहाच्या अंगीं । परब्रह्म योगी विचरत ॥ १०६ ॥

आता 'निरपेक्ष मुनिं शांत' या श्लोकावर जी त्यांची विस्तृत टीका आहे त्यांतील केवळ निरपेक्षता या पदावरील टीका वाचकापुढें ठेवतो.

आटाटीवीण न प्रार्थितां । अयाचित अर्थ प्राप्त होतां ।
तोहि हातीं घेवों जातां । निरपेक्षता बुडाली ॥ १६३ ॥

अर्थ देखोनि लविनला । तो जाण लोभें वोणवा वेला ।
तोहि उपेक्षूनि जो निघाला । तो म्या वदिला सर्वस्व ॥ १६४ ॥
मार्गी अर्थ पडता । कोणी माझा नाहीं म्हणता ।
नोहि स्वयें हातीं घेता । निरपेक्षता बुडाली ॥ १६५ ॥
वृत्तिशून्य जे अवस्था । ती नाव जाण निरपेक्षता ।
ते काळीची जे मननता । एक तत्त्वता सागेन ॥ १६६ ॥
निरपेक्षता आणि माझें मनन । शाति आणि समदर्शन ।
पाँचवे ते निर्वैर जाण । पाच लक्षण हे मुख्यत्वे ॥ १८० ॥
असो पचलक्षण कथा । एक निरपेक्षता आल्या हाता ।
पाया लागे सायुज्यता । पूण ब्रह्मता ठसावे ॥ १८१ ॥

वर ज्या श्रीएकनाथाच्या ओव्या दिलेल्या आहेत त्यावरून अगदी प्राकृत माणसालासुद्धा ब्रह्मज्ञानी गुरु कसा असावयास पाहिजे हे समजून येईल जो शिष्याचे भवबधन तोडतो, त्याचा अहकार नष्ट करतो, प्रबोध-शक्तीने जो शिष्याचे सशय निवारतो, ब्रह्मानदात स्वत सदा निमग्न असतो, आपल्या योगक्षेमाचे सकट जो दुसऱ्यावर घालीत नाही आणि जो इतका निस्पृह व निरपेक्ष असतो की काही न मागता जरी कोणी द्रव्य आणून दिले तरी तो त्यास शिवतहि नाहीं, तोच खरा ब्रह्मनिष्ठ गुरु होय ! निरपेक्षता हेच मुख्य लक्षण असे नाथानी अट्टाहासाने सागितले असून अन्यत्रहि निरपेक्षता हेच परमार्थाचे नाक होय असे म्हटलेले आहे

परमार्थी मुख्य विवेक । निरपेक्षता हेंचि नाक ।
तेणेंविण निर्नासिक । केंचें सुख परमार्थिया ॥

परतु इतके स्पष्ट विवेचन असूनसुद्धा लोकाची दृष्टीच जेथें विघडलेली आहे तेथें कोण काय करणार ?

आजकाल लोक ज्याच्या नादी ब्रह्मनिष्ठ म्हणून अगर सद्गुरु म्हणून लागतात, त्याच्या ठिकाणी सत्या ज्ञात्याची लक्षणे आहेत किंवा नाहीत याचा पडताळा पुष्कळ प्राकृत ग्रथावरूनहि घेता येण्याजोगा आहे श्रीमत् दासबोधामध्ये दशक पाच, दशक आठ व पधरा अशा अनेक ठिकाणी गुरुलक्षण, शिष्यलक्षण, गुरुनिश्चय यासबधी पुष्कळ विचार केलेला आहे

तो सगळा येथे देणे अशक्य आहे कल्पना येण्यापुरते येथे दिग्दर्शन केलेले आहे वाचकानी ह्याचे मनन केले तरी सुद्धा कार्य होईल

महाराष्ट्रभाषेमध्यें गुरुभक्तीचे आणि गुरुकृपेचे अतिशय वर्णन गुरुचरित्र व ज्ञानेश्वरी या ग्रथात केलेलें आहे गुरुचरित्रातील सर्वच विवेचन (आख्याने, गोष्टी आणि सकाम भक्ति) प्रज्ञाहत करणार असल्यामुळें तो ग्रथ तर्कदृष्ट्या विचारातच घेण्याजोगा नाही पण ज्ञानेश्वरीसारखा उत्कृष्ट व आद्य मराठी वेदातग्रथ त्याचा विचार केल्यावाचून भागणारच नाही कारण मराठी भाषेमध्यें जितके काही गुरुस्तुतिपर ग्रथ आहेत त्याचा उगम ज्ञानेश्वरीपासूनच आहे तेव्हा ज्या ज्ञानेश्वरानी एवढी गुरुमहती गायिली त्यानी केवळ गुरुकृपेमुळें व वरदहस्तामुळेंच कृतार्थता येत असे म्हटले आहे वा मानवाला अतरग साधने व स्वत चा अभ्यास या स्वावलबनाच्या मार्गानेच ज्ञानप्राप्ति होते असे लिहिले आहे, याचा थोडा विस्ताराने विचार करून हे प्रकरण आटोपतो

श्रीज्ञानेश्वरानी ज्ञानेश्वरीत, अमृतानुभवात आणि आपल्या स्फुट अभगामध्येंहि गुरुभक्तीचे व गुरुकृपेचे वर्णन अतोनात केलेले आहे जणू काही सर्व भूतविषयक लीनता म्हणजे गुरुभक्ति होय असे त्या विवेचनाचे स्वरूप आहे ज्ञानेश्वराची गुरुभक्ति अलौकिक व प्राकृत पुरुषाच्या आकलनशक्तीच्या बाहेरची दिसते प्रचलित असलेल्या सर्व पारमार्थिक सप्रदायात जें गुरुभक्तीचे वरेच स्तोम आहे, त्यास अशत ज्ञानेश्वरानी प्रगट केलेली गुरुभक्ति ही कारणीभूत झालेली असावी असे दिसते

गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु गुरुर्देवो महेश्वर ।
गुरु साक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नम ॥ गुरुगीता

या गुरुगीतेतील श्लोकाप्रमाणे ज्ञानेश्वराची गुरुभक्ति होती पुन पुन्हा गुरूचे अभिवादन त्यानी किती तरी ठिकाणी केले आहे ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायाचे शेवटी ज्ञानेश्वरानी एका सुदर रूपकाने गुरुस्तुति केली आहे दहाव्या अध्यायाच्या प्रारभीं गुरूचा अनुग्रह हाच कोणी गणेश असे समजून त्याची स्तुति केली आहे अध्याय बारामध्ये सद्गुरूच्या कृपादृष्टीचे स्तवन आहे अध्याय तेरामध्यें आत्मरूप गणेशाचे नमन करून अध्याय

चौदामध्यें आचार्यनमन व प्रसादयाचना केली आहे. अध्याय पंधरामध्यें श्रीगुरुचरणाची मानसपूजा करून सोळाव्याचे प्रारंभीं सद्‌गुरु हाच कोणी चित्सूर्य असें समजून स्तुति केली आहे. अध्याय सतरा व अठरामध्येंहि गुरुस्तुतीचा अगदी वर्षाव केला आहे, तथापि माझ्या वाणीनें सत्य बोलण्याचें तप पुष्कळ कल्पें केलें म्हणूनच हा ग्रंथ माझ्या हातून बाहेर पडला असेंहि त्यानी म्हटलेले आहे.

गीतेचा उपसहाररूप जो अठरावा अध्याय त्यावर टीका करतांना श्लोक ४६ ते ५६ पर्यंत श्रीज्ञानेश्वरानी साधकास योग्य आणि शास्त्रसिद्धांताशीं सुसंगत असेंच विवेचन केलेलें आहे. तें चिकित्सक जिज्ञासूंकरितां येथें संक्षेपतः देतों.

अध्याय अठरा श्लोक ४२ ते ४५ अखेर चार वर्णाची स्वभावज कर्में सांगितलीं; व तीं कर्में करीत असतानाच (ईश्वरार्पण बुद्धीनेंच ती केल्यास) वैराग्यरुपी सिद्धि कशी प्राप्त होते, हें सांगितले. निष्कामतेनें आपापलें कर्म करणारा मनुष्य वैराग्याच्या क्षेत्रांत पदार्पण करतो.

मोक्षफळें दिधली वोल। जें सुकृत तरूचें फूल।
तयें वैरागी ठेवीं पाऊल। भवरूं जैसा ॥९०२॥
अगा जयाचे विहित। ते ईश्वराचें मनोगत।
म्हणोनि केलिया निभ्रांत। सापडेचि तो ॥९११॥

प्रत्येकानें आपापलें कर्म करून ज्यापासून हे जग उत्पन्न झालें, त्याला ते अर्पण करावे हीच ईश्वराची पूजा होय! ईश्वराची पूजा गंधपुष्पादिकांनीं न करतां स्वकर्मकुसुमानेंच ती करावी असें गीतार्थाला धरून ज्ञानेश्वर सांगतात.

तया सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्मकुसुमाची वीरा।
पूजा केली होय अपारा। तोषालागीं ॥९१७॥

यापुढें परधर्मापेक्षां स्वधर्मच श्रेष्ठ कसा व स्वभावनियत कर्म करण्यांत दोष कसा नाही, कोणतेंहि कर्म करण्यांत दोष दिसला, तरी तिकडे लक्ष का देऊं नये, इत्यादि विवेचन झाल्यावर पुढें ४९ श्लोकावरील टीकेंत ज्ञानेश्वरांनी फार सुंदर सिद्धांत सांगितला आहे. देह, स्त्री, पुत्र यावद्रुप

अनासक्ति उत्पन्न झाली, मन व इंद्रिय स्वाधीन झालीं म्हणजे नैष्कर्म्यसिद्धि कशी प्राप्त होते याचा क्रम येथ सांगितला आहे

असक्तबुद्धि सर्वत्र जितात्मा विगतस्पृह ।
नैष्कर्म्यसिद्धिं परमां सन्यासेनाधिगच्छति ॥ गी अ १८ श्लो ४९

तैसे एकयाचिये मुठी । माजिवडें चित्त किरीटी ।
बन्धनी वेची नेहटी । आत्मयाच्या ॥ ९६१ ॥
तेव्हां दृष्टादृष्ट स्पृह । निमणे जालेचि आह ।
आगी दडपलिया धुय । राहिजे जैसे ॥ ९६२ ॥
म्हणौनि नियमिलिया मानसीं । स्पृहा नासोनि जाय आपैसी ।
किंबहुना तो एसी । भूमिका पावे ॥ ९६३ ॥
पैं अन्यथा बोध आघवा । मावळोनी तया पाडवा ।
बोधमात्रींची जीवा । ठाव होय ॥ ९६४ ॥
घरवणी वेच सरे । तैसे भोगें प्राचीन पुरे ।
नव तव नुपवरे । काहींचि कर्म ॥ ९६५ ॥
ऐसी कर्मे साम्य दशा । होय तव वीरेशा ।
मग श्रीगुरु आपैसा । भटजि गा ॥ ९६६ ॥
रात्रीची चौपाहरी । वेचलिया अवधारा ।
डोळिया तमारी । मिळे जैसा ॥ ९६७ ॥
का यऊनि फळाचा घड । पारुषवि केळीची वाढ ।
श्रीगुरु भटोनि करी पाड । मुमुक्षु तैसा ॥ ९६८ ॥
मग आलिंगिला पूर्णिमा । जैसा उणीव सांडी चंद्रमा ।
तैसे होय वीरोत्तमा । गुरुकृपा तया ॥ ९६९ ॥
तेव्हा अबोधमात्र असे । तो तव तया कृपा नासे ।
तेथे निशिसवे जैसे । आंधार जाय ॥ ९७० ॥

## ओव्याचा भावार्थ

अंत करण अन्तर्मुख करून मी ब्रह्म आहे या सिद्धांतावर चित्ताला गाडून म्हणजे माजवून, आत्म्याचाच वेध जो चित्ताला लावतो, आणि दृष्ट व अदृष्ट विषयाकडे जो ढुकून पाहात नाही अशा साधकाचा अन्यथा बोध

म्हणजे माझा देह आहे हा बोध नष्ट होतो, आणि मी ब्रह्म आहे एवढें भान राहते त्या स्थितीत क्रियमाण उपद्रव देत नाही, संचयाचा नाश होतो व प्रारब्ध भोगून संपवावे लागते. याप्रमाणें ईश्वरार्पण बुद्धीने कर्म करीत करीत निष्कामतेने जेव्हा साम्यबुद्धि प्रगट होते, त्या वेळी **सद्गुरु आपोआप भेटतात.** गुरु हा शोधावा किंवा धुंडाळावा लागत नाही. तर अधिकार प्राप्त झाल्यावर गुरु आपोआपच भेटतो. रात्रीचे चार प्रहर संपले की सूर्योदय जसा आपोआप होतो किंवा कळीला घड पडल्यावर वेळीची वाट जशी आपोआप सुटते, जयया चंद्राला पूर्णिमेने आलिंगन दिल्यावर जशी त्यातील उणीव नष्ट होते, त्याप्रमाणच अधिकारसंपन्न असा साधक झाला की गुरु त्याला कृतार्थ करतो. अनासक्तीने कर्में करण्याची सवय झाली म्हणजे वृत्तीत समत्व येते आणि साम्य स्थिति पावली की सद्गुरु आपोआप भेटतात. असे ज्ञानेश्वरांनी अन्यत्र स्फुट अभंगामध्येंहि म्हटलेले आहे. आवटेमुद्रित गाथा पंचकातून येथें तीन स्थळें देतो.

(क्र ७४६) अवचित दैवयोगें सद्गुरु भेटला कृपाळु ।
( ७४८ ) तेणें मी जात होतो मग सहज भेटला सद्गुरु ।
( ७५० ) करचरण विव्हल गेले तंव भेटले निवृत्ति ।

तुकारामानी सुद्धा अधिकार प्राप्त झाल्यावर गुरु आपोआप भेटतात असे म्हटले आहे ( पुढें प्रकरण १२ पाहा )

स्वकर्तव्य सोडून म्हणजे कर्तव्याशी बेईमान होऊन जे लोक आज हा बुवा तर उद्या तो बुवा, आज हा महाराज तर उद्या तो महाराज असे शोधत हिंडतात त्यानी ज्ञानेश्वरांचे वरील मत पुन्हापुन्हा अभ्यासावे. स्वतःचा अधिकार वाढवून स्वतःच्या यत्नानें मिळणारी गोष्ट म्हणजे ज्ञान ही होय ! गुरु उद्धार करतो हे खोटें आहे. तर ' उद्धरेदात्मनात्मानं ' हेंच खरें आहे. गुरु म्हणजे देशिक—दिशा दाखवितो तो. दिशा दाखविणें हें काम गुरूचे, पण त्याप्रमाणे वागून पुढील मार्ग आक्रमिणें हें काम शिष्याचे आहे. **गुरु डोक्यावर हात ठेवतो व शिष्याला ब्रह्म दाखवितो हे अगदी झूट आहे.** गुरु तर राहोच पण परमेश्वर जरी प्रसन्न झाला तरी तोसुद्धा मोक्षाचे गाठोडें आणून देत नाही. जें काही मिळते तें यत्नानेच मिळते. हा

सिद्धांत परमार्थातहि निष्ठुरतेने सांगितला आहे. म्हणून प्रथम अधिकार प्राप्त करून घ्यावा म्हणजे मग तीव्र जिज्ञासेमुळें कोणी तरी तज्ज्ञ आपोआप भेटतो. तो भेटल्यानंतर शंका विचारून समाधान करून घ्यावें व पुढील मार्ग आक्रमावा असें ज्ञानेश्वर म्हणतात.

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।**
**समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥** गी. अ. १८ श्लो.५० ॥

तैसें जया कोण्हासि दैवें । गुरुवाक्य श्रवणाचिसवें ।
द्वैत गिळोनि विसंवे । आपणया वृत्ति ॥ ९८८ ॥
तयासी मग कर्म करणें । हें बोलिजेलचि कवणें ।
आकाशा येणें जाणें । आहे काई ॥ ८९ ॥
म्हणौनि तयासि कांहीं । विशुद्धि करणे नाहीं ।
परी ऐसें जरी हें कांही । नव्हे जया ॥ ९० ॥
कानांवचनाचिये भेटी । सरिसाची पैं किरिटी ।
वस्तु होऊन उठी । कवणी एक जो ॥ ९१ ॥
येऱ्हवी स्वकर्मचिनि वन्ही । काम्यनिषिद्धाचिया इंधनीं ।
रज तम कीर दोन्हीं । जाळिली आधीं ॥ ९२ ॥
पुत्र वित्त परलोक । यया तिहींचा अभिलाख ।
घरीं होय पाईक । हेंहि जालें ॥ ९३ ॥
इंद्रियें सैरा पदार्थीं । रिगता विटाळली होतीं ।
तिये प्रत्याहारातीर्थीं । न्हाणिली कीर ॥ ९४ ॥
आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरी अर्पूनि सकळ ।
घेऊनि केले अढळ । वैराग्यपद ॥ ९५ ॥
ऐसी आत्मसाक्षात्कारीं । लाभे ज्ञानाची उजरी ।
ते सामग्री कीर पुरी । मेळविली ॥ ९६ ॥
आणि तेचि समयीं । सद्गुरु भेटले पाही ।
तेवींचि तिहीं कांहीं । वंचिजेना ॥ ९७ ॥
परी वोखद घेतखेंवो । काय लाभो आपला ठावो ।
का उदयजितांचि दिवो । मध्यान्ह होय ॥ ९८ ॥

सुक्षेत्री आणि बोलटे । बीजही परिल गोमट ।
तरी आलोट फळ भेटे । परी वळ की गा ।। ९९ ।।
जोडला मार्ग प्राजळ । मीनला सुमगाचाही मेळ ।
तरी पाविजे वाचूनि वेळ । लागेचि की ।। १००० ।।
तैसा वैराग्य–लाभ झाला । वरी सद्गुरूही भेटला ।
जीवी अंकुर फुटला । विवेकाचा ।। १ ।।
तेणें ब्रह्म एक आथी । येर आघवीचि भ्राति ।
देही धीर प्रतीती । गाढ केली ।। २ ।।
परी तेचि जें परब्रह्म । सर्वात्मक सर्वोत्तम ।
मोक्षाचेही काम । सरे जेथ ।। ३ ।।

गुरुमुखातून तत्वमसि या वाक्याचे श्रवण होताच जो द्वैत गिळून टाकतो व वस्तुरूप होऊन जातो त्याची गोष्ट निराळी असा तीव्र अधिकारी फारच विरळा म्हणजे अब्जामध्यें एखादा वाकीच्याशी श्रमानेच काम्य-निषिद्ध कर्मे सोडून, स्त्री, पुत्र व गृह याची आसक्ति सोडून, स्वधर्माचरणाचे फळ ईश्वराला अर्पण करून वैराग्यसपन्न झाले पाहिजे अशा स्थितीत सद्गुरु आपोआप भेटतात पण ते टल्याबरोबर कृतार्थता येते असे मात्र नव्हे सद्गुरु म्हणजे वाट दाखविणारा वाट दाखविल्याबरोबर मार्गाचे आक्रमण होते असे नाही, मार्ग हा ज्याचा त्यानेच आक्रमिला पाहिजे, आणि इष्ट स्थळ गाठले पाहिजे औषध घेतल्याबरोबर आरोग्यप्राप्ति होत नाही सूर्य उगवल्याबरोबर जसा माध्यान्हकाळ होत नाही उत्कृष्ट बी उत्कृष्ट जमिनीत पेरल्याबरोबर जस लगेच पीक येत नाही, तर कालान या गोष्टी जशा घडतात, तसाच यत्न व दृढाभ्यास यानीच साधक सर्वोत्तम स्थितीला पोचतो

ज्या ज्ञानेश्वरानी एवढे गुरुचे महत्व गायिले, तेच ज्ञानेश्वर वर वाय म्हणतात हे पाहिले की समाधानामुळें वाचकाचे संशय नाहीसे होतील ज्ञानेश्वराच सागणे जरी वाङ्मययुक्त, भावनामिश्रित असे असले तरी त तर्कशुद्ध व शास्त्रशुद्ध आहे आता ज्याला सिद्ध समजतात म्हणजे पूर्ण ब्रह्मनिष्ठ समजतात त्याची लक्षणे कोणती हें ज्ञानेश्वराणी पुष्कळ ठिकाणी

सांगितलेलें आहे तथापि येथेंहि जाता जाता त्याचा निर्देश करून हे करण आटोपतो

साधकाचा अधिकार वाढला व त्याला सर्वात्मकता आली म्हणज त्याची स्थिति कशी होते ह पाहा

जें प्रज्ञा आतुलीकडे । न समाती बाहेरी वोसडे ।
वसती पद्मखडे । द्रुती जैसी ॥ ज्ञा अ १४–२०६
सर्वेंद्रियांच्या आंगणीं । विवेक करी राबणी ।
साचचि करचरणीं । होती डोळे ॥ २०७ ॥
राजहंसापुढें । चाचूचे आगरडें ।
तोडी जेवीं झगडें । क्षीरनीराचें ॥ २०८ ॥
तेवीं दोषादोष विवेकीं । इंद्रियेंचि होती पारखी ।
नियम वा रे पायिकी । वोळगे तें ॥ २०९ ॥
नायिकणें ते कानचि वाळी । न पाहणें त दिठीचि गाळी ।
अवाच्य ते टाळी । जीभचि गा ॥ २१० ॥
वातीपुढा जैस । पळो लागे काळवखें ।
निषिद्ध इंद्रियां तैसें । समोर नोहे ॥ २११ ॥
धाराधर काळे । महानदी उचंबळे ।
तैंसी बुद्धि पघळे । शास्त्रजातीं ॥ २१२ ॥
अगा पुनवेच्या दिवशीं । चद्रप्रभा धावे आकाशीं ।
ज्ञानीं वृत्ति तैंसी । फाके सैंघ ॥ २१३ ॥
वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे ।
मानस विटे । विषयावरी ॥ २१४ ॥

ज्ञान होण्याला साधकाच्या ठिकाणी सत्त्वशुद्धि व्हावी लागते ती सत्त्व शुद्धि झाली म्हणजे सर्व इंद्रियांच्या ठिकाणी विवेक येतो गुण कोणता दोष कोणता, काय ऐकावें काय न एकावे, काय खावें काय न खावें, ह सर्व त्या त्या इंद्रियांना स्वाभाविक कळते बुद्धि अत्यंत शुद्ध होते व ती पाहिजे त्या विषयांत प्रविष्ट होते प्रकाशापुढे जसा अंधार राहात नाहीं त्याप्रमाणें

या साधकाच्या वृत्तीपुढें 'अशक्य असें कांहीं नसतें.' अमानित्वादि लक्षणें त्याचे ठिकाणीं दिसतात. संभावितपणाचें ओझें होतें, मोठेपणाचे संकट वाटतें, लोकाचे नमस्कार घेणें जिवावर येतें, आपला मान व कीर्ति याचा कंटाळा येतो. विद्वत्तेचा वडेजाव नको व लौकिकाचें नांव नको, असें त्याला होतें. परोपकार, दान, पुण्य यांचा उच्चारहि करवत नाही, शेतकरी जसें पेरल्याबरोबर झांकतो, कुलवधु नम्रता व लज्जा यांमुळें थांग झांकून चालते. तसा हा अधिकारी पुरुष अत्यंत संकोचानें वागतो. देहाविषयी उदासीनता, कार्याविषयीं अत्यंत हौस, शरीरभोगाकडे दुर्लक्ष पण इतरांना सुख व्हावें म्हणून अत्यंत यत्न; एवंगुण विशिष्ट लक्षणें आपोआपच येऊं लागतात. साधक दशेंत योग्य मार्गानें जाणाऱ्या मुमुक्षूला क्रमाने ज्ञानप्राप्ति होते. अर्थात् सिद्धावस्थेमध्यें त्याचें वर्तन इतरांना उदाहरणीयच असतें. पाहिजे तसें वागणें, अनाचार करणें, दुराचार वाढविणें हे चाळे त्याचेकडून होत नसतात. ज्ञानेश्वर म्हणतात,

मार्गाधारें वर्तावें । विश्व हे मोहरें लावावें ।। अलौकिक नोहावें । लोकाप्रति ।। अ.३–७१ ।। तेयें सत्क्रियाची लावावी । तेचि एकी प्रशंसावी ।। नैष्कर्मींहि दावावी । आचरोनी ।। ज्ञा. अ. ३–७४

सिद्ध पुरुषानें, अलौकिक, विक्षिप्त, चमत्कारिक असें वागूं नये; तर लोकांनी मार्गाला लागावें म्हणून स्वतः सदाचारानें वागून लोकांना तोच आचार शिकवावा. यावरून सत्पुरुष व दुराचार हा संबंध सर्वस्वी अशक्य होय; जेथें हे दोन शब्द असतील तेथें सत्पुरुषत्व नाही, असें खास समजावें. कारण,

जया निजेल्याते उपासी । वैराग्य गा ।। ज्ञा अ. ९–१८८

जयाचे लीलेमाजी नीति । जियाली दिसे ।। ज्ञा. अ. ९–१९२

जे निजले असतांना त्यांची सेवा वैराग्य हें नोकराप्रमाणें करतें व ज्यांच्या लीलेमध्येंसुद्धां नैतिक सिद्धांत आढळतात तेथें अनीतीचा संबंध येईल तरी कसा ?

सिद्ध पुरुष प्राकृतासारखें बोलत नसतो. तो नेहमीं थोडक्यांत सिद्धांत बोलत असतो. त्याची सिद्धांत वाणी ही त्याच्या स्थितप्रज्ञतेची दर्शक असते. श्रीज्ञानेश्वर म्हणतात:—

तैसी दशेची वाट न पाहता । वयसेचिया गावा न येता ।
बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥ ज्ञा अ ६–५३
तियें सिद्धप्रज्ञेचेनि लाभें । मनचि सारस्वतें दुभे ।
मग सकळ शास्त्रें स्वयंभें । निघती मुखें ॥ ज्ञा अ ६–५४
तेनें दुर्भेद जे अभिप्राय । या गुरुगम्य हन ठाय ।
तेथ ससरेवीण जाय । बुद्धि तयाची ॥ ज्ञा अ ६–५९

---

प्रकरण ९ वें

## श्रद्धा, भावना व अर्थवाद

गेल्या प्रकरणात ज्ञानानेच मोक्ष मिळतो, ते ज्ञान जिज्ञासा, चिकाटी, श्रम, बुद्धिमत्ता व स्वावलंबन या साधनांनी मिळवावयाचे असते, ज्ञानाचा व गुरुकृपेचा संबंध लोक समजतात तसा नाही, इत्यादि विवेचन केले. तसेच गुरुमहति जी काही ठिकाणी अवास्तव वर्णिली आहे ती अर्थवादात्मक म्हणजे केवळ स्तुतिपर मानावी लागते, असेहि सांगितले. तथापि गुरु-वर (मग तो कसाही असो) श्रद्धा असली म्हणजे ती श्रद्धाच तारक होते, भावाशिवाय काही नाही. गुरुवर दृढ विश्वास ठेवावा म्हणजे त्या श्रद्धेमुळेच आपण तरून जातो असा एक समाजात लोकभ्रम आहे, म्हणून प्रस्तुत प्रकरणात श्रद्धा, भावना आणि अर्थवाद यांचा थोडासा विचार करतो.

"शास्त्रेषु गुरुवाक्येषु विश्वास" = श्रद्धा अशी श्रद्धेची व्याख्या केली आहे, म्हणजे शास्त्रसिद्धांत आणि गुरूने सांगितलेले 'तत्त्वमसि' इत्यादि वाक्य यांतील सिद्धांतावर तो पटत असेल तर श्रद्धा ठेवावी, असा याचा अर्थ आहे. शास्त्रावर विश्वास म्हणजे पोथ्यापुस्तकावर नव्हे किंवा गुरु-वर विश्वास म्हणजे माणसावर विश्वास नव्हे! तर शास्त्रप्रतिपादित जो सिद्धांत आणि गुरु म्हणजे अधिकारी माणसाने वर्णन केलेले जे प्रमेय ते जर सत्य असेल आणि ते युक्तीला व बुद्धीला पटत असेल तर त्यावर

विश्वास ठेवणे असाच या श्रद्धा शब्दाचा अर्थ आहे संशय, विपर्यय, शंका, आशंका, तर्क आणि अनुमान यानी सिद्ध केलेले जें तत्त्व अथवा प्रमेय त्यावर श्रद्धा ठेवावी व तसे वागावे यांत काहीच गैर नाही अग्नीचे ठिकाणी उष्णता आहे, सूर्याचे ठिकाणी प्रकाश आहे आकाशाचे ठिकाणी शब्द वाहक शक्ति आहे, इत्यादि सिद्धांत खरे मानून, माणसाने चालावे आणि असेच शोध करून आणखी काही प्रमेयें शोधून काढावीत परंतु असे काही न करता केवळ गुरुमहाराज सांगतात म्हणून पुत्रप्राप्तीकरिता काही तरी मंतरतंतर व जादूटोणे करणे किंवा उद्योग न करता द्रव्यप्राप्त्यर्थ अनुष्ठाने करीत बसणे, हे असमंजस होय ! चमत्कारावर जे लोक फाजील विश्वास ठेवतात तेच लोक असल्या गुरुवाक्यावरहि विश्वास ठेवीत असतात गुरुमध्ये काही अद्भुत सामर्थ्य आहे ही समजूतच जेथें चुकीची तेथें श्रद्धा काय करणार ? गुरुचा मूर्खपणा, आचकट विचकट बोलणें आणि वेडेवाकडे आचार या सर्वांचे समर्थन पुष्कळ लोक अनेक प्रकार करतात परंतु मुळांत जेथें सामर्थ्याचाच अभाव आहे, तेथें कितीहि श्रद्धेचा अतिरेक केला तरी काय होणार आहे ? व्यसनी, दुर्गुणी, धूर्त, अविद्य अशा माणसांत मोठें सामर्थ्य असते असे जर समजावयाचे असेल, तर दगड, धोंडे, झाडें व जनावरे यामध्येंहि ते सामर्थ्य आहे असे समजून त्यावर श्रद्धा का ठेवूं नये ? पण मनुष्याच्या बुद्धीला दगड, धोंडा, झाड व जनावर यातील सामर्थ्य बिलकूल पटत नाही, म्हणून तो त्यावर श्रद्धा ठेवीत नाही गुरुबद्दलहि खरोखरी ही बुद्धि असावयास पाहिजे त्याच्या ठिकाणी मोठें सामर्थ्य आहे, तो आपल्याला उद्धरून नेतो, ता असाहि असला तरी त्याचेकडे पाहू नये, त्याचे दोष स्वतःत घेऊ नयेत, या समजुती सर्वथैव चुकीच्याच होत आपल्यासारख्या माणसातच जर सामर्थ्य आहे, आणि तें दगडाधोंड्यातहि जर आहे, तर तेच सामर्थ्य स्वतःमध्यें का नसावे ? हाहि विचार करून आत्मविश्वासयुक्त होणें हेंच इष्ट नाही काय ?

मनुष्य प्राणी श्रद्धावान् आहे, तसाच विचारीहि आहे श्रद्धेचा प्रतियोगी तर्क व संशय, का व कसे ही पृच्छा मनुष्य जन्मभर नव्हे

जगाच्या अंतापर्यंत करणार ! आजपर्यंत मानव जातीच्या इतिहासात असे दिसतें कीं, तर्कानें, विचारानें जें निश्चित केले, तच टिकले आहे सत्य वस्तूबद्दल श्रद्धा व विश्वास अवश्य पाहिजे, पण असत्य वस्तूबद्दल मात्र श्रद्धा धरणे साफ चुकीचे आहे शास्त्र हे गुरुवाक्य म्हणजे आप्तवाक्य व त्यावर विश्वास म्हणजे श्रद्धा ठेवा असे सांगत पण मनुष्य गुरुवाक्य व शास्त्रवाक्य याचा विचार करून, बुद्धीला पटले असे समजून जर विश्वास ठेवील तर उत्तम केवळ अमक्याने सांगितले म्हणून मी विश्वास ठेवता हें म्हणणे पक्के काही काल टिकते विचारून व विवचून जें घेतले असते, त्यावरील श्रद्धा अढळ राहाते मी रोज अभ्यास करतो, रोजचा विषय मला कळतो, अर्थात् मी पास होणार असा विश्वास ऊर्फ श्रद्धा ठेवणे हे योग्य आहे पण अभ्यास काळजीने न करता विषहुना त्याकडे दुर्लक्ष करून कोणी शनिवारचे उपास अगर सत्यनारायणाचे व्रत परीक्षेकरिता श्रद्धेनें करु लागेल तर ती श्रद्धा चुकीची आहे, यांत संशय नाही कारण शनिवार व सत्यनारायणही न करता केवळ अभ्यासाने परीक्षेत पास झालेली अनेक मुलं जेव्हा त्याला दिसतील, तेव्हा त्याची श्रद्धा ढासळेल यत्नावर, कर्तृत्वावर, अचुक कार्यकारणावर माणसाची श्रद्धा पाहिजे परंतु साध्य एक व त्याचे साधन भलत असे असताना त्यावर श्रद्धा न ठेवाल तर तुमचा श्रद्धाहीनपणा कार्यविघात करील असे जर कोणी म्हणू लागेल तर तें असमंजसपणाचे होय !

## चुकीची श्रद्धा काय कामाची ?

पट्टेवाल्याला मोठ्या श्रद्धेने जर कोणी मामलेदार समजू लागेल आर पोलीस शिपायाला पोलीस सुपरिटेंडेंट समजू लागेल तर ती चुकी होय केवळ गोड बोलून काम करून घेण्याच्या दृष्टीने तो व्यवहार इष्ट असेल परन्तु भलत्याला भलते समजणे व त अंधश्रद्धेने समजणे हें सर्वस्वीं निंद्य होय ! आजवर जगात अंधश्रद्धेने जेवढे लाभ झाले असतील, त्यापेक्षा हानीच अधिक झाल्ली आहे, हें अनेक उदाहरणांनी सिद्ध करता येईल

वेदांतशास्त्रांत तर श्रद्धेपेक्षा विचार व विवेक यालाच महत्त्व अधिक आहे, नित्यानित्य वस्तुविवेक हे अधिकाऱ्याचे पहिले लक्षण आहे, विवेक,

वैराग्य, तीव्र मुमुक्षा व शमदमादि साधन ही अधिकाऱ्याचा प्रमुख लक्षण आहेत तथ उगाच काणी तरी सागतो आहे म्हणून तू एक, असे म्हटलेले नाही छांदोग्योपनिषदात श्वेतकेतूला त्याचा पिता जरी प्रथम 'तत् श्रद्ध व' असे सागतो तथापि पुढे त्याने पुत्राच्या विचारावरच सर्व सोपविले आहे

वस्तुसिद्धि विचारेण न किंचित् कर्मकोटिभि

—शंकराचार्य

वस्तूची सिद्धी म्हणजे ज्ञानप्राप्ति ही विचाराने होते व 'ज्ञानादेवतु कैवल्यम' असाच सिद्धांत आहे म्हणूनच भगवतांनी अर्जुनाला शेवटी सर्व विषय सांगितल्यावर मी सांगतो म्हणून तू एक श्रद्धा ठेव असे कोठेहि म्हटले नसून 'विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु' म्हणजे या सर्वांचा विचार करून ज तुझ्या बुद्धीला पटेल त्यावर श्रद्धा ठेवून तू ते कर असे स्पष्ट म्हटले आहे असो

## भावनेपेक्षां विवेकच श्रेष्ठ

श्रद्धा भावना, विश्वास व भाव हे सर्व विषय जवळजवळच आहेत म्हणून थोडासा भावनेचाहि विचार करू जगामध्ये विचारप्रधान व भावनाप्रधान अशी दोन प्रकारची माणसे असतात प्रत्येक माणसात विचार व भावना ही थोडी थोडी असतातच विचार जे ठरवितो त्याला भावनेच पाठबळ असले म्हणजे कार्य होते नुसती भावना म्हणजे एक प्रकारची हुक्की किंवा लहर होय! हुक्कीमध्ये भरी भरणारे लोक प्रसंगी काही काम करतात पण कायाला यश न आले म्हणजे त्यांना आपले करण अविचाराच अर्थात् अपूर्ण विचाराच होते असे मागून वाटते महाभारतातील भीम व द्रौपदी या दोन व्यक्ति अत्यंत भावनाप्रधान दिसतात त्यांची भावना आवरता आवरता धर्मराजाला पुरेवाट झाली धर्म व श्रीकृष्ण ही दोन विवेकाची दृश्ये तर सा नात होती म्हणूनच भारत हा इतिहास घडला, नाही तर भीम व द्रौपदी यांच्या जर धर्मराजाने त्यांच्या वृत्तीला संमति दिली असती तर वन पर्वापासून पुढचे भारत आटोपलेच असते! रामायणातहि लक्ष्मणाच्या जळजळीत भावनेचे एकदोन प्रसंग आहेत त्या ठिकाणी रामचंद्राच्या विवेकाने पुढील रामायण बनलेले दिसते विचार, विचार म्हणून जो जो

टिकाऊ काय होते, ते नुसत्या भावनेने होत नाही नुसती भावना व नुसते विचार ही निरुपयोगी होत विचाराला भावनेचे साहाय्य असावे हेच उत्तम होय!

भावनेमध्ये सामर्थ्य आहे यांत शंका नाही पण, ती भावना सत्य विचाराची अनुयोगी असावी एका विद्यार्थ्याला एक मुंगळा डसला त्याला वाटले की विंचू डसला! लगेच विंचू चावल्याप्रमाणे कळा येऊ लागल्या व तो ओरडू लागला, पण शोधाअंती मुंगळा डसलेलाच जेव्हा साक्षात दाखविला, तेव्हा कळा गेल्या व रडणेहि थांबले या व अशी तऱ्हेच्या गोष्टी पुष्कळ देता येतील पण यावरून निगमन हेच निघते की, सत्य वस्तू-बद्दल, सत्य विचाराबद्दल भावना असणे हेच योग्य! भ्रमात्मक भावनेचे दुष्परिणामच होणार क्वचित् सुपरिणाम दिसले, तरी ते टिकाऊ होणार नाहीत मानसशास्त्रदृष्ट्या भावनेमध्ये पुष्कळ सामर्थ्य आहे भावना म्हणजे मनाची सर्व शक्ति एकवटणे व ती एका केंद्राकडे लावणे होय सूर्यनारायण हा आरोग्यदाता आहे, स्थावरजंगम जगताचा तो आत्मा आहे, अशा भावनेने, विश्वासाने जर सूर्योपासना केली, नमस्कार घातले तर ते योग्य व इष्टपर कल्याणकारक होईल परंतु चौरंगावर अग्नीला ठेवून त्याला थंड करण्याकरिता जर तुपाची धार मोठ्या श्रद्धेने कोणी धरू लागेल, तर त्याची ती भावना निरर्थक होईल नामदेवाची भावना पंढरीच्या विठोबातच काय तो देव आहे अशी होती पण त्याची ती भावना विसोबा खेचरांनी बदलली तात्पर्य, मिथ्या व भ्रमात्मक भावना टाकाऊ होत, पण, सत्य व यथार्थ भावना उपयुक्त होत विचार व भावना यांचे शुद्धिकरण सारखे चालू आहे शोध व शास्त्रेंहि तेच कार्य करितात आजवर बुद्धिमान लोक तेच करीत आहेत म्हणूनच पूर्वकालच्या पुष्कळ भावना आज पालटल्या आहेत व आताच्याहि पुढे पालटतील

## भावनेचा अर्थ

भावनेचे वरील विवेचन आम्ही रूढ कल्पनेप्रमाणेच केले आहे मीमांसाशास्त्रदृष्ट्या भावनेचे पृथक्करण करू लागल्यास सर्व भ्रम नाहीसा होईल अर्थसंग्रह या ग्रंथामध्ये शाब्दी भावना व आर्थी भावना असे भेद

आहेत भावनेची व्याख्या 'भावना नाम' भवितुर्भवनानुकूलो भावयितु-र्व्यापारविशेष. । अशी आहे शाब्दी भावनेमध्ये अशनय आहेत 'केन, किम्, कथम् भावयेत,' असे ते प्रकार आहेत 'यजेत' या वाक्याचा 'यागेन इष्ट भावयेत्' असा अर्थ मीमासक करतात 'सोमेन यजेत म्हणजे 'सोमवता यागेन इष्ट भावयेत्' सोम ज्यामध्ये आहे अशा प्रकारचा यज्ञ करून इष्ट प्राप्तीची इच्छा करावी, असा वाक्यार्थ आहे मीमासाशास्त्रातील भावनेचा अर्थ व मानसशास्त्रातील भावनेचा अर्थ हे परस्परभिन्न आहेत. Sentiment म्हणजे भावना असा अर्थ हल्ली समजतात त्या दृष्टीनेसुद्धा भ्रमात्मक वस्तुविषयक ज्या भावना असतात त्या चुकीच्याच ठरतात

येथवर श्रद्धा व भावना याचा विचार करून आपण असे ठरविले की सत्य वस्तूवर श्रद्धा असावी म्हणजे सत्यत्व आणि श्रद्धा याचा सबध असावा मिथ्या भ्रमात्मक अशा वस्तूविषयी केवळ भावनावश होऊन श्रद्धा ठेवणे हे परिणामी अत्यत अहितकर होय ! असो.

आता ठिकठिकाणीं एवढी जी गुरुमहती गायलेली आहे आणि गुरुचें वर्णन जें खूप फुगवून केलेले आहे ते केवळ स्तावक आहे म्हणजे अर्थ-वादात्मक आहे असे जें म्हटले त्याचे स्पष्टीकरण करण्याकरिता अर्थवाद म्हणजे काय आणि हा कोणच्या शास्त्राचा विषय आहे हें आपण पाहू कारण गुरुची जशी अर्थवादात्मक स्तुति पुष्कळ ठिकाणी आलेली आहे, त्याचप्रमाणे प्रत्येक देव, व्रत, विधि व आचार याची स्तुति अशीच भरमसाट आलेली आहे अर्थवादात्मक फलश्रुत्या या जर खऱ्या ठरतील तरच गुरुमहात्म्यहि खरे ठरेल ब्रह्माविष्णुमहेशापेक्षासुद्धा गुरूचा अधिकार मोठा असतो असा जो काही लोकाचा श्रद्धामूलक समज आहे तोहि कित-पत खरा आहे, हे पुढील विवेचनावरून कळून येईल

वेदाचा अर्थ लावणारें जें मीमासाशास्त्र त्यामध्यें श्रुति, लिंग, वाक्य, प्रकरण, स्थान व समाख्या असे मुख्यत विषय आहेत कोणताहि विधि श्रुति करते, ब्राह्मणमत्र त्या विधीचे स्मरण करून देतात, त्या विधीविरुद्ध काहीं न करावे, म्हणून निषेधवाक्यें असतात आणि त्या विधीची स्तावक वाक्यें जीं असतात, त्याला अर्थवाद म्हणतात आठम वगैरे कारणामुळे

मनुष्य वैदिक कर्माला प्रवृत्त होत नाही त्या कर्माला त्याने प्रवृत्त व्हावे म्हणून स्तुत्यात्मक अर्थवाद सांगितलेले असतात. श्रुतीचे विधिवाक्य हे पुरुषाला कर्म करण्यास सांगते. पण ते कर्म चांगले आहे, अमुक विधि केला तर अमुक होईल, अशी जी स्तुति असते, ती विधीकडे म्हणजे वैदिक कर्माकडे मनुष्याची प्रवृत्ति व्हावी म्हणूनच असते.

'रोचनार्था फलश्रुतिः' असा न्याय आहे रोचना म्हणजे बरे वाटणे हा अर्थ ज्यामध्ये असतो, ती फलश्रुति होय. लहान मूल काढा घेत नाही. तेव्हा गुळवेलीचा काढा घेतलास तर तुझी शेंडी वाढेल असे रोचक बोलणे हा अर्थवाद अथवा सद्बुद्धीने केलेली थापेबाजी होय. मुलाने कोणीकडून औषध घ्यावे व तो बरा व्हावा म्हणून ज्या गप्पा आपण त्या वेळी मारतो, त्या गप्पानाच शास्त्रीय भाषेत अर्थवाद किंवा फलश्रुति असे म्हणतात. मीमांसकांनी 'प्राशस्त्यनिन्दान्यतरपरं वाक्यमर्थवाद' अशी अर्थवादाची व्याख्या केली आहे. कर्माकडे प्रवर्तक वाक्य हा विधि होय पुरुषाला निवृत्त करणारे जे वाक्य तो निषेध होय, आणि स्तुति व निंदा यापैकी एकाचा बोध ज्या वाक्याने केला जातो, ते वाक्य अर्थवादात्मक होय. अर्थवादामध्ये विधिशेष व निषेधशेष असे भेद असून पुन गुणवाद, अनुवाद, भूतार्थवाद असे अवांतर भेद आहेत त्या सर्वांचे विवेचन येथे अप्रस्तुत आहे. वैदिक विधीला अर्थवादाची सुद्धा जरूरी आहे, म्हणून मीमांसकाच्या भाषेत यज्ञ हाच धर्म कसा आहे हे येथे दाखवितो.

विधिना विहित
मन्त्रैः स्मारित
नामधेयेन व्यवहृत —— यागादिरेव धर्म
निषेधेन निवर्तित
अर्थवादेन प्रवर्तित

## फलश्रुत्यांचें स्वरूप

वरील विवेचनावरून अर्थवाद म्हणजे स्तुति अर्थात् ती पोकळ स्तुति असून स्तोत्रे, व्रते व गरुचरित्रादि प्राकृत ग्रंथाना जोडलेल्या ज्या फलश्रुत्या त्या सर्व अर्थवादात्मक होत, यात मुळीच संशय नाही हल्लीचे औषधाचे

आहे. एका अथर्वशीर्षाच्या पठणानेंच जर सर्व कांही मिळतें तर अथर्वशीर्षाव्यतिरिक्त मंत्रब्राह्मणात्मक वेदाचा जो अफाट पसारा आहे, त्याची काय जरूर होती ? पण ज्या अर्थी मंत्र, ब्राह्मण व आरण्यक ही शिल्लक ठेविलीं आहेत, त्या अर्थी ज्याची मुळीच प्रवृत्ति होत नाहीं, त्यानें निदान अनेक इच्छा तृप्त होतात म्हणून अथर्वशीर्ष तरी शिकावें व तें निष्ठेनें म्हणावें म्हणूनच ही फलश्रुति जोडली आहे, हेंच नितांत सत्य आहे. ज्ञानानेंच मोक्ष मिळतो, हा सिद्धांत खरा आहे ना ? मग अथर्वशीर्षाच्या पाठानें व पारायणानें चौथा पुरुषार्थ मिळतो आणि ब्रह्मनिष्ठता येते असे सांगणे हा अपसिद्धांत नव्हे काय ? पण हा अपसिद्धांत ज्या अर्थी जाणून बुजून सांगितला त्या अर्थी तो अर्थवादच होय !

शनिमहात्म्य व शिवलीलामृत हे ग्रंथ शनिवारी व सोमवारी श्रद्धेनें वाचणारे व ऐकणारे लोक पुष्कळ आहेत. त्याचे शेवटीहि हा ग्रंथ श्रवण करतांच विघ्नें पळतात व ग्रहपीडा नष्ट होते, असें म्हटले आहे. पण या फलश्रुतीचा अर्थ वाच्यार्थानें घेणें अशास्त्रीय व अयुक्त आहे. सगळीं विघ्नें नष्ट करण्याचें व ग्रहपीडानिरासाचें शनिमहात्म्य जर साधन असते, तर जगात इतर साधनें मुळींच उपलब्ध झाली नसती.

## भरमसाट फलश्रुत्यांची लालूच

दक्षिण महाराष्ट्रात भक्तिप्रधान, रसाळ असें एक व्यंकटेशस्तोत्र पुष्कळ लोकांच्या पाठांत आहे. हें स्तोत्र भक्तिरसानें ओथंबलेले आहे; व त्या दृष्टीने तें अवश्य म्हणावें. पण या स्तोत्राची फलश्रुति खरी समजून जर कोणी ते पठण करूं लागेल तर तें चुकीचें होईल.

> इच्छा धरनि करील पठण । त्याचें सांगतों मी प्रमाण । सर्व कामनेसी साधन ।-पठण एकमंडळ ॥९२॥ पुत्रार्थी यानें तीन मास। धनार्थी यानें एकवीस दिवस । कन्यार्थी यानें षण्मास । ग्रंथ आदरें वाचावा ॥९३॥ क्षय अपस्मार कुष्टादिरोग । इत्यादि साधनें प्रयोग । त्यानी एक मंडळ सांग । पठणें करुनि कार्यसिद्धि ॥९४॥

एक मंडळ म्हणजे चाळीस आवृत्या केल्या म्हणजे सर्व सिद्धि प्राप्त

लागनात ती आर्त असतात आर्तांची स्थिति अशी असते की त्या वेळी त्याला क.ही सांगितले तरी ते खर वाटते ज्यात् केव्हा तरी चुकून माला-फुलाला गाठ पडावी तशी पडून एकादी गोष्ट घडली की त्या आर्त माणसाला वाटते की, माझ्या अनुष्ठानामुळेंच ह होत परतु हा त्याचा भ्रम असतो कार्य म्हटले की कारण असलच पाहिज कारण अज्ञात असल व समजत नसले म्हणजे मनुष्य ती गोष्ट चमत्कार अथवा ईश्वरी सामर्थ्यावर ढकलतो परतु त त्याचे मन विचारातील चुकीचेच कस असते ह समजावे म्हणून चमत्काराचा विचार पुढील प्रकरणात करितो

---

प्रकरण १० वें

## महाराज व चमत्कार

जग ह अस आहे की त चमत्काराला भुलत नित्य जें डाळयापुढें असत त्यापेक्षा अनित्य अस काही दिसले की जग त्याला आश्च र्याने मान दते व तो चमत्कार समजत चमत्काराशिवाय नमस्कार नाही' या म्हणीत बरेच तथ्य आह त्यामुळें लोक ह चमत्काराचा व बुवाचा सबध सदैव जोडतात बहुतेक बुवाच्या मागें चमत्काराचे लफड असतच म्हणून प्रस्तुत प्रकरणात त्याचा विचार करण्याचे योजिले आह

जी गोष्ट घडलेली आपण पाहतो, पण जिच्या कार्यकारण भावाची उपपत्ति आपणास समजत नाही अगर सागता येत नाही, तिलाच आपण चमत्कार समजतो चमत्कारामध्यें एक अद्भुतपणा असतो असे अद्भुत चमत्कार सृष्टीमध्ये असख्य चाललेले आहेत निसर्गाच्या अनत शक्ति आहेत त्या सर्व शक्तींच आकलन मनुष्याला अद्याप झालेल नाही निसर्गा-च्या ज्या शक्तीच ज्ञान मानवाला होत व त्यावरून त्याला जो कार्य-कारणभाव सुचतो यामुळ त्या चमत्कारातील अद्भुतपणा नष्ट होतो काहा

चमत्कार, नि कांही अद्‌भुतपणा दाखवून हे बुवा आणि हे महाराज समाजाच्या बुद्धीची हत्या करीत बसतात! ही आश्चर्यवृत्ति मानवी मनातील जिज्ञासा मारते व जिज्ञासा मेली की उन्नतीची आशाच सुटते.

मनुष्यस्वभावांत आळस हा एक दोष आहे. त्यावरोबरच श्रम न करता ऐते मिळावें व ते उपभोगावें असेंहि त्याला वाटते. वास्तविक माझ्या श्रमाचें म्हणजे कर्माचें फल मला मिळाले पाहिजे व तेवढेंच मिळेल असेंच मनुष्यानें समजलें पाहिजे. परंतु चांगले चांगले विद्वान् लोकसुद्धां हा सिद्धांत विसरतात व एखाद्या अद्‌भुत शक्तीच्या साहाय्यानें आपले मनोरथ पूर्ण होतील, अशा कल्पनेनें बुद्धिवादाचा त्याग करून एखाद्या बुवाच्या नादीं लागतात. हिंदु समाजाच्या या भाविकपणाचा दुष्परिणाम ढळढळीत दिसत असतांना शिकलेल्या लोकांनी चमत्काराच्या नादानें भावनेच्या भोंवऱ्यांत स्वत. उडी टाकावी हा प्रकार खरोखरीच निंद्य होय!

ज्याचा कार्यकारणभाव कळत नाही तें आश्चर्य अगर तो चमत्कार होय! मानव समाजाचा इतिहास पाहिला तर असे अनेक चमत्कार दिसतात. ज्याच्या डोक्यांत काबटाला दोरी बांधून धनुष्य करण्याची कल्पना आली, तो खरोखरच पहिला चमत्कार आणि बाणाचा शोध हा दुसरा चमत्कार. पुष्कळ दिवस मानव समाज हा कच्च्या अन्नावरच राहात होता. पुढें अग्नीचा शोध लागला, तो त्या कालांतील खरोखरीच तिसरा अद्‌भुत चमत्कार होय! अग्नीचा उपयोग करणें व अन्न शिजवून खाणें यामुळें मानवजातीवर फारच उपकार झालेले आहेत. चंद्र, सूर्य, नक्षत्रें यांचे शोध व त्यांची आकर्षणें हेहि चमत्कारच होत.

प्राचीन काळीं संवत्सर चक्राचा जेव्हां शोध लागला, तेव्हा तो शोध मोठा अद्‌भुतच नव्हे काय? ग्रहणे, शेंडे नक्षत्र, ग्रहाच्या गती हे सर्व पूर्वी चमत्कार होते. परंतु आधुनिक शास्त्रज्ञांनीं त्यांचे नियम सप्रमाण बसविल्यामुळें त्यांचा अद्‌भुतपणा नष्ट झाला आहे. वाफेचें यंत्र, बंदुकीची दारु, तोफेचा गोळा हे सर्व चमत्कारच होत. आज तर वीज, अग्नि व वायु यांमुळें चमत्कारिक अशा कित्ती तरी गोष्टी घडत आहेत. त्या सर्व पाहात असतांना एखाद्या महाराजानें चमत्काराच्या जोरावर दुनिया झुलविणें व तो झुलवील तसें दुनियेनें झुलणें हा खरोखरीच अधमपणा होय! कारण

चमत्कारामुळे लोक अधिक भाविक बनतात, प्रज्ञाहत होतात आणि जिज्ञासा शून्य बनतात. अर्थात असे लोक ज्या समाजात फार आहेत त्याच्या कपाळी परदास्य आहे यात शंकाच नाही.

ब्रह्मवेत्ता व चमत्कार यांचा खरोखर काही संबंध नाही. पातञ्जल योगशास्त्रामध्ये मणी, मंत्र, औषधी व समाधी यांच्या साहाय्याने काही सिद्धि म्हणजे चमत्कार दाखविता येतात असे म्हटले आहे. पण खरा हठयोगी साधक या सिद्धीच्या उपयोगाच्या भानगडीत मुळीच पडत नाही. त्याला उच्च असे ध्येय गाठावयाचे असल्यामुळे तो सिद्धीच्या उपयोगाचीच इच्छा करीत नाही. मग चमत्कार कसले करतो! योगशास्त्राप्रमाणे प्रत्यक्ष योगी हा आपल्या विशिष्ट अभ्यासाने दोषांचा क्षय करतो, अन्तःकरण शुद्ध ठेवतो आणि एकाग्रता साधून समाधि लावतो. पण आजचे हे बुवा आणि महाराज हे सायास न करता राजयोगी म्हणून राजविलासी बनतात आणि केवळ चैनात राहण्याचा मात्र चमत्कार दाखवितात एवढे खरे.

स्त्री झाली व ती वाझ असली तरी तिला पुत्र होणार नाही अस नाही तिचा विटाळ थांबला नव्हता, तिचा नवरा जिवत होता आणि त्या उभयतामधील प्रजननशक्ति प्रबळ असल्यामुळें साठ वर्षानतरसुद्धा मूल होणे मुळीच अशक्य नव्हते बोलाफुलाला गाठ पडली म्हणज भोळ्या माणसाना ते चमत्कार वाटतात, तसाच तो गुरुचरित्रातील चमत्कार होय! आज ज बुवा आणि महाराज उपलब्ध आहेत, त्याच्या नावावर जेवढे म्हणून चमत्कार लोक सागतात ते सर्व भोवतालच्या टग्यानी आणि भाविकानी उठविलेले होत *जटेंतून गगा काढणें, राखची खडीसाखर करणें, बत्तासे काढणे,* पेढ तादूळ, चुरमुरे याची ताटच्या ताटें काढणें, वगैरे जे चमत्कार आज लोक सागतात ते सर्व खोटेच असतात एकान एक चमत्कार उठविला की दुसरा दुसराच उठवितो सोलापुरचे लोक कोल्हापुरचा चमत्कार सागतात आणि कोल्हापुरचे लोक कानपुरचा चमत्कार सागतात, मग कानपुरचे भक्त खरापुरचा चमत्कार का सागणार नाहीत? काही लोक अस म्हणतात की अमक्या अमक्या महाराजाचे चमत्कार आम्ही प्रत्यक्ष पाहिले आहेत कोणी म्हणतो नारळातून नथ काढून दाखविली, तर दुसरा म्हणतो गगेंतून कुकू काढले! आम्ही असे स्वच्छ विचारतो की खरोखरीच तुम्ही तुमच्या महाराजाचे चमत्कार काही प्रत्यक्ष पाहिले आहेत काय ? जर पाहिले असतील तर त्या तुमच्या सर्वज्ञ व सर्वसमर्थ महाराजाचा दुसऱ्याच्या द्रव्यावर डोळा का असतो ? ज्याच्या जवळ ऋद्धिसिद्धीसारख्या दासी सज्ज आहेत अस महाराज शिष्याकडून पैसे का उपटतात? भोळ्याबापड्या स्त्रियाच्या मनिऑर्डरी का स्वीकारतात ? शिष्याच्या एका पैलाहि स्पर्श न करता एका तरी महाराजाने घाट, मठ, कूप, आराम, दवालय, धर्मशाळा, बाधली आहे काय ? अस एक तरी उदाहरण महाराजाचे प्रज्ञाहत भक्त दाखवू शकतील काय ? तम जादर दिसत नाही तावर या लोकाची ही बुवाशाही म्हणजे ब्रह्मज्ञानाच्या नावाखर दुसऱ्याचें द्रव्य सारसमुरतपणें लुटण्याचा धद्दा होय! किंवा दुसऱ्याची सधवा किंवा विधवा सुदर स्त्री कुमार्गास लावण्याचा सभावितपणाचा व्यवसाय होय फार काय पण दुसऱ्यास प्रज्ञाहत करून त्याचें स्वतन नष्ट कर-

ण्याचा निर्बंधाच्या कचाटींत न सांपडणारा तो एक मोठा अपराधच होय !

जो महाराज राखेची साखर करतो, त्याला साखरेचा कारखाना काढणें अशक्य आहे काय? जो अंगठ्यांतून गंगा काढतो त्याला दुर्जल ग्रामें सजल करून टाकणें कांहीं अशक्य आहे काय? पण महाराज असल्या उपयुक्त गोष्टी करील तर शपथ ! हे असले अवतारी महाराज इंग्रजाना आपलें सामर्थ्य कां बरें दाखवीत नाहीत ? स्वराज्य देण्याची वृत्ति का बरें उत्पन्न करीत नाहींत ? पण असें विचारावयाची सोय नाही. त्यांचे भक्तगण म्हणतात कीं " अहो, पापाचा घडा भरला पाहिजे " म्हणूनच आम्ही विचारतों कीं हें सांगावयास महाराज कशाला पाहिजे ? हें आम्हांलाहि कळतें. केवळ भोळ्या बापड्यांचें द्रव्य लुटण्याचा धंदा या महाराजांना करावयाचा असतो व त्याकरितांच हे चमत्कार करतात. ना विद्वत्ता, ना तपस्या, ना माणुसकी, ना गुण असे हे महाराज समाजांतील लोकांच्या पैशावर केवळ राजयोगी म्हणून जगत असतात आणि आपल्या जाहिराती फडकावतात, याशिवाय कांही नाही.

कोणताहि महाराज हजारों लोकांसमक्ष मी अमुक एक चमत्कार करून दाखवितों असें आव्हानपूर्वक कधी तरी सांगतो काय ? पण गारुडीसुद्धां 'चल', 'चल','चल' म्हणून गंमत करतो, राखेची साखर करतो आणि दगडाचे पेढे करून लोकांच्या अंगावर फेंकतो; पण स्वतः शेवटीं भीकच मागतो! हल्लींच्या या महाराजांचे चमत्कार या गारुड्यासारखेच होत. गारुडी चमत्कार दाखवून भीक मागतो, महाराज भीक मागत नाहीं, पण त्या निमित्तानें पैसे मागण्याचा यत्न करतो. अलीकडे गारुडीविद्येंतील कांही प्रोफेसर मुद्दां जाहीरपणें तिकिटें लावून चमत्कार दाखवीत असतात. दोनदोन घागरी पाणी पिणें, कांचा खाणें, साप खाणें, असले आर्य व किळसवाणे प्रयोग ते करितात. इंद्रजालविद्या, गारुडीविद्या या विद्या असून त्या शिकविण्याकरितां हल्लीं विद्यालयेंहि निघाली आहेत. एखादा महाराज असली कुत्सीळ विद्या संपादन करीत असेल, पण तेवढ्यामुळें तो ब्रह्मनिष्ठ असतो असें नव्हे. ब्रह्मवेत्ता व चमत्कार यांचा वेदांतशास्त्रदृष्ट्या बिलकुल संबंध नसतो म्हणून त्या-

त्कारांचा व सत्पुरुषांचा संबंध लोकांनीं मुळीच जोडूं नये. सत्पुरुषाच्या ठिकाणी मान, व दंभ ही नसतात. लोकाची उपाधि, लोकाचा उपद्रव त्यांना नको असतो म्हणून ते चमत्कारांच्या भानगडींतच मुळी पडत नाहींत.

हिंदुस्थान देश हा दरिद्री आहे, पण या अशा दरिद्री देशांत पुष्कळ महाराज श्रीमंतीनें चरतात ! या दरिद्री देशाच्या उद्धाराकरितां हजारो संस्था धडपडत आहेत. ज्याच्या दासी ऋद्धिसिद्धि आहेत असे हे महाराज या संस्थांना, या लोकोपयुक्त कार्यांना सिद्धीच्या जोरावर सपन्न का करीत नाहींत ? तसे जर ते करतील तर राष्ट्रावर उपकार होणार नाहीं काय ?

एखादा महाराज हजारो लोकासमक्ष आव्हान देऊन चमत्कार करतो असें म्हणतो. पण ते त्याच्या कसे अंगलट येतात याचें प्रसिद्ध उदाहरण श्री पांचलेगांवकर महाराज यांचें आहे.

या महाराजांनी प्रथम प्रथम आपल्या सर्पसिद्धीचें व अग्निसिद्धीचें बरेंच स्तोम माजविलें ! हिंदुसंघटणाविषयीं कार्य करणारे म्हणून प्रथम लोकांनी त्यांच्याकडे कौतुकानें पाहिलें. आम्हीहि त्यांचेकडे आदरानेंच पाहातों. पण, पुढें महाराजांच्या चमत्कारांची चिकित्सा होऊं लागल्यावर साप धरणारेही पुष्कळ निघाले. कांही लोक तर साप धरतां धरतां मेले व पुष्काळ सर्प निर्विष असतात असा सिद्धांत निघाला ! नागसर्पावर खरोखर कशानेंहि औषध चालत नाहीं पण कोणताही सर्प चावला तरी "चोवीस तासांत त्याचा बंदोबस्त करतों. मला तारेनें कळवा" असें जें पांचलेगांवकर म्हणतात तें सर्वस्वी खोटें आहे हे मुद्दां आता कळून चुकलें आहे. वाई प्रा.' पा. शाळेंतील एका शिक्षकाला नागसर्प चावला व अवघ्या दोन तासांत तो गृहस्थ उडाला! त्या वेळी श्रीपांचलेगांवकरांना सतरा रुपये खर्चून तारा केल्या; पण ते पैसे फुकट गेले ! सर्पविषेबद्दल जेवढें ते सांगतात ते तितकें खरे नाही व त्यांच्या या चमत्कारांत कांही अर्थ नाहीं हें चिकित्सक लोकांना आतां समजलें आहे.

'पांचलेगांवकरांच्या चळवळीमुळें पुष्कळ सर्प निर्विष असतात एवढेंच सिद्ध झालें. परेळच्या लॅबोरेटरीमध्यें त्यांच्या सिद्धीचा अनुभव घेण्याकरितां पाचारण केले होते, पण त्यांनीं तें स्वीकारले नाहीं; यावरून

नागसर्पाच्या विषावर औषध नाही हेच खरे होय सर्पसिद्धीप्रमाणे त्याच्या अग्निसिद्धीचाही अनुभव लोकाना आला असून पुष्कळ लोक पेटलेल्या खाईंतून चालू शकतात असेहि सिद्ध झाले आहे.

सर्वांत धूर्त व वस्ताद महाराज तोच की जो उघडपणे चमत्कार तर राहोच पण फारसा बोलतहि नाही कारण महाराज बोलू लागला की विद्वान् लोक त्याच्या भाषणाची छाननी करू लागतात व चमत्कार दाखवू लागला तर चिकित्सक व शोधक लोक त्याचा पिच्छा पुरवितात त्या हिसकाहिसकींत महाराज टिकत नाही म्हणून सर्वांत धूर्त महाराज चमत्कार दाखविणार नाही, फारसे बोलणार नाही, ग्रंथ लिहिणार नाही, शिवा मासिकहि काढणार नाही, तर तो नुसता आशीर्वाद देत बसेल ! !

पुष्कळ बुवाच्याजवळ बुवाशाहींतील चमत्कार नसतात, पण चमत्कारिक वर्तन मात्र असते त्यामुळें ते लोकावर छाप ठेवूं इच्छितात पळत पळत मधुकरी मागणे, मधुकरीच्या अन्नाचा काला एकत्र करून खाणे, प्रश्नाचीं उत्तरें न देणें, उगाच एखाद्याच्या आईबाईचा उद्धार करणें, दर्शनास कोणी मातबर मनुष्य आला तर पळापळी करून त्यास खुवाडी देणें, असल्या चमत्कारिक स्वभावानं जरी प्रथम लोक झुलत असले तथापि शेवटी भ्रमाचा भोपळा फुटतो ! रामदासी सांप्रदायांतील कित्येक महाराजाच्याजवळ हा असला चमत्कारिक स्वभाव असतो व त्याचे समर्थन ते समर्थांच्या ओव्या म्हणून करीत असतात

## आम्हीसुद्धां चमत्कार करतों

चमत्काराचा व ब्रह्मविद्येचा काही संबंध नाही ब्रह्मज्ञानी नसताना सुद्धा काकतालीय न्यायाने काही गोष्टी घडतात व त्या चमत्काराच्या सदरात घालता येतात वाई सोडून मिरजेस आल्यापासून येथें पुष्कळ पाऊस पडत आहे याचे कारण गेलीं ५–६ वर्षे सर्वत्रच पाऊस अधिक पडत आहे पण हा चमत्कार लेखक मिरजेस आल्यामुळें झाला असें समजणे चुकीचे आहे गतवर्षी आम्ही जमखिंडीस गेलो होतो तर्थे गेल्या ८।८ वर्षांत पडला नाही असा भीज पाऊस तीन दिवस सारखा पडला प्रवचन संपल्यावर रात्री ११ वाजता पावसास प्रारंभ झाई व तो बरोबर प्रवचनाच्या पूर्वी

सायंकाळी ८ वाजता हुकूम दिल्याप्रमाणे थावे भोळ्या लोकांना या यदृच्छेने घडलेल्या गोष्टी चमत्काराप्रमाण वाटतात व महाराजाचे दाद वाढते गतवर्षी गणपति उत्सवानिमित्त ओगलेवाडीस गेलो असता तेथें ज्याच घरीं उतरलो होतो त्याच्या एका नातलगाचा खोकला पार नाहींसा झाला त्या गृहस्थाला तो खोकला ३।४ महिने दमवीत होता लेखकाच्या पाय गुणाने जर तो खोकला गेला असेल तर खोकल्यावर त एक औषधच होईल मग जेथें जेथ खोकले आहेत तेथें जर लेखकाला हिंडविल तर ते खोकले जातील काय ? किंवा जथें बिलकुल पाऊस नाही तथें लेखक गेल्यानें पाऊस पडेल काय ? या सर्व यदृच्छने व काकतालीय न्यायान गोष्टी घडतात लुच्चे लोक याचा सग्रह करून त्या सागत सुटतात व त्यावर जगतात गारुड्याप्रमाण चमत्कार करण किंवा यदृच्छेने घडलेल्या गोष्टीचे चमत्कारतुल्य वर्णन करणें हे कोणालाहि शक्य आहे पण ते ज्ञान्याचे वा सत्पुरुषाचे लक्षण नव्हे ! खरा ज्ञानी अलौकिक न होता, चमत्कार न दाखविता, लोकाना न दिपविता सभ्यपणान व शांतपणान अगदी सामान्य माणसासारखा राहून समाजाची अखड सेवा करीत असतो परमार्थाचा साधक चमत्कार व लौकिक याच्या जाळ्यात सापडला म्हणजे तो कसा भ्रष्ट होतो याचे मजेदार वर्णन पुढील प्रकरणात येईल



# श्री एकनाथ व साधकाचें पतन

परमार्थ साधणे ही काही सामान्य गोष्ट नाही, ती फारच कठिण आहे पुष्कळ साधक या मार्गाकडे प्रवृत्त होतात पण अखेर गाठणारा खरोखरीच विरळा असतो

विरळा ऐसा कोणी । तुका त्यासी लोटांगणी ।।

ही तुकारामाची उक्ति या दृष्टीने बरोबर आहे साधक परमार्थाकडे प्रथम सद्‌बुद्धीने कसा प्रवृत्त होतो, अत्यंत विरक्त असताना सुद्धा हळूहळू पंचविषयाच्या तावडीत कसा सापडतो, स्त्री आणि वित्त यापासून अलिप्त राहण्याचा यत्न करिता करिता त्यातच तो कसा गुरफटून जातो, याचे सुंदर चित्र श्री एकनाथांनी आपल्या चिरंजीव पदामध्ये रेखाटलेले आहे तसेच त्यांनी भागवतामध्येहि प्रसंगानं व ओघाने हेच विचार मांडलेले आहेत प्रस्तुत प्रकरणात साधक हा कसा खाली खाली जात असतो हे श्री एकनाथाच्या वचनाधारे सांगण्याचे योजिले आहे.

श्री एकनाथ म्हणतात —

विषय पाच आहाती । ते साधका अवश्य नाडिती
म्हणोनि लागो न द्यावी प्रीती । कवणे रीती ते ऐका ।।१३।।
जेणे धरिला शुद्ध परमार्थ । त्यासी जनमान हा अनर्थ ।
तेणे वाढे विषय स्वार्थ । ऐका नेमस्त विचार ।।१४।।

पंच विषय हे या जगात जगण्याकरिता लागतातच पण साधक हे विषय जो टाळायला जातो तो तेच त्याच्या बोकांडी बसतात प्रथम कोणीहि मनुष्य प्रापंचिक लोकापेक्षा थोडे देवधर्माकडचे अधिक आचरण करू लागला म्हणजे लोक त्याची उगाचच स्तुति करू लागतात एखादा ग्रॅज्युएट मनुष्य दाढी वाढवून विवाह वगैरे न करता स्नानसंध्या थोडी लावलच

करू लागला की लोक म्हणतात की "काय हे वैराग्य काय ही धर्मनिष्ठा, सर्वच अपूर्व व अलौकिक! तो तरुण असेल तर तारुण्याच तेज स्वाभाविक असतेच, ते पाहून लोक म्हणतात की वा!! काय हे सात्विक तेज! ईश्वरी अंश आहे बुवा! अशी स्थिति होऊ लागली की साधक निम्माशिम्मा भरतो लोक अशा एखाद्याची बेसुमार स्तुति करून त्याला हरभऱ्याच्या झाडावर चढवितात व पुढे विचारा तो खाली पडतो

समजा एखा गावातील सुखवस्तु तरुण यात्रेला निघाला आणि यात्रा करून नर्मदातटावी राहून, गायत्री पुरश्चरणे करून जर तो परत आला तर लोक त्याची वाटेल तशी स्तुति करू लागतात बाहेरच्या लोकांच्या स्तुतीला गावच्यांनी व घरच्यांनी मदत केली म्हणजे मग विचारावयासच नको! शिवाय अशा माणसामध्ये खरोखरीच जर सद्बुद्धीचा आणि वैराग्याचा अंश असेल तर ते त्याचे नैराश्य पाहून आणि ती निस्पृहता देखून लोक त्याची फारच वाखाणणी करतात व सन्मानाने बोलावून पूजाअर्चाहि करू लागतात

नैराश्य पुरुष देखोनी । त्याची स्तुति करिति जनीं ।
एक सन्माने करूनि । पूजे लागूनि पैं नेती ।। १५ ।।
तव त्याचे वैराग्य कोमल कटक । नेट न धरीच निष्टंक ।
देखोनि मान स्तुति अलौकिक । भुलला देख पैं तेथे ।। १६ ।।

लोक असे सन्मानाने बोलावू लागले म्हणजे तो साधक मान व स्तुति यास भुलतो अशा गृहस्थाने बोलताना एखादी कोटी केली की लगेच ' काय हो ही मार्मिकता ' असे लोक म्हणतात विद्या नसता आणि वक्तृत्वहि नसताना जर लोक अवास्तव स्तुति करून 'काय ही विद्या, काय हें वक्तृत्व' काय हे सामर्थ्य' असे बडबडू लागले म्हणजे याच्याहि अंगावर मूठभर मांस येते संस्थानिकाच्या भोवती (किंवा पूर्वीच्या बादशहाच्या भोवती) जसे खुषमस्करे असतात, तसेच बिनपगारी खुषमस्करे या पारमार्थिक साधकाच्या भोवताली जमतात गोड बोलून कार्य साधणे व महाराजांची मर्जी प्रसन्नकरून घेणे एवढेच या खुषमस्कऱ्यांचे काम असते साधकाभोवती असा हा सामान्य

जनाचा गराडा पडू लागला म्हणजे हळुहळू सुशिक्षितहि येतात आणि त्यातील काही तर महाराज हे ईश्वराचा साक्षात अवतार आहे असेहि बोलूं लागतात

> जनस्तुति लागे मधुर । म्हणती हा उद्धरावया हरीचा अवतार ।।
> आम्हांलागीं जाहला स्थिर । धरी अपार शब्द गोडी ।। १७ ।।

साधकालाहि या भाषेमुळें आपण अवतार आहो, आपल्या वाणीत व शरीरात काही सामर्थ्य आहे असे उगाचच्या उगाच वाटू लागते मानसशास्त्र दृष्ट्या अशा गोष्टी घडतात की एखाद्याला १०।२० मंडळींनी ' काय हो, तुम्ही आजारी दिसता ' ' काय हो तुमची प्रकृति जरा नादुरुस्त दिसते असे वारंवार म्हटले तर सतत एकच गोष्ट ऐकल्यामुळें आजारी नसतानासुद्धा माणसाला आजारी आहोत असे वाटते तोच प्रकार यथेही होतो सारखी स्तुति, सारखा मान आणि आपण ईश्वरांश आहोत या कल्पनेचे आघात होऊं लागले म्हणजे साधक शब्दविषयाच्या मगरमिठीत चांगलाच सापडतो! मग त्याला कुणी उलट बोललेले सहन होत नाही, कुणी निंदा केली तर तो गुरगुरु लागतो कोणी सद्‌बुद्धीने महाराज हे चुकत आहे वरं नव्हे, असे सांगू लागला तर तो डोळे वटारु लागतो व स्वतःला काहीं तरी अद्वितीय समजतो ! !

थांब ! एकदा शब्दविषयाने अशी कुरघोडी केल्यावर मग ' चंचुप्रवेश मुसलप्रवेश या न्यायाने इतर सर्व विषय त्याला झोंबूं लागतात गोड भाषा, गोड शब्द, याप्रमाणेच लोक त्याला मग मऊ मऊ स्पर्शांनी गाजून टाकतात त्याबद्दल नाथाचे पुढील उद्‌गार विचारार्ह आहेत

> हा पांच विषयामाजी प्रथम । शब्द विषय उपक्रम ।।
> मग स्पर्श विषय सक्रम । झाला परम त्या कैसा ।।१८।।
> नाना मृदु आसनें घालिती । विचित्र पर्यंक निद्रेप्रती ।
> नरनारी आंग शुश्रूषा करिती । तेणे धरी प्रीति स्पर्शाची ।।१९।।

परमार्थमार्गाकडे प्रवृत्त झालेल्या साधकाची लोक प्रथम अवास्तव स्तुति करतात व मग हळूहळू आपल्या घराकडे पायधूळ झाडावी म्हणून बोलावतात हा साधक लोकांचे घरी जाऊ येऊं लागला म्हणजे लोकांशी त्याचा अधिक संबंध येतो काही वेळा असे होते की हे अमके महाराज बिलकुल

जेवत नाहींत, कांहीं खात नाहींत, उपास करतात, असे लोक म्हणतात. कांही बावतींत हें खरेंहि असतें. पण खात नाहीं, जेवत नाही, काही घेत नाही, असे कोणी म्हणूं लागला कीं लोक त्याच्या शरीराची सेवा करण्याकरितां धडपडूं लागतात. लोकांना बुवांच्या नादीं लागण्याचें वेड असतें, स्वतःचा उद्योग नसतो किंवा बुवांच्या नादानें आपलें कल्याण होईल अशी मुळी समजूत असते म्हणून कोणीकडून तरी चरणस्पर्श अथवा पादसंवाहन, निदान कांही तरी सेवा घडावी अशा भावनेनें लोक त्याच्या मागें लागतात. कोणी मऊमऊ आसनें, कृष्णाजिनें, व्याघ्रावरें महाराजांना देतात, तर कोणी हातपाय रगडण्याची इच्छा दर्शवितात. कोणी महाराजांकरितां गाद्या, गिरद्या, पलंग यांची व्यवस्था करूं लागतात. याप्रमाणें शब्दानंतर स्पर्श व स्पर्शानंतर रूप व रस हे विषय साधकाला गिळून टाकतात.

पायावर स्त्रियांनीं पाणी घालावयाचें, पाय स्त्रियांनीच पुसावयाचे, विडा स्त्रियांनीच कुटून द्यावयाचा, अंगाला उटी स्त्रियांनीच लावावयाची असा सर्वत्र स्त्रियांचा गराडा पडला म्हणजे त्याच्या डोळ्यालाहि सुंदर सुंदर स्त्रिया नेहमी पाहण्याची संवय लागते; व त्या न दिसल्या म्हणजे तो कावरावावर होतो. भोंवताली स्तुतीचें वातावरण, खाण्याला घृतकुल्या-मधुकुल्या, शरीरसेवेकरितां बहुतेक स्त्रिया व क्वचित् पुरुष असें व्हायला होऊं लागलें की अधःपतनाला अवकाशच नसतो. स्त्री, वित्त व लौकिक हीं आपोआप त्याच्या मागें लागतात व परमार्थ बाजूला राहून साधकाला तेच वर वाटतें.

> रूप विषय तरी गोवी । वस्त्रें भूषणें देती बरवीं ।
> तेणें सौंदर्यें करी जीवी । देहभावें श्लाघ्यता ॥ २० ॥
>
> रूपविषय ऐसा जडला । मग रसविषय कैसा झोंवला ।
> जें जें आवडे तें तयाला । गोड गोड अर्पिती ॥ २१ ॥

जगात चमत्कार असा आहे कीं जो मला स्त्री नको, वित्त नको असे म्हणतो आणि वैराग्यामुळें जो प्रपंचहि नको म्हणतो, त्याच्या मागें लोक संसार लावतात ! जो म्हणतो की मला परमार्थ साधावयाचा आहे, त्याला तो साधू देत नाहीत. ज्याची इच्छा जगापासून अलिप्त राहून अत्यंत

वैराग्यानें ईशचिंतनांत काळ घालवावा, ही त्याची इच्छा लोक पुरी करूं देत नाहींत. कोणी मिष्टान्नें खावया घालून, तर कोणी सेवा करून, तर कोणी चंदनाच्या उटया, केदार, बुक्का याचें विलेपन करून त्याला बिघडवितात. त्याचा परिणाम पुढें असा होतो की जे लोक प्रथम प्रथम त्याची स्तुति करतात, तेच पुढें त्याची निंदाहि करूं लागतात व म्हणतात की हे महाराज पूर्वी फार विरक्त होते, पण आता मात्र पूर्ण बिघडले ! पूर्वपरिचिताकडून अशी तोंडावर निंदा होऊं लागली तरी त्याला कांहीं अनुताप उत्पन्न होत नाहीं व मग केवळ निर्लज्जपणें आपला डामडौल कसा राहील एवढेंच तो पाहूं लागतो. याविषयीं नाथ पुढीलप्रमाणें म्हणतात

आवडे सुमन चंदन । बुक्का केशर विलेपन ।।
ऐसे पाचहि विषय पूर्ण । जडले जाण सन्मानें ।। २३ ।।
मग जे जे जन वंदिती । तेचि त्याची निंदा करिती ।
परि अनुताप नुपजे चित्तीं । ममता निश्चितीं पूजकाची ।। २४ ।।

याप्रमाणें साधकाचा परमार्थ तर बिघडतोच पण जे लोक त्याच्या नादीं लागलेले असतात त्यांचा प्रपंचहि बिघडतो. वैराग्याचा जोर कमी झाल्यामुळें विषय, वित्त आणि लौकिक याच्या पाशांत साधक सांपडतो. म्हणजे प्रापंचिक लोक साधकाला प्रापंचिक बनवून 'आपणासारिखे तात्काळ करिती' असें करतात. तसा तो प्रापंचिक बनला म्हणजे धंदेवाईकपणें प्रतिष्ठा वाढेल कशी व पैसा मिळेल कसा हें तो पाहातो. मग पिशाच्चें काढणें, अंगारे देणें, गंडेदोरे, मंत्रतंत्र, छाछू हें सर्व सुरू ठेवतो. त्यामुळेंहि बराचसा स्त्रीपुरुष समाज नादीं लागत असतो.

अलीकडे सत्पुरुषांच्या भोंवती नेहमीं स्त्रियांचा घोळका असतो. शिवाय कित्येक लोक असेंहि म्हणतात की आहो, महाराजांची दृष्टि सर्वत्र सम आहे, तेव्हां त्यांना स्त्रिया काय व पुरुष काय सर्व सारखेंच ! पण स्त्रियांचें स्मरण, त्यांच्याशीं गोष्टी बोलणें, विनोद करणें, टक लावून पाहाणें हें सगळें परपरेनें मैथुनांचेच आठ प्रकार आहेत, असें शास्त्रकार म्हणतात

स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्य भाषणं ।
संकल्पोऽध्यवसायश्च क्रियानिष्पत्तिरेवच ।।

शिवाय परमार्थ साधणाऱ्या साधकाला (धदेवाईकाला नव्हे) एकंदरीत सर्वच विषय विशेषत: स्त्रीविषय किती बाधक असतो, याचें विवेचन श्री एकनाथांनी आपल्या भागवतामध्यें ठिकठिकाणी केलेलें आहे. तेव्हां त्यांतील कांही उतारे येथें देतों.

नाथभागवत अ. १७ श्लो. ३३

स्त्री ते अग्निकुंडासमान । पुरुष तो घृतकुंभ जाण ।
तेथ द्रवतां अंत:करण । अर्धक्षण लागेना ।३४६।।
घृत वेचलियापाठीं । घटासी जाहल्या वर्षें साठी ।
तरी अग्निशीं जाहल्या भेटी । द्रवतां पोटीं तोहि धरी ।।३४७।।
तेवी वार्धक्य वयसेंसीं । एकांत जाहलिया स्त्रियेशीं ।
गोष्टी मात विनोदेंसी । कामाचा त्यासी घाला पडे ।।३४८।।

ना. भा. अ. २६ श्लो. २२

अग्निमाजी घृताची वस्ती । जरी बहुकाल निर्वाहती ।
तरी स्त्रीसंगें परमार्थी । निजात्मस्थिति पावते ।।२४३।।
घृत वेंचल्या वर्षे झालीं साठी । तरी अग्निसंगें द्रव उपजे घटीं ।
तेवी प्रमदासंगपरिपाठी । वार्धकींही उठी अति कामू ।।२४४।।
जरी कापूर अग्नी आंत । नांदो लाहतां न पोळत ।
तरी स्त्रीसंगें परमार्थ । पावते समस्त परब्रह्म ।।२४५।।
अग्निपोळा धरिली हाती । तैशी स्त्रियांची संगती ।
संगें वाढवी आसक्ति । पाडी अनर्थी पुरुषातें ।।२४६।।

वरील ओव्यांचा अर्थ लक्षांत घेतां स्त्रियांचा घोळका हा परमार्थाच्या दृष्टीनें किती घातक आहे याची कल्पना येईल. शिवाय,

तैसें सेवितां विषयासी । कोण गोठी मुमुक्षूंसी ।
प्रतिपदीं आत्मघातासी । अहर्निशी देखती ।।८३।। अ. ७ श्लो. ९
ज्ञात्यासी स्वेच्छा विषयाचरण । सर्वथा न घडे गा जाण ।
तेही विषयांचें लक्षण । सावधान परियेसी ।।११५।। अ. ७ श्लो. ११
कनक आणि कामिनी । ज्यासी नावडे मनींहूनी ।
तोचि जनार्दनु जनीं । भरवसेंनी ओळग पां ।।१२०।। अ. ८ श्लो. ३९

त्यागावी कामिनी सगती । हा मुख्य त्याग परमार्थी ।
हचि स्वमुख श्रीपती । उद्धवाप्रती बोलिजेला ॥३४९॥ अ १७ श्लो ३३

वरील आव्याचा वारवाईने विचार केला म्हणजे खरा परमार्थ हा फारच कठिण आहे आणि परमार्थाचा धदा करून जगणें फार सोप आहे असे वाटत काही अधिकार नसताना वैराग्य नसताना जी माणस केवळ परमार्थाच्या नावाखाली महाराज किंवा बुवा बनतात आणि आम्ही राजयोगी आहोंत म्हणून वाटेल तसें वागून अनाचार माजवितात त्याचा धिक्कार करावा तेवढा थोडाच आह

ना. भा. अ. २८ श्लोक २८

आम्ही राजयोगी यतिश्रेष्ठ । म्हणोनि विषय भोगी यथष्ट ।
वास पडली वैराग्य पेठ । कुयोग चोखट या नाव ।। ४१२ ।।
आपली चोरूनि विषयासक्ति । बाह्य मिरवी मिथ्या विरक्ति ।
हचि कुयोगाची स्थिति । जाण निश्चिती उद्धवा ।। ४१३ ।।
अ २९ श्लोक २

वदूनिया ब्रह्मज्ञान । हातों शिश्नादरपरायण ।
नि हा शिश्न जा आवरी जाण । तया ब्रह्मज्ञान कल्पियुगा ॥९२४॥

पण लोकात धर्मभोळेपणा फार, मूर्खपणाहि फार, यामुळ मूर्खांच्या पैशावर लुच्चे लोक जगतात, ही गोष्ट काही खोटी नाही ईश्वरभक्ति व परमार्थ हे धदे नव्हेत, यावर जाणारे लोक लुच्चे आहेत, ते परमार्थाच्या मार्गावरून पतित झालेले आहेत, अर्थात् त्याचा धिक्कार करणे ह एव आपल कर्तव्य असच समाजाने समजले पाहिजे ढोंगी साताची फटफजिती करण्यात मुळीच अधर्म नाही उलट त्यास क्षमण्यातच मोठा अधर्म आहे, हे श्री तुकाराम महाराज याच्या अभग वाणीनच पुढील प्रकरणात सागता



तरुण राजयोगी महाराजांची आरती चालूं आहे. (पृ १०८)

प्रकरण १२ वें

# तुकाराम व ढोंग्यांचा परामर्ष

श्री तुकाराम हे संतहि होते व कवीहि होते. त्यांना अर्वाचीन काळातील एक मोठे सत्पुरुष असे लोक समजतात. तुकाराम महाराजांच्या अभंगांना चांगलेंच मान आहे आणि वारकरी सांप्रदायांत तर त्यांचे अभंग वेद तुल्य मानतात. म्हणून त्यांच्या अभंगवाणीच्या आधारे सत्पुरुषांची पूर्वस्थिति कशी असते, ते साधकदशामध्यें कसे वागतात, सिद्धावस्थेंत ते कसा व्यवहार करतात, आणि गुरुबद्दल ते काय म्हणतात व त्यांची लक्षणे कोणती हे सर्व येथे सांगावयाचे आहे.

तुकारामाचे अभंग* म्हणजे शास्त्रीय ग्रंथ नव्हे किंवा सुसंबद्ध असें काव्यहि नव्हे. त्यांचे अभंग म्हणजे हजारो प्रसंगी अंतःकरणामध्यें उचंबळलेल्या व उसळलेल्या वृत्ति! त्या वृत्तींचे ते शाब्दिक प्रतिबिंब होय. तथापि त्यांतहि हृदयांतील तळमळ व ठाशीव सिद्धांत असल्यामुळें त्यांचे महत्त्व फार आहे.

(२४६७) साधकाची दशा उदास असावी। उपाधी नसावी अंतर्बाह्य ॥१॥
लोलुपता काय निद्रेसी जिंकावें। भोजन करावें परिमित ॥२॥
एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण। प्राण गेल्या जाण करूं नये ॥३॥
तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे। तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा ॥४॥
(२४६८) निर्वाहापुरतें अन्न आच्छादन। आश्रमासी स्थान कांपी गुंफा ॥१॥
कोठेंहि चित्तासी नसावें बंधन। हृदयीं नारायण साठवावा ॥२॥
नये बोलों फार बैसों जनामधीं। सावधान बुद्धि इंद्रियें दमा ॥३॥

---

* टीप—अभंगाचे आंकडे निर्णयसागरची गाथा आवृत्ति दुसरी यांतील आहेत.

तुका म्हणे घडी घडीने साधावी । त्रिगुणाची गोवी उगवूनि ।।४।।
(२८७०) आशा हे समूळ खाणोनि काढावी । तेव्हाचि गोसावी व्हावे तेणें ।।१।।
नाही तरी सुखे असावे ससारी । फजीती दुसरी करू नये ।।२।।
आशा मारनिया जयवत व्हावे । तेव्हाचि निघावे सर्वातूनि ।।३।।
तुका म्हणे जरी योगाची तातडी । आशेची बिबुडी करी आधी ।।४।।
(२५०८) साहोनिया टाकी पाये । पाषाण देवचि झाला पाहे ।।१।।
(२५५३) देखोवेखी तें ज्ञान करावे त काई । अनुभव नाही आपणासी ।।१।।
इद्रियाचे गोडी ठकली बहुते । सोडिता मागुते आवरेना ।।२।।
युक्तीचा आदर नीतीचा वेव्हार । वैराग्य ते सार तरावया ।।३।।
नाव नावळिता घाला घाली वारा । तैसा तो पसारा अहतेचा ।।४।।
तुका म्हणे बुद्धी आपुले अधीन । करी नारायण आतुडे तो ।।५।।

वरील पाच अभगामध्ये तुकारामानी साधक स्थितीमध्ये वागण्याचे नियम सागितले आहेत त्यान उदास असावे, उपाधिविवर्जित असावे, युक्ताहारविहारी असावे आणि स्त्रियाशी एकातात व उघडही शब्द तवढा सवय अणू नये. जगायला अन्न ह पाहिजेच व राहायला स्थान ह पाहिजेच । परतु त्याविषयीही फार आसक्ति नसावी इद्रियदमन व चित्त-वाग्र इकडे लक्ष असावे सावधान आशापाशात गुतू नये आशेवर जो जय मिळवील तोच योगी होईल टाकीचे घाव सोसल्याशिवाय देवकळा येत नाही इद्रियाच्या मोहाने आजवर फार लोक फसले आहेत म्हणून साधकान वैराग्यसपन्न असावे नाव जशी वाऱ्यात सापडली की बुडते तसाच अहतेचा घाला केव्हा येईल याचा नेम नसता ममकार व अहकार हे साधकाचे शत्रु होत त्याच्या तावडीत न सापडता जो बुद्धि जतन करून ठेवतो त्यालाच ईश्वर भेटतो

पुढील काही अभगामध्ये त्यानी आणखीहि साधकाच्या स्थितीविषयी नियम सागितले आहेत ते अभग असे —
(५०१) पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आम्हा नारायण तैशापरी ।।१।।
सर्व भावे लोभ्या आवडे हे धन । आम्हा नारायण तैशापरी ।।२।।
तुका म्हणे एकविध झाले मन । विठ्ठलावाचून नेणे दुजे ।।३।।

असतें. अनेक मोह आले व ते चित्तविक्षेप करूं लागले तरी त्याचें धैर्य इतकें अचल व अभंग असतें कीं हा साधक आपल्या ध्येयापासून कधीहि च्युत होत नाही.

आतां पुढील कांहीं अभंगांत अशा साधक स्थितीतून जो क्रमानें सिद्ध सत्पुरुष होतो तो कसा असतो, याचें वर्णन श्री तुकारामांनीं केलेलें आहे.

(३१३०) कांहीं न मागें कोणासी । तोचि आवडे देवासी ॥१॥
देव तयासी म्हणावें । त्याचे चरणीं लीन व्हावें ॥ २ ॥
भूतदया ज्याचे मनीं । त्याचे घरीं चक्रपाणी ॥ ३ ॥
नाही नाही त्यासमान । तुका म्हणे मी जमान ॥ ४ ॥

जो कोणाजवळ कांही मागत नाहीं हें पहिलें सत्पुरुषाचें लक्षण होय! ज्याच्या ठिकाणी निरपेक्षता बाणलेली आहे तोच देव होय! अर्थात् त्याच्याच मनामध्यें भूतदया असते. जो स्वतःच अपूर्ण, अतृप्त व आशाळभूत असतो तो दुसऱ्याचें कल्याण कसचा करतो?

आजकाल संतांचा फार सुळसुळाट झाला आहे. प्रत्येक गांवांत एकादा तरी निरुद्योगी संत असतोच. लोक मूर्ख असल्यामुळें अशाच्या नादीं लागतात व त्या संताचें प्रस्थ माजतें श्रीतुकाराम म्हणतात—

(१९३४) धर्मकाचे साठीं । पंतें हातीं धरिली पाटी ॥ १ ॥
तैसे संत जगीं । क्रिया करूनी दाविती अंगीं ॥ २ ॥

खरे संत नुसत्या ब्रह्मज्ञानाच्या व देवाच्या गप्पा मारणारे नसतात, तर ते स्वतःच्या क्रियेनें लोकांना शिकवितात. स्वतः कांही न करतां बडबडणें व कुत्र्याचें भुंकणे हीं दोन्ही सारखींच होत!

(१९४७) ऐसा ज्याचा अनुभव । विश्वीं देव सत्यत्वें ॥ १ ॥
देव तया जवळी असे । पाप नासे दर्शनें ॥ २ ॥
कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं जाली समता ॥ ३ ॥
तुका म्हणे भेदाभेद । गेले वाद खंडोनी ॥ ४ ॥

(१९५४) जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टविती उपकारें ॥३॥
भूतांची दया हे भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥४॥

(५५४) एक धरिला चित्तीं । आम्ही रखुमाईचा पती ॥१॥.
तेणें जालें अवघें काम । निवारला भवश्रम ॥२॥
परद्रव्य परनारी । जाली विषाचिया परी ॥३॥
(६३६) परनारी मज रखुमाईसमान । वमनाहुनी धन नीच मानी ॥२॥
(१२९४) शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगी । परावृत्त संगी कामादिकां ॥३॥
विवेकासहि वैराग्याचे बळ । धगधगितो ज्वाळ अग्नि जैसा ॥४॥
(१६७८) माझें मन पाहे कसून । चित्त न ढळे तुजपासून ॥१॥
कापूनि देईन शिर । पहा कृपण की उदार ॥२॥
मजवरी घाली घण । परि मी न सोडी चरण ॥३॥
तुका म्हणे अंतीं । तुजवांचूनि नाही गती ॥४॥
(१६७६) रात्रीदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ॥१॥
(१८६८) कामक्रोध बंदिखाणी । तुका म्हणे दिले दोन्ही ।
इंद्रियांचे धणी । आम्ही झालों गोसावी ॥४॥
(१८७७) सोनें रुपें आम्हा मृत्तिकेसमान । माणिकें पाषाण खडे तैसे ॥३॥
तुका म्हणे तैशा दिसतील नारी । रिसाचियेपरी आम्हापुढें ॥४॥
(१९२१) न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥१॥
ऐसी माझी वाणी मज उपदेशी । आणिका लोकांसी हेंचि सांगे ॥२॥
विटंबो शरीर होत कां विपत्ति । परि राहो चित्तीं नारायण ॥३॥

वरील अभंगांवरून असें दिसतें कीं साधकाचें मन एकविध असतें. त्याच्या मनाला परमेश्वरावाचून दुसरा विषय शिवत नाही. मग परस्त्री व परद्रव्य यांच्या अभिलाषाची तेथें वार्ता कशाला ? साधकाच्या ठिकाणीं धगधगीत अग्नीप्रमाणे सविवेक वैराग्य असते, त्यामुळें त्याचें मन कामादिकांचा संगच करीत नाही. शांति, क्षमा, दया हे अलंकार त्याचे अंगावर मूर्तिमंत दिसतात. त्यामुळें साधकाच्या चित्ताची कितीहि कसून परीक्षा घेतली तरी तेथें ईश्वराशिवाय विषयच आढळत नाहीं.

खरा साधक बाह्य जग व आंतील षड्रिपु यांच्याशी झगडून तो इंद्रियांचा स्वामी बनतो. खऱ्या साधकाला स्त्रीची, वित्ताची व द्रव्याची कधीच अपेक्षा नसते; तर त्याला एका नारायणाशिवाय कांहीं नको

असतें अनेक मोह आले व त चित्तविक्षेप करू लागले तरी त्याचे धैर्य इतके अचल व अभग असते की हा साधक आपल्या ध्येयापासून कधीहि च्युत होत नाही

आता पुढील काही अभगांत अशा साधक स्थितीतून जो क्रमान सिद्ध सत्पुरुष होतो तो कसा असतो, याचे वर्णन श्री तुकारामांनी केलेले आहे

(३१३०)काहीं न मागे कोणासी । तोचि आवडे देवासी ॥१॥
देव तयासी म्हणाव । त्याचे चरणी लीन व्हाव ॥ २ ॥
भूतदया ज्याचे मनी । त्याचे घरी चक्रपाणी ॥ ३ ॥
नाही नाही त्यासमान । तुका म्हणे मी जमान ॥ ४ ॥

जो कोणाजवळ काही मागत नाही ह पहिल सत्पुरुषाचे लक्षण होय। ज्याच्या ठिकाणी निरपेक्षता बाणलेली आहे तोच देव होय। अर्थात् त्याच्याच मनामध्यें भूतदया असत जो स्वत च अपूर्ण, अतृप्त व आशाळभूत असतो तो दुसऱ्याच कल्याण कसचा करतो ?

आजकाल सताचा फार सुळसुळाट झाला आह प्रत्यक गावात एकादा तरी निरुद्योगी सत असतोच लोक मूर्ख असल्यामुळें अशाच्या नादी लाग तात व त्या सताच प्रस्थ माजत श्रीतुकाराम म्हणतात--

(१९३४) अर्भकाच साठी । पत हाती धरिली पाटी ॥ १ ॥
तैसे मन जगी । क्रिया करूनी दाविती अगी ॥ २ ॥

खर सत नुसत्या ब्रह्मज्ञानाच्या व देवाच्या गप्पा मारणारे नसतात, तर त स्वतःच्या क्रियन लोकाना शिकवितात स्वत काही न करता बडबडणे व कुत्र्याचे भुक्ण ही दोन्ही सारखीच होत।

(१९४७) ऐसा ज्याचा अनुभव । विश्वीं देव सत्यत्वें ॥ १ ॥
दव तया जवळी अस । पाप नासे दशन ॥ २ ॥
कामक्रोधा नाही चाली । भूती जाली समता ॥ ३ ॥
तुका म्हण भेदाभद । गले वाद खडोनी ॥ ४ ॥

(१९५४) जगाच्या कल्याणा सताच्या विभूति । देह कष्टविती उपकार ॥३॥
भूताची दया हे भाडवल सता । आपुली ममता नाहीं देही ॥४॥

(१९५५) काय सांगों आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥१॥
काय द्यावें त्यांसी व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥२॥
सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥३॥
तुका म्हणे वत्स धेनुचिया रीतीं । तैसे मज येती सांभाळीत ॥४॥

(१९६९) जे का रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥ १ ॥
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥ २ ॥
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचे चित्त ॥ ३ ॥
ज्यासि आपंगिता नाही । त्यासि धरी जो हृदयी ॥ ४ ॥
दया करणें जे पुत्रासी । तेचि दासां आणि दासी ॥ ५ ॥
तुका म्हणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥ ६ ॥

(१९८३) धन्य ते संसारी । दयावंत जे अंतरी ॥ १ ॥
येथें उपकारासाठी । आले घर ज्यां वैकुंठीं ॥ २ ॥
लटिकें वचन । नाही देही उदासीन ॥ ३ ॥
मधुरा वाणी बोटीं । तुका म्हणे वाव पोटी ॥ ४ ॥

वरील पांच अभंगांत तुकारामांनी सत्पुरुष लक्षणें मोठ्या मार्मिकपणें मांडिलीं आहेत. विश्वामध्यें देव आहे असा ज्याला अनुभव आला, सर्वत्र समत्व ज्याला वाणलें, स्वतःच्या देहावरचें ममत्व जाऊन भूतदया हेंच ज्याचें भांडवल ठरलें, ज्याचे सहज बोलणें उपदेशासारखें होऊं लागलें, तोच संत होय !

संत आपल्या रंजलेल्या व त्रस्त झालेल्या देशबंधूंची स्थिति नीट पाहतो, धान्य पिकवून त्यांना जेवावयाला कां मिळत नाहीं, हवापाणी चांगलें असून लोकांचें आरोग्य का बिघडलें, यांचा तो बुद्धिपूर्वक अभ्यास करतो, आणि त्यांचें मूळ शोधून तें निवारण करण्याचा यत्न करतो. क्षुधिताला अन्न, आर्तांला औषध, नग्नाला वस्त्र देणें, यानेंहि त्रस्तांचें दुःख हरण होतें, पण ही सामान्य गोष्ट होय ! रंजल्या गांजलेल्यांचें खरें दुःख घालविण्यास दुःखाचें मूळच शोधावे लागतें. जे दयावंत या जगांत उद्योगाची पराकाष्ठा करून लोकांवर उपकार करतात व मधुर वाणीनें लोकांना आकर्षून घेतात, तेच खरो-खरी धन्य होत. अशा संतांचे बळ व बुद्धि हीं केवळ उपकारार्थच असत.स-

(१९८९)नाही संतपण मिळत हे हाटीं । हिंडतां कपाटीं रानीं वनीं ॥१॥
नये मोल देतां धनाचिये राशी । नाहीं ते आकाशीं पाताळीं तें ॥२॥
तुका म्हणे मिळे जिवाचिये साटीं । नाहीं तरी गोष्टी बोलो नये ॥३॥
(२००४)भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनि ॥१॥
विषय तो त्याचा झाला नारायण । नावडे धनजन माता पिता ॥२॥
निर्वाणी गोविंद असे मागें पुढें । काहीच सांकडें पडों नेदी ॥३॥
तुका म्हणे सत्य कर्मा व्हावे साह्य । घातलिया भय नर्का जाणें ॥४॥
(२०१६)बळबुद्धि त्याची उपकारासाठीं । अमृत ते पोटीं साठविलें ॥४॥
दयावंत तरी देवाच सारिखीं । आपुली पारखी नोळखती ॥५॥
तुका म्हणे त्याचा जीव तोचि देव । वैकुंठ तो ठाव वसती तें ॥६॥
(२०२५)वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥१॥
नाही आणिक प्रमाण । तन धन तृण जन ॥२॥
पडतां जड भारी । नेमा न टळे निर्धारीं ॥३॥
(२०४१) संतांसि तो नाहीं सन्मानाचि चाड । परि पडे द्वाड अव्हेरितें ॥१॥
तुका म्हणे जया सर्वोच दर्शनें । तया ठाया जाण अनुचित ॥४॥
(२०५५)हिरा ठेविता एरणी । वाचे मारिता जो घणी ॥१॥
तोचि मोल पावे खरा । करणीचा होय चुरा ॥२॥
मोहरा तोचि अंग । सूत न जळे ज्याच्या संगें ॥३॥
तुका म्हणे तोचि संत । सोशी जगाचे आघात ॥ ४ ॥
(२०७७) बोल बोलतां वाटे सोपें । करणी करतां टीर कांपे ॥१॥
नव्हे वैराग्य सोपारें । मज बोलतां न वाटे खरें ॥२॥
विष खावें ग्रासोग्रासीं । धन्य तोचि एक सोसी ॥३॥
तुका म्हणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जीवीं ॥४॥
(२०९४) चंदनाचे हात पाय ही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥१॥
दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साकर अवघी गोड ॥२॥
तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पाहतां अवगुण मिळेचिना ॥३॥
(२१३०) तुका म्हणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेई ॥६॥
(२१४७) शुद्ध चर्या हेचि संतांचे पूजन । लागतचि धन नाहीं वित्त ॥१॥
सद्गुणाचे सोई सगुण विश्रांती । आपणचि येती चोजवीत ॥२॥
तुका म्हणे वर्म सांगतां सवंगें । मन लाया लागे स्वहिताच्या ॥४॥

(२१५०) उपकारि असे आरोणि उरला । आपुल तयाला पर नाही ॥१॥
लाभावरी घ्याव सापडलें काम । आपला तो श्रम न विचारी ॥२॥
जीवा ऐसे देख आणिका जिवासी । निखळचि राशि गुणाचीच ॥३॥
तुका म्हणे देव तयाचा पागिला । न भग सचला धीर सदा ॥४॥

वरील सव अभग पुन्हा पुन्हा विचार करण्याजोग आहेत सत पणा ही काही बाजारात मिळणारी वस्तु नव्हे त्याच्या प्राप्तीकरिता जिवाचा मोबदला द्यावा लागतो सव आशापाश नष्ट करून धनावर व लौकिकावर लाथ मारून केवळ सत्य कर्मामध्ये जव्हा रगून जावे त्याच वेळी सर्वत्र असणारा गोविंद निर्वाणीहि धावतो खऱ्या सताना, ज्याना हरी मनापासून आवडतो, अशाच्याच सहवासाची इच्छा असते त्याना मान नको सन्मान नको, त्याचा सन्मान होऊ लागला तर त्याना सकोच वाटतो जगत् दु ख निवारण्याकरिता खरा सत्पुरुष अनक आघात सोसतो आणि मोठ्या निश्चयान अपमान, निंदा, दु ख, कष्ट ही सर्व सहन करून दृढतर यत्नान आपले ध्येय गाठतो

चदनाला जसा सर्वत्र सुवास, साखरेमध्ये जशी सर्वत्र गोडी, तसच सत सज्जनाच्या ठिकाणी सर्वत्र सद्गुणच आढळतात सत्पुरुषाच्या अगी अवगुण औषधालाहि मिळत नाही आत्मवत सर्व भूताचे ठिकाणी पाहा ण्याची दृष्टि ज्याला आलली आहे, अशा सताच्या भेटीकरिता यात्रा कराव्या लागत नाहीत, मठ धुडाळावे लागत नाहीत व अनुग्रहहि घ्यावा लागत नाही तर आपल्या क्षेत्रातच राहून कर्तव्य कले व सदाचारान वागल म्हणजे खरे सत अशा माणसाना शोधतच यतात खऱ्या सताच्या भटीला धन व वित्त ही लागत नाहीत सद्गुणसपन होणे, शीलवान् बनणे हच सत्पुरुषाच्या भेटीचे साधन होय !

' समानशीलव्यसनपु सख्यं ' असा न्याय आह खरे सत ह समानशील व्यक्तीच्याकरिता भुकेलेले असतात

(२०१२) माझिया जातीचे मज भेटो कोणी । आवडीची धणी फडाया ॥१॥
आवड ज्या हरि अतरापासुनि । एमियाचे मनी आर्त मार्ने ॥२॥
तयालागी जीव होतो कासावीस । पाहातील वास नमा ह ॥३॥

तेव्हा खरे संत भेटावे अशी जर इच्छा असेल तर आपली परिस्थिति, आपली बुद्धि व आपली शक्ति ही ध्यानात घेऊन धैर्याने व उत्साहाने आपले कर्तव्य करीत राहाणे हेच योग्य होय !

जगामध्ये कष्टाशिवाय व उद्योगाशिवाय काही मिळत नाही टाकीचे घाव सोसल्याशिवाय जशी देवकळा येत नाही, त्याचप्रमाणे टक्के टोणपे खाऊन अपमान व दुःख ही गिळून, दगदग सोसून जो आपले ध्येय गाठतो तोच खरा मनुष्य होय ! अशा माणसालाच मत भेटतात टिळेटोपी धारण करणे, माळा घालणे, भस्म लावणे, देव दाखवितो म्हणणे ही संतलक्षण नव्हेतच ! पुढील अभंगात तुकाराम संताचे वर्णन करितात

अंतरी निर्मळ वाचेचा रसाळ । त्याचे गळा माळ असो नसो ॥१॥
आत्मानुभवी चोखाळिल्या वाटा । त्याचे माथा जटा असो नसो ॥२॥
परस्त्रीचे ठायी जो वा नपुंसक । त्याचे अंगा राख असो नसो ॥३॥
परद्रव्या अंध निंदेसी जो मुका । तोचि संत देखा तुका म्हणे ॥४॥

या अभंगातील प्रत्येक शब्द विचारार्ह आहे यामध्ये ना भजन, ना टाळ कुटणे, ना उपदेश देण, ना नामस्मरण करणे, काही सांगितलेले नाही. केवळ सदाचारसंपन्नता हेंच सत्पुरुषलक्षण होय असें येथें म्हटलेलें आहे आणि खरे संत म्हणा किंवा सत्पुरुष म्हणा अत्यंत सदाचाराने राहून लोकांचे दैन्य, पाप व ताप ही नष्ट करीत असतात आपल्या प्रबोधशक्तीने समाजाचे हृदयदौर्बल्य व बुद्धिदौर्बल्य घालवून त्यांना प्रज्ञावान् करतात व समाजाला आत्मविश्वासी बनवितात सत्पुरुष हे निर्भय, कर्तृत्ववान असें असल्यामुळें दगडालाहि पाझर फोडण्याचे सामर्थ्य त्यांच्या अंगी असते उद्योगाने व यत्नानेच सर्व मिळतें असे ते समाजाला शिकवितात त्यांच्या तोंडून कोणाला द्रव्य मिळेल अगर मुलगा होईल अगर बढती मिळेल असले शब्द चुकून सुद्धा निघत नाहींत. कारण असें जर उद्गार चुकून निघाले तर सत्पुरुष अध पतित होतो व भोंवतालचा समाज आळशी, प्रज्ञाहत व निरुद्योगी होतो म्हणून तुकाराम म्हणतात—

(१८७०) माझ्या मुखावाटा नयो हे वचन । म्हणे हे संतान द्रव्य कोणा ॥१॥
कुवाचा विभाग पतन दुःखासी । दोन्ही मुळे त्यासी तेचि साध्य ॥२॥

नाइकावी निंदा स्तुति माझ्या कानें। सादर या मन होऊनिया ॥३॥
तुका म्हणे देव असाध्य यामुळे। आशा मोहजाळें गुतलिया ॥४॥

ज्या कारणामुळें देव असाध्य होतो, सत्पुरुषहि पतित होतो व समाज प्रज्ञाहत होतो तीं सर्व नाहींशीं करण्याबद्दल वरील अभंगात इच्छा प्रगट केली आहे अर्थात् अशा तऱ्हेचे अधिकारी संत विरळाच। तथापि जगात अशा विरळाची भेट व्हावी असें जर कोणी इच्छित असेल तर त्याचेंहि साधन पुढील प्रमाणें आहे

(१९४६) मन बुद्धि काया वाचा शुद्ध करी। रूप सर्वत्र देखोनी नमस्कारी ॥
लघुत्व सर्व भाव अंगिकारी। साडी माडी मी तू पण ऐसी थोरी ॥
अर्थ काम चाड नाहीं चित्ता। मानामान मोह काय मिथ्या ॥
वर्ते समाधानी जाणोनि नेणता। साधु भेट देती तया अवचिता ॥

येथवर केलेल्या विवेचनावरून वाचकाच्या हें लक्षात येईल की सत्पुरुष हे साधकावस्थेंत व सिद्धावस्थेंतहि विवेक व वैराग्य यानीं युक्त असतात, इंद्रियनिग्रही असतात, स्त्री, वित्त व लौकिक याचा अभिलाष ते धरीत नाहीत, कामक्रोधावर ते जय मिळवितात ते सच्छील व सदाचार-संपन्न असतात स्वतःच्या कृतीनें लोकाना उदाहरण घालून देतात रंजल्या-गांजलेल्याच्या दुःखाचें मूळ शोधून ते नष्ट करण्याचा यत्न करतात आपलें बल व आपली बुद्धि ही उपकाराकरिता खर्च करतात ते दैवी संपत्तीचे पुतळे, निर्भयतेचे अचल, ध्ययनिष्ठ व ईश्वराचाहू कुणाचीहि पर्वा न करणारे असे असतात समाजाचें दैन्य घालवून हृदयदौर्बल्य नष्ट करून त्याना प्रज्ञावान करतात खरोखरीच वरील लक्षणानी युक्त असे संत दुर्मिळ नव्हेत काय? आता जे लुच्चे भोंदु, ठक, दांभिक असे आहेत, व जे लोकाना प्रज्ञाहत करून कुमार्गाला लावून आपली तुम्बडी भरीत असतात त्याचाहि धिःकार तुकारामानीं काहीं कमी केला नाही तो कसा कडक केला आहे हें पुढील काहीं अभंगावरून दिसून येईल

(२५६४) गाजराची पुंगी। तैसे नवे झाले जोगी ॥ १ ॥
काय करोनी पठण। केली अहंता जतन ॥ २ ॥
अल्प असे ज्ञान। अंगीं ताठा अभिमान ॥ ३ ॥
तुका म्हणे लंड। त्याचें हाणोनि फोडा तोंड ॥ ४ ॥

(२५६५) घालूनिया मत्र्यपर्ती । दाटुनि उपदेश देती ॥ १ ॥
एसे पोटभरे सत । तया कैंचा भगवत ॥ २ ॥
राडा पोरात गोचिती । वर्षासने ते लाविती ॥ ३ ॥
जैसे बोलती निरोपणी । तैसी न करिती करणी ॥ ४ ॥
तुका म्हणे तया । तमोगुणियाची क्रिया ॥ ५ ॥

(२५६६) परद्रव्य परनारी । अभिलासूनि नाच धरी ॥ १ ॥
जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ॥ २ ॥

(२५८१) एसे सत झाले कळी । तोडी तमाखूची नळी ॥ १ ॥
स्नानसध्या बुडविली । पुढें भाग वोडविली ॥ २ ॥
भाग भुका ह साधन । पचनी पडे मद्यपान ॥ ३ ॥
तुका म्हण अवघें साग । तेथें कैंचा पाडुरग ॥ ४ ॥

(२५८३) एक करिती गुरु । भोवता भार शिष्याचा ॥ १ ॥
पुस नाही पाय चारी । मनुष्य परी कुतरी ती ॥ २ ॥
परस्त्री मद्यपान । पड खाण माजविले ॥ ३ ॥
तुका म्हण निर्भर चित्ती ॥ अधोगती जावया ॥ ४ ॥

वरील पाच अभगात ढोगी बुवाचा समाचार तुकारामानी अगदा खरपूसपणे घेतला आहे ब्रह्मज्ञान झाले की जी सिद्धावस्था प्राप्त होते व जी आली असताना अहकार अभिमान, दभ दर्प या वृत्ति मावळून जातात, त्या तत्कालिन धदेवाईक सत्पुरुषाच्या ठिकाणी दिसत होत्या म्हणून गाजराच्या पुगीसारखे योगी झालले आहत, अहतेने पाडित्य प्रगट करीत आहेत, अल्पविद्या व गर्व फार, अशी याची स्थिति आहे ते छलबलान दाटून उपदश देतात, बायका पोराना भोदतात आणि वर्षासन चालवितात ! त्या पोटभरूचे ठिकाणी देवाचे अस्तित्व असभवनीयच हाय ! ना आचार, ना स्नानसध्या, ना सद्गुण, फक्त पुच्छ नाही व चार पाय नाहीत, असली ही कुत्री जगाला उपद्रव देण्याकरिता आहेत, अस ते म्हणतात

श्री तुकारामांचा मत्सर करणारे मबाजीसारखे काही थोडथोडक बुवा नव्हते त्याना उद्देशून अगर त्याच तन्हेच्या भोदूना उद्देशून पुढील उद्गार काढलेले असावत ते म्हणतात लोकात कीर्ति व्हावी व फुकट जेवता याव

म्हणून गोसावी झाला आहेस. चित्तांत अनुताप नाही, वागण्यांत सौजन्य नाही, असे लुच्चे लोक लोकांना व्यर्थ फसवितात. ब्रह्मज्ञानाची बडबड करून मोठीं, प्रवचने झोडून चाळी खरेदी करणारे हे लोक नीचच होत. त्यांच्या महंतीला व त्यांच्या विद्वत्तेला आग लागो. कारण ते ब्रह्मविद्येला विकतात!

जगांत लुच्चातला लुच्चा व अत्यंत डांबरट जर कोणी असेल तर जो " मी देव पाहिला आहे, मला देव दिसला " असें म्हणतो तो! मी फक्त चार ईयत्ता शिकलों, माझ्या डोक्यांत आता लख्ख प्रकाश पडला, माझ्या ठिकाणीं आतां सर्व ऋषी, मुनी, सत वगैरे येऊन बसले, अशा जो थापा मारतो व दुसऱ्यांना प्रज्ञाहत करतो त्या दुर्जनावर बहिष्कार घालावा, आणि त्याला फजीत करून त्याचे महत्त्व नष्ट करावे.

श्री तुकाराम पुढील एका अभंगांत असें स्वच्छ सांगतात की या असल्या राजविलासी, ढोंगी, दांभिक आणि ठक अशा साधूच्या जवळ सुद्धां जाऊं नये. भोळ्या लोकांना साधु म्हटला कीं त्याचें दर्शन घ्यावें, त्याला भेटावें, सहवासास जावें असें वाटतें. पण या कुसंगतीनें एखादा दोष मात्र जडण्याचा संभव असतो आणि अवगुण तर खात्रीनें जडतोच! तेव्हां अशांची संगति न धरितां त्यांच्यापासून चार पावलें लांबच असलेलें बरें!

(२५८८)जगीं कीर्ती व्हावी । म्हणोनि झालासी गोसावी ॥१॥
बहु केलें पाठांतर । वर्म राहिलेसें दूर ॥२॥
चित्तीं नाहीं अनुताप । लटिके भगवें स्वरूप ॥३॥
तुका म्हणे सिदळीच्या । व्यर्थ श्रमविली वाचा ॥४॥

(२६१०)दुधाचे घागरी मद्याचा हा बुंद । पडिलिया शुद्ध नव्हे मग ॥१॥
तैसे खळां मुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ॥२॥

(२६२१)वांझेनें दाविलें गरभारलक्षण । चिरगुटें घालून वाथयाला ॥१॥
तेवी शब्दज्ञानी करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकोनियां ॥२॥
बोलाचीच कढी बोलाचाची भात । जेवूनियां तृप्त कोण झाला ॥३॥
कागदी लिहिलीं नामाची साकर । चाटितां मधुर गोडी नेदी ॥४॥
तुका म्हणे जळो जळोम ते हूंती । नाहीं लाज चित्तीं आठवण ॥५॥

(२६८८)तोचि ऱ्हटक्यामाजि भला । म्हणे देव म्यां देखिला ॥१॥
ऐशियाच्या उपदेशें । भवबंधन कैसें नासे ।

बुडवि आपणासरिसे । अभिमाने आणिकास ।।३।।

(२८४१)दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण ।।१।।
लात हाणोनिया वारी । गुडा वाट शुद्ध करी ।।२।।
बहुता पिडी खळ । त्याचा धरावा विटाळ ।।३।।
तुका म्हणे नखें । काढुनि टाकिजेती मुखें ।।४।।

(२३९९)संतसंगति न करावा वास । एकादे गुणदोष अंगा येती ।।१।।
मग तया दोषा नाही परिहार । होय अपहार सुकृताचा ।।२।।
तुका म्हणे नमस्कारावे दुरुन । अंतरी धरुनि ग्राह रुपं ।।३।।

ब्रह्मज्ञान व ईश्वरभक्ति याच्या मिषाने लोकाना पीडा देणारे, स्त्री व द्रव्य ही हरण करणारे, अनाचाराने वागणारे, राजयोगी म्हणून स्वतःची चैन करणारे असे जे असतील ते आमचे दावेदार होत, असे तुकाराम पुढे म्हणतात दभाने पोट भरेल, लुच्चेगिरीने काही काळ लोकहि फसतील, एटायाने पाल्हाळाने ब्रह्मज्ञान झाले आहे असेहि भासविता येईल, परंतु परमार्थाच्या दृष्टीने हे सर्व घातक होय ! खरा परमार्थ हा दंभ, दर्प, अभिमान, द्रव्य, वित्त, याच्यापासून लांब असतो इत्यादि विचार पुढील काही अभंगामध्ये स्पष्ट व सडेतोडपणे मांडलेले आहेत जुन्या काळच्या शाळेचा पंतोजी जसा छमछम छड्या मारून झणझणीतपण शिकवीत असे, तसे पंतोजीचे काम तुकारामानी केलेले आहे

अंतःकरणाच्या तळमळीने निघालेले हे स्पष्ट, कठोर व सत्य असे विचार पाहिले म्हणजे त्या कालातील बुवाबाजीचीहि कल्पना येते अशा लोकाना पाहून ते एके ठिकाणी म्हणतात की ' देवा तू वाटेल ते कर पण या दुर्जनाना प्राण गेला तरी संत म्हणणार नाही व नमस्कारहि करणार नाही ज्याना दंभाने द्रव्य, स्त्री व इतर गोष्टी लाटावयाच्या आहेत त्याना निर्भयपणे दडच केला पाहिजे " असो !

(८९६) परपीडक तो आम्हां दावेदार । विश्वीं विश्वंभर म्हणऊनी ।।१।।
रडूं त्यागूं वळें नावलोकूं डोळा । रासू तो चांडाळा ऐसा दुरी ।।२।।
अनाचार काही न साहे अवगुण । यहू होय मन कासावीस ।।३।।

(६१६) दंभें कीर्ति पोट भरे मानी जन । स्वहित कारण नव्हे काही ।।१।।
अंतरतो तुझे पाय मज दुरी । धरिता ये थोरी जाणिवेची ।।२।।



दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण(पृ. १२१)

पिंडाच्या पाळणें धांवती विकार । मज दावेदार मज माजी ॥३॥

(२४९२) निवडावे खडे । तरी दळण वोजे पडे ॥१॥
नाहीं तरि नासोनि जाये । कारण आळस उरे हाय ॥२॥
निवडावें तन । सेती करावें राखण ॥३॥
तुका म्हणे नीत । न विचारतां नव्हे हित ॥४॥

(२५५४) नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां हे सिद्ध । जव हा आत्मबोध नाही चित्तीं
काय करिसी वांया लटिकाची पाल्हाळ । श्रम तो केवळ जाणिवेचा ॥२॥
मीच देव ऐसे सांगती या लोकां । विपयांच्या सुखा सोकोनियां
अमृताची गोडी पुढिला सांगसी । आपण उपवासी मरोनिया ॥४॥
तुका म्हणे जरि राहील तळमळ । ब्रह्म ते केवळ सदोदीत ॥५॥

---

प्रकरण १३ वें.

## बुवाशाहीचे अनर्थ

गेल्या प्रकरणांत श्री तुकाराम यांच्या अभंगवाणीच्या आधारें दंभाचा स्फोट करणे, दुर्जनांचा प्रतिकार करणें व ढोंग्यांना उघडकीस आणणें हें कसें धर्म्य आहे व योग्य आहे हें दाखविलें. प्रस्तुत प्रकरणांत बुवाशाही का नको, तिच्यामुळें कोणकोणते अनर्थ होतात याचें विवेचन करावयाचें आहे.

आजकालच्या जगांत सर्व शाहया नष्ट करण्याचे उद्योग व यत्न चालू आहेत. याचें कारण हेच कीं समाजांतील खालच्या थरांत अतिशय जागृति झालेली आहे. समाजांतील थोडी माणसे सुबुद्ध, विचारी, सत्तावान् व इतर सर्व केवळ मेंढरें अशी स्थिति आज राहिलेली नाही. कां व कसें असे विचारण्याची प्रवृत्ति वाढत असल्यामुळें बादशाही, नोकरशाही, भिक्षुक-शाही आणि नवरेशाहीसुद्धां नष्ट व्हावी असें हल्ली वाटू लागलें आहे.

वरील शाहयाप्रमाणेंच ब्रह्मज्ञानाच्या नांवावर जगणारी ही बुवाशाही आहे. या बुवाशाहीविध्वंसक संघाचे सभासदाच्या प्रवेशाचें पत्रक पुढील प्रमाणें आहे:—

## सभासदाच्या प्रवेशपत्रकाचा नमुना

"आपल्या समाजात बुवा व महाराज याच्या नादीं लागणार बुवाबाज स्त्री–पुरुष पुष्कळ आहेत हे बुवाबाज लोकरच बुवाशाही उत्पन्न करतात या बुवाशाहीमुळें मनुष्य प्रज्ञाहत होतो, आळशी बनतो व उद्योग न करिता बुवाच्या प्रसादाने सर्व प्राप्त व्हावे म्हणून बुवाच्या नादीं लागतो आपल्या समाजाच्या व राष्ट्राच्या उत्कर्षास अडथळा उत्पन्न करणारी ही बुवाशाही आहे ती पूर्ण नाहीशी व्हावी असे माझें मत असल्यामुळें या संघाचा मी सभासद होतों आहे!'

संघाच्या वरील पत्रकात बुवाशाहीचे अनर्थ अगदी स्पष्ट आहेत त्यातील सर्वांत मोठा अनर्थ म्हणजे या बुवाशाहीतील मनुष्य आपल्या बुद्धीची हत्या करतो व प्रज्ञाहत बनतो हा होय! मनुष्य व पशु यात जर कोणते अतर असेल तर ते बुद्धीचेच होय आहार, निद्रा भय, मैथुन ही सर्वांस सारखीच आहेत पशूपेक्षा मनुष्यामध्यें अधिक काही असेल तर 'एको विवेको ह्यधिकोहि तेषाम्' एक विवेक म्हणजे बरे वाईट जाणण्याची शक्ति हाच काय तो विशेष आहे बरे वाईट जाणण्याचे काम बुद्धीचे आहे ही शक्ति जर मनुष्यान घालविली तर तो पशूच होय!

जगात सर्व गोष्टी बुद्धीने चाललेल्या आहेत जगात जे बुद्धिमतामध्यें वरिष्ठ होऊन गेले त्यानीच शोध लावले, शास्त्रें निर्माण केली, मानवी समाजात सुधारणा केली, फार काय पण समाजाचे जीवन उच्चतर बनविले हे प्रत्यक्ष दिसत असताना आपल्या समाजातील माणसानी बुद्धि गहाण ठेवून वागणे यासारखें दुसरे हानिकारक काय आहे?

आर्य चाणक्याने मुद्राराक्षस नाटकामध्यें एका प्रसंगी असे म्हटले आहे की 'माझे आप्तेष्ट गेले, सगेसोयरे गेले, लोभाविष्ट होऊन आलेले लोक गेले, सैन्य गेलें, पैसा गेला तरी बेहेत्तर! पण माझ्या बुद्धीने मात्र मला दगा देऊ नये म्हणजे झाले' तो म्हणतो

*एका केवलमेव साधनविधौ सेनाशतेभ्योधिका।*
*नंदोन्मूलन–दृष्टवीर्यमहिमा बुद्धिस्तु मागान्मम॥*

एवढा बुद्धीचा महिमा आहे या बुद्धि–महात्म्याचे उद्गार 'आर्या

वुद्धि जाते व मग भांडवल जाते' अशी म्हण पडलेली आहे. 'शीर सलामत तो पगडी पचास' या म्हणीचा अर्थहि एक मुख्य शीर सलामत राहिलें ( म्हणजे बुद्धि सुरक्षित असली) की पाहिजे तें मिळतें असाच आहे.

कोणताहि मनुष्यसमाज अथवा राष्ट्र हे केवळ शरीरबलानें अर्थात् पाशवी शक्तीनें फार दिवस पारतंत्र्यांत राहू शकत नाही. म्हणून जेते लोक जिताची बुद्धि मारतात. शस्त्रानें वार केल्यास दुसरा मनुष्य वेहोष होऊन प्रतिकाराकरितां पुढे येतो, पण अन्नाचा मिंधा मनुष्य आश्रयदात्यापुढें लवूनच असतो. हतवुद्ध झालेल्या माणसाची स्थिति याहीपेक्षां शोचनीय असते. म्हणूनच महाभारतातील उद्योगपर्वामध्यें विदुराच्या तोंडी पुढील सुभाषित आहे.

शस्त्रैर्हतास्तु रिपवो न हता भवन्ति ।
प्रज्ञाहतास्तु नितरां सुहता भवन्ति ॥

इंग्रजी राज्यामुळे व शिक्षणामुळें आपल्या समाजांत प्रज्ञाहतपणा आला असें राजकीय पुढारी बोलतात व त्याचा विध्वंस करण्याचें काम त्यांनी चालविलें आहेत. धर्म व समाज या क्षेत्रांतहि पुष्कळ बौद्धिक गुलामगिरी आहे. जें आहे तें उत्तम आहे, धार्मिक व सामाजिक बाबतींत कांही सुधारणा म्हणून करावयाला नको, तें सर्व ईश्वरी अवतारानें अगर विभूतीने फार तर करावे, या कल्पनेमुळें हिंदु समाजांतील स्वतंत्र प्रज्ञेचा लोपच होत चाललेला आहे. मनुष्य प्राणी हा ईश्वराचा अंश आहे, तो नराचा नारायण होतो, मनुष्यानें आपल्या कर्तृत्वाने प्रज्ञा, पौरुष, पैसा व प्रजा हीं मिळवून समर्थ व्हावें असा सरळ मार्ग असतांना आपली बुद्धि न चालविता पुष्कळ लोक वेडयामारखे अवताराशिवाय जगांत काही होत नाही असें म्हणतात आणि तप, त्याग, बुद्धि व कर्तृत्व यांच्या प्रभावामुळें जर कोणी पुढें आला तर त्याला अवतार कोटींत ढकलून लोक स्वस्थ बसतात! कोणाला तरी अवतार मानणें व त्याच्यावर भार घालून स्वस्थ बसणें अशी खोड हिंदु समाजाला लागली असल्यामुळें हे लोकच या बुवांच्या नादी फार लागतात.

श्रीराम व श्रीकृष्ण हे ऐतिहासिक पुरुष असतांना तेहि अवतार; वसिष्ठ, वाल्मिकी, व्यास, पाणिनी, हे बुद्धिमान ऋषि असताना तेहि

अवतार; ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, तुकाराम, मोरोपंत व तुळसीदास हे सत्पुरुष व कवी असतांना तेहि अवतार; *टिळक, गांधी हे पुढारीहि अवतार;* अर्वाचीन कवी अवतार आणि मग कोंडिबा, धोंडिबा, नारायणबुवा व उपासनीबुवा हेहि सर्व अवतार मानून व ते सर्वसमर्थ आहेत असें कल्पून *लोक त्यांच्या नादीं लागतात व स्वस्थ बसतात !*

एकवार या बुवाना आपल्या नादीं लोक लागतात असें समजलें म्हणजे प्रथम ते बुवा या नादीं लागलेल्या लोकाची बुद्धि भ्रष्ट करतात. *शहाणेसुरते असें समजले जाणारे लोकसुद्धा कोणी आर्त म्हणून,* कोणी निपुत्रिक म्हणून, कोणी कशाकरितां तर कोणी कांहीं हेतूने या बुवांचेकडे जातो. कांहीं दिवसांनी त्याला असें वाटतें कीं " बस् एक गुरुकृपा झाली की मग कांहीं नको " व गुरुकृपेचा मार्ग म्हणजे तन, मन व धन हे गुरुला अर्पण करणे हा होय ! या बुवांची दृष्टि प्रथम बुद्धि हरण करून नंतर वित्त हरण करण्याकडे असल्यामुळें तेहि स्वतंत्र प्रज्ञेचा व चिकित्सेचा उदय जितका न होईल तितका यत्न करतात. मनुष्य एकदां आपला उद्योग टाकून, कर्तव्य डावलून, राष्ट्र व समाज याविषयीं उदासीन होऊन बुवा-भक्त बनला म्हणजे मग त्याची किती दुर्दशा होते हें सांगावयास नकोच.

परमेश्वर असें म्हणतो कीं मी भक्ताच्या बुद्धीचें सामर्थ्य वाढवितो व ती शाबूत ठेवतों,

' ददामि बुद्धियोगं तं '

म्हणजे त्यांना बुद्धियोग देतो, बुद्धि चालविण्याची शक्ति देतों. देव म्हणून ज्या कोणी शक्ति आहेत, त्या शक्ति सुद्धां आपल्या भक्ताचें रक्षण पशु-पालाप्रमाणें हातांत काठ्या घेऊन करीत नाहींत. तर ज्याचें रक्षण व्हावें असें या देवतांना वाटतें, त्या देवता आपल्या भक्ताच्या बुद्धीचेच रक्षण करीत असतात, म्हणजे ती शाबूत ठेवितात !

यन्तु रक्षितुमिच्छंति बुद्ध्या संविभजन्ति तं। —महाभारत

पण या बुवांकडे पाहिलें तर हे आपल्या नादीं लागणाऱ्या लोकांची बुद्धि मात्र आधी भ्रष्ट करतात.

हे पारमार्थिक बुवा आपल्या धर्माचे मिशनरी असें मानल्यास ते काय अनर्थ करतात पाहा. ख्रिश्चन मिशनरी आपल्या देशांत येऊन

हाडाची काडे करून आपल्या समाजातील जो खाल्चा गाळ (अस्पृश्य वर्ग) त्यातून हिरे व माणके बाहेर काढीत आहेत शिक्षण देऊन, स्वच्छता व सभ्यता शिकवून सुसंस्काराच्या बळावर हे लोक या कोळशाची माणके बनवीत आहत तर त्याच्या उलट हे आमचे बुवा आमच्या समाजातील जे बुद्धिमत चकाकणारे हिरे (वकील, बॅरिस्टर डॉक्टर, पदवीधर वगैरे) याचे परमार्थाच्या मिषाने कोळसे बनवीत आहेत. ही बुद्धिहत्या फार भयकर आहे चोराला शिक्षा होते, स्त्रीवर आक्रमण करणाऱ्याला दडशासन होतें पण अशा या बुद्धिहत्या प्रत्यही करणाऱ्याला मात्र काही होत नाही ही गोष्ट सतापजनकच होय। बुद्धिहत्या करणारा मनुष्य हा खुनी मनुष्यापेक्षा सहस्रपट गुन्हेगार समजला पाहिजे व त्याला समाजानच ताळयावर आणल पाहिज

हिंदुस्थानात हे बुवा व महाराज असख्य असून त्याचा हा बुद्धिहत्या करण्याचा कारखाना जोवर चालू आहे तावर हिंदुस्थानची उन्नति कशी होईल? महाराज महाराज, म्हणून लाळ घोटावी, त्याचा तोडपुजेपणा करावा, त्यानी केलेले अनाचार सहन करावेत हे लाजिरवाणे नाहीं काय? केवळ सत्त्व पाहण्याकरिता महाराज अमुक अनाचार करतात, त्यांच्या ठिकाणी अद्भुत सामर्थ्य आहे असे लोकाना सागणे म्हणजे बुद्धिहत्येचा कळस होय।

आता बुवाशाहीच्या दुसऱ्या अनर्थाकडे वळू वास्तविक मनुष्य एकदा प्रज्ञाहत झाला की सर्व अनर्थ ओढवले म्हणून समजावेच अशा हतप्रज्ञाना हे बुवा व महाराज जगत् हे क्षणभगुर आहे ह मिथ्या आहे, ह जें सव दृश्य जगत् तो माया आहे अस सांगत सुटतात त्यामुळ हे बुवाभक्त आळशी, अतएव प्रपच, समाज आणि राष्ट्र याविषयी उदासीन होतात बुवाच्या या शिकवणीमुळें समाजाची जिज्ञासा मरत निवृत्ति वाढते व पुरुषार्थाचा जोम उरत नाही दैववाद देववाद, अध विश्वास, ही बोकाळतात आणि 'स्वस्थ बसाव। हरि ठेविल तैंस राहाव' अशी वृत्ति उत्पन्न होत अन्यायाची चीड, प्रतिकाराविषयी तळमळ आणि समाजाच्या जीवनाला आवश्यक असा द्वेप व मताप या वृत्ति निर्बीज करण्याचा यत्न हे बुवा करितात। जग अनादि असताना त म्हण मिथ्या, पैसा हा पुरुषार्थ असताना तोहि म्हणे अनर्थ, असे सागून दुसऱ्याची स्त्री व वित्त लुबाडण्याचा धदा हे बुवा करितात।।

गेल्या दोन तीन हजार वर्षांत निवृत्तिपर तत्त्वज्ञानाचे अनेक पंथ, अनेक आचार व अनेक संप्रदाय राष्ट्रांत निर्माण झाल्यामुळें या निवृत्तिपर वेदांताचा संस्कार आपल्या समाजावर इतका झाला आहे कीं प्रपंच करणारा, प्रज्ञावान्, पौरुषवान् व पैसावान् मनुष्य मूर्ख व बायको सोडून, मिळकतीचा त्याग करून, मुहूर्त बसणारा हाच काय तो शहाणा, अशी समजूत झाली आहे, जग हें दुःखमय आहे, क्षणभंगुर आहे, आपण जन्माला आलो, ही पहिली चूक केली व बायको करून घेतली ही दुसरी चूक केली आतां या चुका निस्तरण्याकरितां प्रपंच सोडून 'हरि हरि' म्हणत बसले पाहिजे, अशी जी एक निवृत्तिवाद्यांची विचारसरणी आहे, तीमुळें ज्ञानी हा सदा आत्मानंदांत डुलत असतो, तो कोणतेंही कर्म करीत नाहीं व कर्म करणें ही फार कमी प्रतीची गोष्ट आहे, असें हे सांप्रदायी मानतात. लेखक या तत्त्वज्ञानाला मुमूर्षु तत्त्वज्ञान असें समजतो आणि गीता, उपनिषदें आणि वैदिक संहिता यांतील तत्त्वज्ञानाला विजिगीषु तत्त्वज्ञान असें नांव देतो

गेल्या तीन हजार वर्षांत या मुमूर्षु तत्त्वज्ञानाचे प्रवाहच जोरानें वाहात आहेत कोणत्या वृत्तीनें मरावें, अखेर कशी साधावी, मरतांना कसें समाधानानें मरावें, असा विचारच प्रामुख्यानें या संप्रदायांत केला आहे. उदाहरणार्थ, भागवताचा उपक्रमच पहा भागवत ग्रंथ हा भक्तिप्रधान आहे व त्यांत ईश्वराची नवविधा भक्ति सांगितली आहे, हें सर्वश्रुत आहे या मुमूर्षु तत्त्वज्ञानाचा उपक्रम पुढीलप्रमाणें आहे

उपक्रम

अत पृच्छामि संसिद्धिं योगिनां परमं गुरुम् ॥
पुरुषस्येह यत्कार्यं म्रियमाणस्य सर्वथा ॥३८॥
यच्छ्रोतव्यमथो जाप्यं यत्कर्तव्यं नृभिः प्रभो ॥
स्मर्तव्यं भजनीयं वा ब्रूहि यद्वा विपर्ययम् ॥३९॥ स्क १ अ. १९

उपसंहार

अनुजानीहि मां ब्रह्मन्वाचं यच्छाम्यधोक्षजे ॥
मुक्तकामाशयं चेतः प्रवेश्य विसृजाम्यसून् ॥६॥
अज्ञानं च निरस्तं मे ज्ञानविज्ञाननिष्ठया ।
भवता दर्शितं क्षेमं परं भगवतः पदम् ॥७॥ स्क. १२ अ ६

परीक्षितीने शुकाचार्यांना प्रश्नच असा केला आहे की सर्वथा मरावयास टेकलेल्या माणसाने काय ऐकावे, काय जपावे, काय स्मरावे मरावे भजन करावे ? अर्थात् या प्रश्नाला 'मुमूर्षु माणसाने देवाचे नाव घेत सुखाने मरावे' असेच उत्तर शुकाचार्यांनी दिले व त्याप्रमाणेच परीक्षितीने केले !

आमच्या समाजामध्ये हे मुमूर्षु तत्त्वाचा प्रसार पावलेले आहे परीक्षितीला मरावयाचेच होते म्हणून 'आता मी काय करू ?' असे त्याने विचारले पण समाजाला आणि राष्ट्राला जगावयाचे असल्यामुळे हे निवृत्तीचे तत्त्वज्ञान कसे उपयोगी पडेल ?

उपनिषत्कालापासून तत्त्वज्ञानाच्या वाढीस जोराने सुरवात झाली, पुढे बुद्धोत्तर काळात विविध आचार्यांनी या निवृत्तिपर तत्त्वज्ञानवृक्षालाच जलसिंचनाने विपुल फुले व फळे आणली, मनोवृत्तीमध्ये निवृत्तीचेच सत्त्वार वाढले व ज्ञानी म्हणजे काही न करणारा, स्वस्थ बसणारा, ध्यानस्थ असणारा असे विचार पुढे आले !

पण हे मुमूर्षु विचार विजिगीषु समाजाला उपयोगी नाहीत आजच्या आपल्या समाजाला गीतेत सांगितल्याप्रमाणे जनकासारखे व श्रीकृष्णासारखे कर्मयोगी ज्ञानीच पाहिजेत, अर्थात् हे ज्ञानी जग दुःखमय आहे, ते असार आहे असे न सांगता, जगत हे आनंदमय असून ते चिरकाल टिकणारे आहे असे सांगून जगावे कसे हे शिकवितात मरावे कसे हे सांगावयास नको, तर कर्त्या वृत्तीने जगावे, जीवनकलहात कसे विजयी व्हावे हेच हे ज्ञानी समाजाला शिकवितात गीतेत भगवंतांनी अर्जुनाला हेच सांगितले आहे

तस्मात् सर्वेषु कालेषु मामनुस्मर युद्ध्य च। गी अ ८

या जीवनयात्रेत सदैव झगडत राहा व ते करताना माझे स्मरण ठेव सारखे युद्ध कर, म्हणजे सारखी धडपड कर असे ज्ञान्यांनी नुसते न सांगता स्वतःच्या वर्तनाने ते दाखविले पाहिजे

आजच्या कालात जो खरोखर सत्पुरुष असेल तो आपला उद्योग सभ्यपणे व प्रामाणिकपणे करून लोकांचे अज्ञान घालवील, आळस नष्ट करील, त्यांची माणुसकी वाढवील, निरक्षरांना साक्षर व साक्षरांना सुबुद्ध करील,

अस्पृश्याना स्पृश्य करील व हे सर्व त्याग, निष्ठा, अनहंकार, जाणीव व आत्मसंतोष या गुणानी युक्त होऊन करील!

बुवाशाहीपासून होणारा तिसरा अनर्थ म्हणजे आळस, अनाचार, दौर्बल्य इ खुळचट प्रकार हा होय! सर्व काही बुवाच्या प्रसादाने मिळते ही अत्यंत चुकीची समजूत होय वास्तविक कर्मानेच सर्व काही मिळते पण पुत्रप्राप्ति, अर्थप्राप्ति व इतर सर्व सुखें ही केवळ महाराजाच्या कृपेने होतात असे समजून हे बुवाभक्त खुळचटासारखें काय पाहिजे ते करू लागतात मुले होण्याकरिता शौचकूपाला प्रदक्षिणा घालणे, निवडुगाभोवती फिरणे, गटार-गंगेंत स्नान करणे इत्यादि किळसवाणे प्रकार गुरआज्ञेमुळे करितात! कही बुवाभक्त तर अट्टल दुर्व्यसनी आणि क्षुद्र वृत्तीचे बनून सर्व ब्रह्म आहे असे नुसते बडबडून वाटेल तो अनाचार व अत्याचारहि करतात! त्याचे वर्णन विशेष न करणें बरं! काही लोकानी प्रस्तुत लेखकास 'तुम्ही बुवा का झाला नाही' असे विचारले त्या प्रश्नाचे जें उत्तर लेखकाने किर्लोस्कर मासिकातून दिले तेच येथें अतिसंक्षेपाने देतो

बुवागिरीत जी लफंगेगिरी, जो निर्लज्जपणा व जो अनाचार असतो तो मला पसत नाही आणि असल्या माणुसकीच्या ऱ्हासाच्या सप्रदायात न राहता, आपली बुद्धि चालवून, समाजाची योग्य ती सेवा करीत राहावे व ती करीत असताना मिळेल त्यावर जगावे, हेच मला प्रशस्त वाटते

स्त्री, पैसा व मान याचा धर्मशास्त्रदृष्ट्या यथायोग्य उपभोग घेण्या करिता गृहस्थाश्रम ही सस्था आहे त्या पद्धतीने विवाह करून सतति निर्माण करावी, पैसा मिळवून त्याचा उपभोग घ्यावा, हे सर्व सरळ शक्य असता परमार्थात शिरून, वाममार्गाने या सर्वांचा उपभोग घ्यावयाचा, हे शास्त्र-दृष्ट्या व युक्तिदृष्ट्या अयोग्य होय सर्व बुवा हेच करितात म्हणून मला बुवा व्हावेंसे वाटले नाही

माझी समर्थ विद्यालय बुडाल्यानतर मी अज्ञातवासात ज्या घरी होतो तेथेंच कै कृष्णाबुवा गारडेकर याचे प्रस्थ फार होते त्या घरातील तरुण मडळी या बुवाविषयी काही निराळें सागत! या बुवानी मला दीक्षा घेण्या-बद्दल अगदी गळ घातली कारण त्यानी माझी काही भाषणें ऐकिली होती व अविवाहित, गोरागोमटा, सुसस्कृत तरुण, असा शिष्य करून घेण्याचा

त्याना मोह झालेला होता त्यानी मला असें सांगितले की, 'तुम्ही निरूपण करा, ज्ञानेश्वरी वाचा, त्यात मी काही तुम्हाला सागू शकत नाही पण शिष्यपरंपरा वाढविताना तुम्ही अविवाहित असल्यामुळें जर काही वहे वाकडें झाले तर मी तुम्हाला सावरून घ्यावयाला तयार आहे कारण मी त्यातलाच आहें पैसेहि रगड मिळतील मानहि मिळेल आणि सव काही मिळेल अहो, हे श्रीमत लोक वेडोबा असतात, माझे अमुक अमुक श्रीमत शिष्य आहेत. इत्यादि

उपरोक्त कृष्णाबुवा गारुडकर हे म्हणे भजन करू लागले की त्याच्या अगात बाळकृष्णाचा सचार होई ! आणि मग हा वीस पचवीस पेक्षाहि अधिक वयाचा तरुण बाळकृष्ण नेमक्या गोर्‍यागोमटचा आणि पुष्टावयवी अशा स्त्रियाच अर्थात गोपीच स्तनपान करण्यास भर निरूपणामध्यें प्रवत्त होई व श्रोतृवर्गातील स्त्रिया त्या कृष्णाला त्या वेळी स्तनपान करू देत !! तसच हे बुवा म्हणे परस्त्रीला माडीवर घेऊन इद्रियजयाचा अभ्यास करीत असत व त्याना त्याहि अभ्यासास साधने मिळत ! हे मला सवस्वी नापसत म्हणून मी बुवा झालो नाही

जग हे मिथ्या व माया आहे अशी सारखी बडबड करणारे काही बवा हे उलट्या काळजाने प्रसगी खुनी दरवडखोर मांग याच्यापेक्षाहि फार वाईट कृत्यें करीत असतात अशा बुवाना कधीहि अनुताप होतच नाही हे एकूनच मी बुवा झालो नाही

एवगुणविशिष्ट अशी ही बुवाशाही असल्यामुळें बुद्धिमान् कर्तृत्ववान् महत्त्वाकाक्षी असा मनुष्य यात शिरत नाही आणि म्हणूनच वाचकहो, मी बुवा झालो नाही अनधिकाऱ्यास साधु म्हणून मिरवण्यात शीलभ्रष्टता आहे माणुसकीचा ऱ्हास आहे आणि परलोकदृष्ट्या नरक आहे

बुवाशाहीच्या राजवटींत जाण्यान जवढ समाजाच कल्याण होत असेल त्यापेक्षा तिकड न जाण्यानेच अधिक कल्याण होणार आहे असे मला वाटते विशेषत समाजात जें मनोदौर्बल्य आहे ते नष्ट करावयाचे असल्यास या मानसिक गुलामगिरीच्या अवढ्या म्हणून सस्था असतील त्या नष्ट झाल्यास राष्ट्राचे अधिक कल्याण आहे

एकाद्याला त्याच्या द्रव्यापासून, स्त्रीपासून वैभवापासून भ्रष्ट करणें हीं

पातकें आहेतच, परंतु सर्वांत मोठें पाप म्हणजे एखाद्याची बुद्धि भ्रष्ट करून त्याला हतप्रज्ञ करणें हें होय शिष्यांना हतप्रज्ञ केल्याशिवाय बुवाचें चालत नाहीं व त्या पापाचा मला शिसारी म्हणूनच " मी बुवा झालों नाहीं "

बुवाशाहीमुळें बुद्धिहत्या होते, निवृत्तिपरता येते व अनाचार माजतो हे येथवर सांगितलें आतां या बुवाबाजीचा म्हणजे बुवाच्या नादीं लागण्याचा जो प्रकार आढळतो त्याचा उगम कशांत आहे हें सांगून हें प्रकरण आटोपतों

## बुवाबाजीचा उगम बौद्धिक गुलामगिरींत आहे

बुवाबाजीचा उगम कशांत आहे हा प्रश्न शोधपूर्वक सोडविण्याजोगा आहे शिकलेसवरलेलीं, चिकित्सक, विचारी, बॅरिस्टर डॉक्टर, पंडित व शास्त्री अशी माणसंसुद्धां बुवाच्या तडाख्यांत कशी सांपडतात आणि स्वत्व सोडून गुरुमाउलीच्या चरणीं भ्रमरवत् मिलिंदायमान कशीं होतात हा खरोखरीच चिंत्य प्रश्न आहे एखाद्याच्या नादीं जे हजारों लोक लागतात ते उगाच काय? केवळ लुच्चेगिरीनेंच एखादा मनुष्य असंड दुनिया भुलवू शकतो काय? कांहीं तरी अद्भुत असल्याशिवाय असें होणें शक्य आहे काय? इत्यादि प्रश्नहि विचारांत घेण्याजोगे आहेत

हिंदुस्थान देशांत एकदरीत धर्माचें पीक मोठें येतें अनेक धर्मपंथ या ठिकाणीं उत्पन्न झालेले आहेत त्या परंपरेमुळें धर्माच्या बाबतींत हिंदुस्थानांत भोळेपणा अतिशय आहे देव व धर्म या विषयांत स्वतंत्र विचार करण्याची शक्य फारच थोडी आहे, किंबहुना ती नाहीं म्हटलें तरी चालेल त्यामुळें देव व धर्म या विषयांत जो कोणी बोलेल प्रवचन करील तो श्रेष्ठ आहे असें समजण्याचा प्रघात आहे " मला ईश्वरी प्रेरणा होते " ' मला ईश्वर सांगतो ' अशी भाषा कोणी वापरूं लागला की त्या व्यक्तीबद्दल एक विलक्षण भावना उत्पन्न होते हल्लीं सुद्धां पुष्कळांच्या अंगांत केव्हां मारुती तर केव्हां महालक्ष्मी तर केव्हां दत्तात्रय येत असतो त्या वेळीं पुष्कळांना तें सर्व खरेंच वाटतें शिकलेसवरलेले लोक जरी असले तथापि पूर्वपरंपरा भोळीभाबडी असल्यामुळें व मागील आनु-

वंशिक संस्कार एका पिढीत जाणें शक्य नसल्यामुळे भोळेपणा व बौद्धिक दौर्बल्य यांमुळेंच ही बुवाबाजी वाढते असे म्हणावें लागतें.

महात्मा गांधी हे 'मला ईश्वरी प्रेरणा होते' असें गेलीं बारा-चौदा वर्षें म्हणत आहेत. ही जी ईश्वरी प्रेरणा होते, ती जर खरोखरीच ईश्वरी असेल तर ती सत्य ठरली पाहिजे व जर सत्य न ठरेल तर ईश्वरी प्रेरणा होते असे म्हणणें हाहि एक बुवाशाहीतील सुधारलेला प्रकार आहे. अत्यंत शुद्ध, पवित्र, उदात्त व वैराग्यसंपन्न मनुष्याचें अंतःकरण अत्यंत शुद्ध असतें. त्या ठिकाणीं जी आत्मप्रेरणा होते ती सामान्य माणसाच्या प्रेरणेपेक्षां पुष्कळच मोठ्या योग्यतेची प्रेरणा असते यात शंका नाहीं; पण ही प्रेरणा अतिमानुष असते किंवा ईश्वरी असते असें जर कोणी म्हणेल तर आक्षेपास खास जागा आहे.

ईश्वरी प्रेरणेच्या आख्यायिका या अनादि आहेत; त्या कांहीं आजकालच्या नाहीत. वैदिक ऋषींना ईश्वरी प्रेरणा होऊन वेद स्फुरले. महंमद पैगंबरालाहि कुराणशरीफ ईश्वरी प्रेरणेनेच स्फुरलें. येशु ख्रिस्ताचें बायबलहि ईश्वरी साक्षात्कारामुळेंच स्फुरलेलें आहे. तात्पर्य, हीच परंपरा जितकी लांबवितां येईल तितकी लांबविली म्हणजे ईश्वरी प्रेरणेचा तुटवडा कोठेंच पडत नाहीं.

बायबल, चर्च व पोप इत्यादि सर्व पूर्वी ईश्वराधिष्ठितच होतीं. परंतु ग्रीक तत्त्ववेत्यांनी त्यांना धक्का दिला. कोपरनिकस, ब्रूनो इत्यादिकांनीं बायबल हे जगाबद्दल व मनुष्याबद्दल सत्य ज्ञान देणारें एकच एक पुस्तक आहे असा जो भ्रम होता तो घालवून लोकाना सृष्टीचे पुस्तक वाचावयास शिकविलें. पृथ्वी चौकोनी नसून ती वाटोळी आहे व तिचा जन्म होऊन कोट्यवधि वर्षें झाली, इत्यादि तत्त्वें पुढें मांडल्यावर ईश्वरी प्रेरणामूलक बायबलच्या भ्रमाचा भोपळा फुटला. कुराणाचीसुद्धां तीच स्थिति आहे. तात्पर्य, शोध, शास्त्र व तर्क ही तीक्ष्ण हत्यारें वापरूं लागल्यावर भ्रममूलक ज्या ईश्वरी प्रेरणा असतात, त्यांचा बोजवारा उडतो. याच पद्धतीनें बुवाशाहीतील प्रेरणा व चमत्कार यांचीहि वासलात लागते.

काय हो! अमके अमके बॅरिस्टर म्हणे उपासनी महाराजांच्यापुढे लोटांगणें घालतात, दुसरे एक मुंबईचे बॅरिस्टर म्हणे सातारच्या नापित

घोडीबुवापुढें गडबडा लोळतात, तेव्हां हें कसें होतें ? असे प्रश्न आम्हाला काही विचारतात त्याचें खरें उत्तर हेंच कीं, बॅरिस्टर, डॉक्टर व इतर श्रीमंत लोक यांच्याहि बुद्धीचा एखादा पेंच ढिला असतो किंवा कधी कधी तो ढिला होतो म्हणूनच हे लोक बुवाच्यापुढें गडबडा लोळतात अशा लोकांना देव, धर्म, शास्त्र व वेदांत यांतील तत्त्व कांही माहित नसतें, व केव्हां तरी वक्तृत्वपूर्ण भाषेत यासंबंधीचें विवेचन ऐकलें म्हणजे या लोकांची त्यावर लगेच श्रद्धा बसते मध्यम स्थितीतील समाजाला ज्या द्वारानें देव, धर्म व वेदांत यांचा परिचय होत असतो, तिकडे हे लोक कधी जात नाहींत, त्यामुळें हे कोरे करकरीत असतात मग केव्हां तरी भयंकर आपत्ति, कष्ट-साध्य रोग अगर असाच आणिबाणीचा प्रसंग आला की त्या वेळी अशा लोकांची चिकित्साबुद्धि डळमळत व भोळेपणा एकदम उद्भूत होतो •

अध्यात्मशास्त्रांत व मानसशास्त्रांत संस्काराचें प्राबल्य फार आहे संस्कार दोन तऱ्हेचे असतात कांही स्पष्ट असतात व कांही अस्पष्ट असतात कोणत्याही व्यक्तीतील सर्व संस्कार प्रगट होत नसून प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणी उद्भव न पावलेले असे सुप्त व गुप्त संस्कार असतात नास्तिक, चिकित्सक, सुधारक अशा तऱ्हेचा मनुष्य जेव्हां बुवाबाज बनतो, तेव्हां असें खास समजावें कीं याचा श्रद्धेचा जो संस्कार आजवर उद्भवला नव्हता तो आतां उद्भवला आहे धारवाडकडील एक मोठे शास्त्री गुरूचें उच्छिष्ट-प्रसादग्रहण हा एक विधि आहे असें सांगतात अशा ठिकाणी खास समजावें कीं, शास्त्रीबुवांच्या बुद्धीचा एक पेंच थोडा ढिला होऊं लागला आहे ! एक मोठे सरदार म्हणे एकदा सरदारगृहामध्यें आले व भागवताचा उपसंहार लिहिणाऱ्या ग्रंथ-कारांच्या साष्टांग पायां पडले हे ग्रंथकार जात्या बुवाबाजीच्या ढंगातले नसल्यामुळे त्यांनी त्या सरदारांना 'आपण असें करूं नये, व्यासंग ठेवला म्हणजे कुणालाही लिहिता येत व बोलता येत, त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें व साष्टांग नमस्कार घालण्याजोगें कांहीं नाहीं' असें म्हणून सरदारांची समजूत घातली ! पण एखादा सरदार अगर श्रीमंत गृहस्थ जर एखाद्या ग्रंथकारास त्यानें जें जें लिहिलें आहे, तें अगदीं अंगी बाणवून लिहिलें आहे अर्थात् तो मोठा आहे असें समजेल तर समजावें कीं, हे गृहस्थ या बाबतींत

वेडे आहेत, आणि खरोखरीच, देव, धर्म, गुरु व वेदांत या बाबतीत पुष्कळ चांगली माणसें अगदी वेडयासारखींच वागतात!

मनुष्य बुद्धिमान् आणि चिकित्सक असला तरी तो सर्व बाबतीत तसा असतो, असें नाहीं कुठें तरी त्याचे एखादें मर्म अथवा असतेच, तर्थे तो वेडा होतो! ब्राह्मण या नात्यानें संध्या, ब्रह्मयज्ञ ही न करतां अगर स्वाध्याय न म्हणतां केवळ गुरुचरित्राच्या दहापाच ओव्या वाचून अगर हरिपाठांतील चारदोन अभंग म्हणून ब्रह्मकर्म संपविणारे चांगले ब्राह्मण आढळतात! ! अशा लोकांना कोणी तरी व काही तरी सांगावयास पाहिजे असतें व त्यांना एकदा ते पत्करलें म्हणजे हे लोक भोळेपणानें त्या आचाराच्या समर्थनार्थ फलश्रुत्याहि सांगतात गुरुचरित्रांत बुद्धीला समाधान देण्याजोगें अस काय आहे? त्यांत केवळ सकाम गुरुभक्ति आहे व्यंकटेश स्तोत्र, शनिमहात्म्य, शिवलीलामृत हे ग्रंथ अगदी भक्तीनें अनुक्रमें शनिवारी व सोमवारी न चुकतां वाचणारे किती तरी लोक आहेत! या ग्रंथाच्या शेवटी अर्थवादात्मक फलश्रुत्या आहेत, त्या खऱ्या मानूनच हे भोळे लोक भ्रमानें या ग्रंथाची पारायणें करतात व्यंकटेश–स्तोत्राच्या हजार आवृत्त्या झाल्या व शनिमहात्म्याची अष्टोदशें पारायणें झाली म्हणजे इष्ट कामना सिद्ध होतात आणि सर्व अरिष्टें टळतात अशी या विचाऱ्यांची समजूत असते! चिकित्सक लोकांचा सुद्धां या गोष्टीवर विश्वास बसतो, याचें कारण बुद्धिदौर्बल्य हेंच होय! योग्य वेळीं योग्य यत्न न करतां झालेल्या चुका, ग्रंथाची पारायणें व मंत्राचीं आवर्तनें करून निस्तरण्याचा यत्न करणें म्हणजे बौद्धिक दौर्बल्यच होय! ही बौद्धिक गुलामगिरीची वृत्ति समाजांत जोंवर आहे तोंवर बुवाबाजी चालणार व तिचे दुष्परिणाम समाजाला भोवणार!

बुवांच्या नादीं लागणें व त्यांचा अनुग्रह घेणें ही एक आजच्या कालांतील रूढि होऊं लागलेली आहे मनुष्याला व्यावहारिक व राजकीय मोठेपणा जसा पाहिजे तसा धार्मिक मोठेपणाही पाहिजे असतो प्रातःस्नान, नमस्कार इत्यादि आचार हे सुशिक्षित व मोठ्या अशा लोकांना अवघड वाटतात, मग सर्वांत सोपा व धार्मिक म्हणवून घेण्याचा राजमार्ग म्हणजे एखाद्या महाराजाचा अनुग्रह घेणें व वरचेवर त्याच्या सहवासाचा लाभ घेणें हें होय! हे अनुग्रहाचें कार्य तरी मोठें विचारपूर्वक होतें असेंही

नाही कोणी मनुष्य आपल्या मित्राच्या भिडेमुळें अनुग्रह घेतो, तर काही गृहस्थ आपल्या आईच्या किंवा वहिणीच्या सांगण्यावरूनच अनुग्रह घेतात। काही जामात आपल्या सासऱ्यांना बरे वाटाव व आपणावरील धर्मभ्रष्टतेचा आरोप जावा म्हणून अनुग्रह घेतात तर काही सासरेही आपल्या बड्या जामाताला खूष करण्याकरिता अनुग्रह घेतात।

एखाद्या संस्थेचा अध्यक्ष अगर प्रमुख मनुष्य बुवाचा अनुग्रहित असला की त्याच्या भिडेमुळें संस्थेतील माणसे हळूहळू तसच करतात वरिष्ठ अधिकाऱ्याला काय आवडते हे नेहमी कनिष्ट अधिकारी पाहात असतात जे उमेदवार नोकऱ्याकरिता हिंडत असतात त्यांना वरिष्ठाच्या या आवडीनिवडी चांगल्या अवगत असल्या तर त्याचे काम सहज होऊन जाते। कित्येक मोठ्या साहेबाच्या कचेरीतील शिरस्तेदार हे बुवाचे अनुग्रहित असल्यामुळें तयील सर्व लोकांना महाराजाचा अनुग्रह घेण्याची बुद्धि होते सारांश, अनुग्रह घेणें ही आजच्या कालातील एक रूढि होत आहे। दाढी करणें, टोपी वापरणें अगर चोडक असणे, मनाटात घडघाळ बांधणं या जशा आजच्या रूढी आहेत, तशीच अनुग्रह घेण हीहि एक रूढि आहे कोणी संस्थानिक मळणगावकर महाराजापुढें शीर नमवितात तर दुसरे मळणगावकराच प्रस्थ माजवितात, कोणी साताऱ्याच्या धाडीबुवाच्या मागें लागतात तर कोणी नारायणबुवाचेच स्तुतिस्तोत्र गातात। यात काही अज्ञानाचा अंश आहे काही बुद्धिदौर्बल्य आहे, काही अनुकरण आहे व थोडी धार्मिक म्हणवून घेण्याची इच्छाही आहे या शंका नाही

अनुग्रह ही एक प्रतिष्ठित जाहिरातहि आहे हल्ली सर्व जग अडवार्टा‍ईज झालें आहे तसाच धर्म हा सुद्धा धंदा झाला आहे निदान धंद्याला साहाय्य व्हाव म्हणून काही लोक धर्माचा पसारा करीत असतात मोठी पोरती, शाबलचंद्र देवपूजा पुष्कळ देव मांडून नावकार करतो तेव्हां कुळांना वाटतें की, सावकार मोठा देवमनुष्य आहे व्यापारीहि गिऱ्हाइकापुढें आपल्या धर्मनिष्ठेच प्रदर्शन करतो व त्यामुळें गिऱ्हाइकाला हा व्यापारी अगदी खरा आहे असा भास होतो घरातील कर्ता पुरुष, संस्थानातील संस्थानिक, प्रत्येक पक्षाचा पुढारी हे सर्व जनतेप्रमाणे इतरावर छाप पडावी म्हणून धर्माचा उपयोग करतात।

कारण याच प्रतिष्ठित जाहिरात असते. श्राद्धपक्ष करून वरोच दक्षण दिली, पूजेला ब्राह्मण असला, बाईसाहेबांना पुराण सांगण्याला शास्त्री असला की मग अशा गृहस्थांना अधार्मिक किंवा नास्तिक म्हणण्याचें काय विशाद आहे! कारण हे सगळे भटजी, शास्त्री, पुरोहित वगैरे त्या गृहस्थांच्या जिवंत जाहिराती असतात! या सर्वांपेक्षां मोठी जाहिरात म्हणजे बुवाचा अनुग्रह घेणें ही होय विशेषतः बुवा विद्वान् व वक्ता असला व त्यांनी भर निरूपणांत रावसाहेबांची स्तुति केली किंवा यथार्थ गुणवर्णन केलें कीं सर्वांग कसें आनंदानें पुलकित होतें! धंदेवाईक महाराज येवढ्या व्यवहारांत फारच तरबेज असतात. प्रवचनोत्तर रावसाहेबांनीं महाराजांची स्तुति करावी व महाराजांनीं रावसाहेबांची स्तुति भर प्रवचनांत करावी असा हा एक प्रतिष्ठित, जिवंत व परस्परसहकारी जाहिरातीचा मार्ग आहे!

आमच्या यत्नानें निष्ठावंत शिष्यांच्या अंतःकरणांत काही फरक होणार नाहीं हें अगदीं खरें आहे! जे एकदां प्रज्ञाहत झाले व ज्यांनीं आपली बुद्धि गहाण टाकली, त्याच्याकरितां हा यत्न नाहींच! हा यत्न भविष्यकालीन तरुण पिढीकरतां आहे. भावी राष्ट्र हें तरुणांचें आहे, तें जीर्णांचें नाहीं. स्वदेशी उद्योगधंदे वाढवून परदेशी गेलेली संपत्ति परत आणितां न आली तथापि अधिक जाणाऱ्या संपत्तीच्या प्रवाहाला मात्र प्रतिबंध करता येतो! स्वदेशीचें महत्त्व राष्ट्र या दृष्टीनें जसें पुढील पिढीकरितां आहे, तसेंच या यत्नाचें महत्त्व पुढील पिढीकरितांच आहे. म्हणून भवभूतीनें म्हटल्याप्रमाणें 'तान्प्रति नैष यत्नः' त्याच्याकरितां हा यत्न नाहीं हें उघड आहे. साथीच्या रोगानें, प्लेगानें व महामारीनें पुष्कळ लोक मरतात! ते मेलेले लोक पुन्हां जिवंत होत नाहीत. तथापि जिवंत राहणाऱ्याकरिता जसें प्रतिबंधक उपाय करणें प्राप्त असतें तसाच हाही विषय आहे. बुवांची संस्थानें, त्यांचे ऐषआराम, त्यांचे भक्तगण यांत आज एकदम फरक दिसणार नाही; क्वचित् क्रियेला प्रतिक्रिया होईल परंतु असें असणें हे बरें का वाईट याची चर्चा व चिकित्सा होऊं लागली म्हणजे जें इष्ट तें आपोआप घडतें.

पाश्चात्य राष्ट्रांत सुद्धा हें बुवाशाहीचें खूळ आहे व ते लोकही चमत्कार, हस्तसामुद्रिक अशा नादांत असतात असें म्हणतात. शकुन,

चमत्कार, चेटुक, हस्तसामुद्रिक, मयतंत्र, जादू, गंडे, दोरे इत्यादि कल्पनांवर उभारलेला धर्म हा मिथ्या धर्मच होय ! हा मिथ्याचार जगात कोठेंही असला तथापि तो समर्थनीय नाही पाश्चात्य देशातील लोक बुवाबाज होऊ लागले आहेत, आणि आपल्याकडील काही बुवा परदेशात जाऊन प्रस्थ माजवू लागले आहेत हे दिसतच आहे कदाचित् काही दिवसानी परदेशागत डॉक्टर, इंजिनीअर, प्रोफेसर याप्रमाणं परदेशातून आलेल्या बुवाची बाजारात किंमतही जास्त वाढेल ! पण असं झाले तरी ते अयोग्यच समजले पाहिजे युरोपियन व अमेरिकन लोक हे आधिभौतिक शास्त्रांपलीकडे काही अध्यात्म आहे की काय व ते असल्यास त्याचा मार्ग हिंदुस्थानातून काही कळेल की काय, अशा शोधात कदाचित् असतील, जिज्ञासेच्या दृष्टीने हे योग्यहि आहे, पण काहींची जिज्ञासा, काहींचा भोळेपणा, काहींचा धूर्तपणा यामुळे जर तिकडे बुवाशाही माजत असेल तर त्याचही अधःपतन होऊ लागले आहे असे खास समजावे

बुवाचें खरें बळ बोवाभोवतालच्या लोकांना माहित असते कारण भोवतालचे लोक 'बुवा निर्माते' असतात आणि त्या लोकांत जाऊन राहिलें म्हणजे बुवाचं सर्व 'इंगित' कळते बुवा व महाराज हे प्रस्थापित व्हावे म्हणून व लोकात चांगली प्रतिष्ठा राहावी म्हणून अनेक कल्पना काढतात महाराजाचे तीन त्रिकाळचे फोटो काढून महाराज प्रत्यक्ष वेळी कसे विलक्षण दिसतात असं सांगणारे फिरते दलाल असतात, तर काहींना स्वतःचे चमत्कार वर्णन करण्याकरिताच गावोगाव पाठवितात प्रतिष्ठित लोकाकडे एखादा पेन्शनर, इंजिनीअर, मुन्सफ, डाक्टर असा जातो व महाराजाचे गुणवर्णन करून मोठमोठ्या लोकांना भुरळ घालतो सुशिक्षित समाजाला आकर्षण करण्याकरिता भीड घालून महाराजांची चरित्रेंहि लिहविली जातात अशाच तऱ्हेचे एका महाराजाचे चरित्रहि एका मोठ्या पत्राच्या भिडस्त संपादकाने लिहिले आहे

तात्पर्य, बुवाबाजीचे मूळ बुद्धिदौर्बल्यात आहे, परंपरागत भोळेपणात आहे आणि विचारशक्तीच्या ऱ्हासात आहे अज्ञानध्वसनाचे कार्य जितकं झपाट्याने होईल व अचुक कार्यकारणपरंपरा शोधण्याची सवय जितकी समाजास लागेल तितक्या अशा गोष्टी आपोआप बंद पडतील

परमार्थाविषयीच्या खऱ्या कल्पना लोकांना नाहीत, वेदांतातील कर्म, ईश्वर, कर्मफल, पुनर्जन्म इत्यादि सिद्धान्त तर्काला बरेचसे पटणारे आहेत, त्यांचा या बुवाबाजीचा बिलकुल संबंध नाही हे सर्व लोकांना माहित नसल्यामुळें परमार्थ हा एक पोटाचा धंदा झाला आहे

मनुष्यस्वभाव असा आहे की, प्रत्येकाला स्वतःच्या वास्तविक किंमतीपेक्षा अधिक मोठेपणा आवडतो ! साधकावस्थेतील अभ्यासी साधकाला सुद्धा महाराज, सर्वज्ञ वगैरे लोकांनी म्हटले की त्याला बरं वाटतं जनस्तुति मधुर लागू लागली की खरा साधक त्या उपाधीतून मोकळा होतो व लुच्चा साधक मूर्ख लोक नादी लागत आहेत असे पाहून आपलंच स्तोम अधिकाधिक माजवितो लोक आपल्या नादी लागतात, आपल्या शब्दावर झुलतात, असं साधकाला वाटू लागले की तो एकदम महाराज या सदरामध्यें सरकतो हरिदास-पुराणिकातून या पद्धतीनें जसे महाराज होतात, तसेच बी ए झालेले, संत वाङ्मयाचा अभ्यास केलेले साहित्यभक्तही 'महाराज' होऊ घातलेले आहेत

शहाण्याने बुवाच्या नादी लागू नये हाच उत्तम मार्ग ! एकदा महाराजाला बुद्धीचा पेच ढिला आहे असे दिसले, की महाराज लगेच पगडा बसवितो सारयशास्त्रातील प्रवृत्ति ही पुरुषान तिजकडे पाहाताच जसा संस्कृतीचा पिंगा घालते, किंवा डिडविडचा जोगी हा जसा बाईसाव आपले वक्तव्य आस्थेने ऐकतात असं पाहून पुराण लावबितो, तसेच हे महाराजहि करतात

या बुवाशाहीचे अनर्थ कोठवर वर्णावे ? या बुवाशाहीने अत्युत्कृष्ट अशा आपल्या तत्त्वज्ञानाची आणि परमार्थाची विटंबना चालविली आहे त्या विटंबनेचे स्वरूप चिळस यावी म्हणून पुढच्या प्रकरणात सांगणे भाग आहे

---

प्रकरण १४ वें. : :

# ब्रह्मविद्येची विटंबना

आर्य संस्कृतीच्या परंपरेमध्यें ब्रह्मविद्या ही सर्वश्रेष्ठ विद्या समजली जाते. पारमार्थिक दृष्ट्या ही विद्या म्हणजे माताच होय. मातेविषयीं अवज्ञा जशी त्याज्य तशीच कामनाहि त्याज्य होय. परंतु या भरतखंडांत कांहीं अडाण्यांनी या मातेची अवज्ञा केली असून ते तत्वज्ञानाविषयीं उदासीन आहेत. याच्या उलट कांहीं लुच्च्यांनी या मातेविषयी कामना धरून धंद्याच्या रुपानें तिजवर जगण्याचा उद्योग सुरू करून तिची विटंबना चालविली आहे. या जगांत सर्वश्रेष्ठ जर कोणतें ज्ञान असेल तर तें ब्रह्मज्ञान होय. ब्रह्मज्ञान म्हणजे आत्मज्ञान होय. सर्वांना शरीर काय आहे हें दिसतें व स्थूल शरीरापलीकडे सूक्ष्म शरीर आणि सूक्ष्म शरीरातील मन व बुद्धि हीं तत्त्वें काय आहेत यांचें सामान्य ज्ञानहि असतें. मनाचा व बुद्धीचा यथार्थ अभ्यास व त्यांच्या सामर्थ्याचे आकलन हें तरी किती माणसांना असू शकतें याचा विचार केल्यास मन व बुद्धि यांच्या पलीकडे असणारें जें आत्मतत्व त्याचें ज्ञान करून घेण्याची पात्रता प्रत्येकात असेल अशी कल्पनाहि करवत नाहीं. कारण इतर ज्ञानाप्रमाणें आत्मज्ञानाचा विषय नाहीं. इतर ज्ञानें हीं इंद्रियानी होतात तर हें ज्ञान अतींद्रिय आहे. इतर ज्ञानाला वृत्ति ही अंतर्मुख करावी लागत नाहीं, पण आत्मज्ञान हे बहिर्मुख वृत्तीनें मुळींच शक्य नाही. इंद्रियें हीं नेहमीं बाहेर पाहातात, पण आत्मज्ञानार्थ त्यांना आंत म्हणजे त्यांच्या स्वतःच्या उगमाकडे पाहावयास लावावयाचें असतें. अशी स्थिति असतांना आज पाहावें तो मुलगी कोणी देत नाहीं म्हणून ब्रह्मचारी, कवडीही मिळवण्याची अक्कल नाहीं (उद्योग करून) म्हणून अत्यंत विरागी आणि बुद्धि कुठेंही प्रविष्ट होत नाहीं म्हणून महंती; अशा अनधिकाऱ्यांनीं खरें सत्पुरुषत्व व ज्ञानांतील श्रेष्ठपणा हा भ्रष्ट करून सोडला आहे. हिंदुस्थानांत

दैवी संपत्ति व निसर्गमनोहारिता ही काही कमी नाही. पण तिला जें अमागल्य आले आहे ते या बुवा, बैरागी आणि महाराज यांच्या पराक्रमाचें फळ आहे.

आत्मविद्या ही श्रेष्ठ होय यांत शंका नाही. परंतु ती श्रेष्ठ कोणाला? तिचा अधिकार कोणाला? याचा विचार करावयास नको काय? दूध उत्तम पौष्टिक व वीर्यकर हे सर्वथैव खरें असलें, तरी जो दूध पिऊन ते पचवील त्यालाच ते गुणकारक आहे ना? पक्वान्न चांगलें पेढाहि मोठा पौष्टिक, पण तो ज्या मुलाच्या चार मास व टण्यांत येतो त्याच्या तोंडांत घालावयाचा नसतो! ज्याला सायासानें स्तनपानहि करितां येत नाही त्याच्या तोंडांत जिलबी व पेढे कोंबले तर ते अर्भक व्याकूळच होईल! अधिकारभेदानें शिक्षण दिलें जातें व अधिकारभेदानेंच वैद्य व डाक्टर औषधयोजना करितात. 'सर्वांना सोनामुखी' असें जर वैद्य करूं लागला तर अतिसार, हगवण इत्यादि विकार ज्यांना आहेत त्यांना मृत्युपथासच जावें लागेल.

अधिकारभेदानें इतर सर्व कार्यें जशी चालतात त्याचप्रमाणें ब्रह्मज्ञानाचेंहि आहे. ब्रह्मज्ञान हें सामान्य ~~मनुष्याच्या विषयचि होऊं शकत~~ नाही. ज्यानें पुरुषार्थ साधले, जगांतील सर्व लौकिक आकांक्षा तृप्त करून घेतल्या व भोगल्या तोच मनुष्य जगापलीकडे काय आहे याचा शोध करण्यास प्रवृत्त होतो. ह्याच सूक्ष्म बुद्धिवान, साक्षेपी व विरक्त मनुष्य ब्रह्मज्ञानाचा अधिकारी होय. यालाच साधनचतुष्टयसंपन्न असें म्हणतात. नित्य व अनित्य याचा विवेक, या जगांत व परलोकांत विषयसुखाची अरुचि, शम, दम, तितिक्षा, संतोष, शांति व सरळत्व इत्यादि षट् साधनांची संपन्नता आणि शरीर व मन यांच्या बंधपाशांतून मुक्त होण्याची उत्कटता, इतक्या साधनांनीं जो संपन्न असेल तोच या विद्येचा अधिकारी समजावा. येरा गबाळ्याचें येथें काम नाही हें मुद्दाम ध्यानांत ठेविलें पाहिजे.

हा अधिकार व ही योग्यता लक्षांत न घेतां हिंदुस्थानांत असा चमत्कार होत आहे की, जो उठतो तो ब्रह्मज्ञान बोलूं लागतो. ब्रह्मविद्येच्या नादीं लागणाऱ्याला धार्मिक व आचारसंपन्न समजतात व जो ते ज्ञान बोलतो त्याला सिद्ध पुरुष समजतात! ज्यांना विद्या, कला, शास्त्र,

व्यवहार याचा संपर्क नाही, साक्षरता नाही, सुबुद्धता व सुसंस्कृतता नाहीच नाही, अशा माणसाना ब्रह्मविद्येचे पाठ दिले जातात, व जग 'असार' आहे असे शिकविले जाते ज्याना मनुष्य कशाला म्हणतात हे कळत नाही, माणुसकीमध्ये कोणते गुण येतात याची माहितीहि नसते आणि ज्याना मानवी हक्क, मानवी जीवित, मानवी समाजसंस्था याची कल्पनाहि नसते अशा माणसाना 'जग मिथ्या' आहे असे सांगणे हा अन्याय नव्हे काय? पण हा अन्याय ऊर्फ अधर्म हिंदुस्थानात राजरोस चालू आहे त्याला प्रतिबंध नाही, नियंत्रण नाही, इतकेच नव्हे तर या ब्रह्मविद्येच्या नावाखाली बुवाशाही करून जे लाखो लोक समाजावर अगदी फुकट जगत आहेत व वाटेल ती अनीतीची कृत्ये करीत आहेत, त्यानाहि कोणी विचारीत नाही व पुसीतहि नाही

मनुष्याला मरण हे काय आहे हे जरी कळले तथापि ते मरण त्वरित का येते हे कळत नाही 'किं मरण मूर्खत्व' मूर्खपणा, अज्ञान, अडाणीपणा, प्रमाद, चुका करणे हेच मरण होय अर्थात् यामुळे माणसे जितकी त्वरित मरत आहेत तितकी साथीने व प्लेगनेहि मरत नाहीत हिंदुस्थानात मूर्खपणाने, चुकीच्या मार्गाने जाणारी दैत्यप्रजाच फार आहे समर्थ म्हणतात की, "चुकणे दैत्य जाणिजे" आणि अशा चुकाचे आगर म्हणजे ब्रह्मज्ञानाच्या भ्रमातील हिंदुसमाज हे होय

आजच्या या विसाव्या शतकात म्हणजे शास्त्रीय व प्रयोगसिद्ध अशा युगात समाजाने शास्त्र, शोध, शिस्त व संघटना याचाच अवलंब करावयास पाहिजे तरच हे अज्ञान नष्ट होण्याची आशा आहे

हिंदुस्थानातील नोकरशाही नष्ट व्हावी व लोकशाही स्थापन व्हावी असा प्रयत्न चालू आहे लोकाच्या पैशावर पोसलेली नोकरशाही हल्ली लोकाना मुळीच जबाबदार नाही म्हणून लोकाच्या हिताहिताची तिला मुळीच पर्वा नाही नोकरशाहीची धोंडी लोकाच्या हाती कधी येईल, आणि ही बुवाशाही तरी लोकाना कधी जबाबदार होणार हा मोठा प्रश्न आहे नोकरशाहीप्रमाणे बुवाशाहीनेहि आम्हाला गुलाम बनविले आहे व हतप्रभ केले आहे बुवाशाहीने आमची बुद्धि परत भ्रष्टविली आहे असे नाट्याचार्याने म्हणावे लागते बुवा म्हणून एकदा जाहिरात फडकली रे फडकला

कीं मग त्यापुढें कांही बोलावयाचें नाही, विचार करावयाचा नाहीं, फार काय पण प्रश्नहि करावयाचा नाही असाच दंडक पडलेला आहे. बुवा-साहेब म्हणजे महाराज, बुवा म्हणजे सत व सत्पुरुष, ते म्हणतील ते वेदवाक्य व करतील ती आज्ञा शिरसा प्रमाण ! अशीच समजूत साक्षर, निरक्षर, सुधारक व शास्त्री यांचीहि आहे. साधुमहाराज म्हणजे आहे तरी काय ? त्यांची विद्या, तप, अधिकार, दानत यांची चौकशी कुणीहि करीत नाहींत. तर केवळ एकानें गुरूपदेश घेतला कीं दुसऱ्यानें घ्यावयाचा व दुसऱ्यानें घेतला कीं तिसऱ्यानें त्याचा कित्ता गिरवावयाचा असा अंधपरंपरान्याय हिंदुस्थानात चालू आहे.

राष्ट्रांत आज बेकारी वाढली आहे, द्रव्य नाही, उद्योग नाहीं व अन्नाची पंचाईत पडली आहे असें म्हणणारे म्हणोत; परंतु या बुवा-शाहीकडे पाहिलें तर त्यांची चंदी यथेच्छ चालली असून त्याच्या चैनीत कांहीं कमी नाही असेंच प्रत्ययास येतें. बुवांना गुरुदक्षिणा मिळते, शिष्य-शिष्यिणी त्यांच्या सेवेस तत्पर असतात.

बुवा मठांच्या इमारती मोठ्या टोलेजंग उठवितात. बुवांच्या मिळ-कतीहि मोठ्या असतात. सावकारीचा धंदा महाराज करीत असतात, आणि भोळ्या शिष्यांच्या ठेवी संभाळतात ! अंगाला केशराची उटी, जटांना कामिनिया तेलें, नेसावयास उंची रेशमी भगवी वस्त्रें व खावयास शिरा, पुरी, घृतकुल्या व मधुकुल्या; असा यांचा अगदी साधा व वैराग्यदर्शक थाट असतो. हिंदुस्थानात असले फुकटखाऊ व चैनीने राहणारे रंगेल साधु कांही कमी नाहीत, त्यांची संख्या बरीच आहे.

श्री. प. प. केवलानंद स्वामीमहाराज (पं. नारायणशास्त्री मराठे) हे बद्रीनारायणास गेले होते. येतां जातां त्यांनीं उत्तरेकडील बुवा, गोसावी, महंत, साधु, संन्यासी इत्यादींमध्यें समाविष्ट होऊन जो अनुभव घेतला तो येथें देण्याजोगा आहे. उत्तर हिंदुस्थानामध्यें बुवाजींचें प्रस्थ या भागापेक्षां फारच अधिक आहे. काळा कबळीवाले यांनीं जी अन्नछत्रें व ज्या धर्मशाळा बांधल्या आहेत, त्यांचा पूर्ण उपभोग उत्तरेकडील हे साधुच घेत असतात. हरिद्वार व हृषीकेशापासून गंगेच्या कांठावर साधूचे आश्रम लागतात. त्यात काहीं संन्यासी, कांही बैरागी तर कांहीं प्रापंचिकमुद्रा असतात. विद्या,



भोळ्या शिष्यांनीं आणून दिलेल्या ठेवी महाराज संभाळतात व पुढें ते त्या आत्मसात करितात. (पृ. १४४)

विचार, विवेक, चातुर्य यांचें व बुवाजींचें बहुतेक वांकडेंच असतें. ना विद्या ना विवेक, ना कला ना चातुर्य, अशींच माणसें या बुवापर्यंत शिरतात कांहीं न करतां फक्त बुवाच्या बेपावर जगणें हेंच त्यांना इतिकर्तव्य वाटतें. आलेल्या यात्रेकरूंनीं धार्मिक भावनेनें यांना वंदन करावें, कांहीं द्यावें व आपला परामर्श घ्यावा अशी ह्यांची इच्छा असते व तसें न झाल्यास

यांची साधुवृत्ति क्षणांत मावळून यात्रेकरूवर शिव्याशापांचा वर्षाव होण्यास मुळीच वेळ लागत नाही. दुसरा उद्योग न करतां केवळ ' जय गंगाजी ', 'जय यमुनाजी', 'जय राम', 'जय गोपाळ' अशा घोषावर जगण्याचा आपला हक्क आहे; फार काय पण आपण असे करतों म्हणजे मोठें शतकृत्य करतों अशीच यांची समजूत असते. गांजा, चिलीम, धुमी, शेकोटी, गहूका आटा, घी व शक्कर यांत काहीं कमी पडतां उपयोगी न ही व ह्या अवश्य गरजा मदोदित पूर्ण व्हाव्या म्हणून हे महंत लोक काय वाटेल ते खोटेंनाटें बोलतात, थापा मारितात, लोकांना फसवतात; कित्येक बुवा तर श्रीमंत अशा अर्धवटांना चांगली मोहनी पाडतात व त्यांच्याजवळचे सर्व लुबाडून घेतात.

गोसाव्यामध्यें आपसांतील आखाड्यांची व तेथील मठपति होण्याची स्पर्धा असते. त्यानिमित्त त्या लोकांत मारामाऱ्या व खूनहि होतात. कांही बैरागी व साधु हे तर बायका व मुलें या परिवारांसह परमार्थी बनलेले असतात. काहीं निमित्तानें भिक्षा मागून जगणें व लोकांना आपला मोठेपणा पटविणें येवढाच उद्योग अशा लोकांना असतो. बुवा, बैरागी व संन्यासी *यांच्या दर्शनास लोक आदरानें जातात व कांही अधिक श्रद्धाळु* " बुवाजी क्या होना ? " असें विचारतात. बुवाजींचीं उत्तरें ठरलेलीं असतात ! कोणी गीता मागतो, कुणी माळ मागतो, कुणी खडावा मागतो तर कुणी घोंगडी मागतो ! भाविकाला शक्तीप्रमाणें एकदोन आण्यांची माळ अगर काही तरी बुवाला द्यावें असें वाटतें. पुढें तशी माळ बुवाजीना दिल्यानंतर ती फक्त दहा मिनिटांच्या आंत मागच्या दारानें विकली जाते. तात्पर्य, बुवाजींना दिलेल्या सर्व वस्तूंचा बाजार होऊन बुवाजी सहजच चारदोन हजारांचे मालक होतात !

काशीस जा, रामेश्वर पाहा, हरिद्वाराच्या गंगेच्या घाटावर जाऊन बसा व नीट पाहा म्हणजे असें दिसेल की पुजारी, पंडे, बुवा व व्यापारी यांच्यामध्यें धर्माचा, श्रद्धेचा व आस्तिक बुद्धीचा लेशही नसतो ! धार्मिक श्रद्धा ही फक्त बाहेरचे यात्रेकरू घेऊन येतात व तिच्यावर वरील लोकांचा व्यापार चालतो. तीर्थक्षेत्रांतील ते व्यापारी, बुवा व पंडे यांचे ते धंदे पाहिले म्हणजे या पुण्यक्षेत्रांतील पुण्यत्व नष्ट झाले असून शहाण्यानें या फंदांत पडूं नये असें

वाटत खरोखर धर्माच्या व देवाच्या मार्गात आस्थेने व जिज्ञासेने कोणीहि पडलेला नसून जे धार्मिक व देवभक्त म्हणून मिरवितात त्याचा तो एक प्रतिष्ठितपणाचा व लोकावर जगण्याचा धदाच आहे असें दिसूं लागत सन्याशी व यति हेहि हाच धदा करतात भिक्षेच्या गोष्टी, पुर्डीची पक्वान्नें व रुपायास्वरूपी शालिग्रामाच्या गप्पा असा त्याचा परमार्थाचा नित्य कार्यक्रम असतो 'रुपाया आणा' असे न म्हणता 'नारायण आणा', 'नारायण द्या' असे म्हणतात एवढेंच हा काय सन्यास का मिथ्याचार, का ही आत्मवचना का लोकवचना! "या सन्यासाला" काय म्हणावे असे अमृतराय म्हणतात ते यथार्थ आहे

हिंदु समाजाचे निरीक्षण केले व त्यातील सुबुद्ध निर्बुद्ध, साक्षर निरक्षर याचें अज्ञान पाहिले म्हणजे असे वाटते की काय हा धर्म व काय ह्या कल्पना? ब्रह्मज्ञानी म्हणवून घेणारे बुवा कुठे शिष्याना पशु बनवीत आहेत तर कुठें ईश्वरभक्तीच्या नावाखाली महत व भक्तिणी याच्या शृगारचेष्टाचे विलास झडत आहेत, काही लोक बुवाशाहीच्या पयात शिरत आहेत आणि गुरुकृपायुक्त गुरुप्रसाद झाला की सर्व सुखें मिळतात असे समजत आहेत, तर शहाणे सुरते, शिक्षित, सुधारक वृद्ध व चिकित्सकमुद्धा कोणी चमत्काराच्या मोहाने, कोणी सिद्धीच्या आमिषानें, कोणी लौकिक प्रतिष्ठेच्या इच्छेने तर कोणी म्हातारपणी समाधान मिळावे या लाल सेने या बुवाशाहीच्या जाळ्यात सापडत आहेत! काही लोक तर केवळ मजा व केवळ स्वार्थाची लुच्चेगिरी यामुळेंच बुवाच्या प्रभावळीत असतात हा सर्व प्रकार शहाणपणाचा आहे काय ?

ब्रह्मवेत्त्याची लक्षणें जी वेदात सागून दिली आहत त्यातील एकहि लक्षण आजच्या या महाराजाच्या अगी आढळत नाही निरपक्षता, निर्भयता, मननशीलता, शातता, समाहितता, निर्वैरता हीं व या तऱ्हेची लक्षणें साधूच्या ठिकाणी असावयास पाहिजेत पण आजच्या साधूच्या ठिकाणची दैवी सपत्ति कशी पाहावयाची हही लोकाना कळत नसल्यामुळें ते बाह्य व लौकिक ऐश्वर्यावरून बुवाचे अनुक्रम लावीत असतात व श्रेष्ठ—कनिष्ठपणा ठरवीत असतात

महाराजाच्या पश्चात् त्याच्या शिष्यगणामध्यें दहापाच लाखाचे दावे



बाईच्या तोंडात बोळा देऊन बुवानें डबोलें पळविलें. (पृ १४८)

मिष्टान्नें, हें सर्व कसें मिळेल ? प्रापंचिक स्थितीमध्ये हें शक्य असत नाहीं. इतर जबाबदाऱ्या व काळज्या प्रपंचामध्ये संपन्न माणसांच्या मागेंहि असतात. अर्थात् प्रापंचिक, व्यावहारिक व इतर सर्व जबाबदाऱ्या टाळून जगांतील सर्व उपभोग भोगण्याची ही एक कला आहे यांत संशय नाहीं.

## संस्थानिक व महाराज

पुष्कळ महाराजांच्या खाजगी व संस्थानच्या अशा दुहेरी मिळकती आहेत. महाराज प्रथम देवालय बांधून त्यांतून पुढे संस्थान उत्पन्न करतात. देवाची पूजा, अर्चा, नैवेद्य व इतर जे कांहीं देवापुढे येईल तें सर्व महाराजांचें खाजगी असतें. देवाला उत्पन्न, उत्सवाकरिता नेमणुंकी व आल्यागेल्याकरिता खर्च हा सर्व संस्थानचा होय.

व्यवस्था, देखरेख ही सर्व महाराजांचीच, अर्थात् त्याकरितांहि महाराजाना कांहीं तरी मिळतच असतें. देवाकरिता व देवाच्या नांवावर अनेक खातीं काढून मिळवावयाचें व अनेक कारणांनीं तें खाजगीकडे अनेक कार्यें दाखवून वळते करावयाचें, असा हा मठपतींचा धंदा असतो. संस्थानिक जसें हल्ली खाजगी द्रव्यसंग्रह वाढविण्यामध्यें निमग्न आहेत, तसेच महाराजहि करीत असतात. इंग्रजी राज्यात नोकरशाही, संस्थानात राजशाही व ही समाजात बुवाशाही आहे. तिहींचें ध्येय व स्वरूप एकच.

हरिदासाचा बुवा महाराज, त्यापुढें सत्पुरुष व पुढें महाराज अशी वढती कशानें मिळते ? तर ती केवळ लोकांच्या मूर्खपणानें मिळते, हरिदासांतून बुवा महाराजांच्या वर्गांत प्रविष्ट झालेले पुष्कळ आहेत. पुष्कळ हरिदासांना धंदा ठाकठीक चालावा म्हणून अनुग्रहाचें यंत्रहि जवळ बाळगावें लागतें. त्यामुळें वार्षिक खंडणी मान्यतेनें व निश्चित अशी वसूल होत असते. अमके हरिदास अमक्या भागांत जास्त लोकप्रिय याचा अर्थ त्यांची अनुग्रहीत शिष्यपरंपरा तिकडे असते व एकदां दीक्षा घेतल्यावर गुरूचें वाईट आचरण पाहूनहि निंदा करण्याची सोय नसते. कारण " गुरुः साक्षात् परब्रह्म, तस्मै श्री गुरवे नमः " असा या सांप्रदायाचा सिद्धांत असतो. स्त्रियाना जसें पति हें दैवत, तसें या अनुग्रहितांना गुरु हें दैवत असतें. त्याविरुद्ध काढण्याची सोय नसते. अर्थात् अशा मूर्ख लोकांवर बुवांनी चगळ का न करून घ्यावी ?



मी पूर्वजन्मींचा पति आहें. (पृ. १५२)

शिष्यिणीसमवेत अध:पतित झालेले बुवा नंतर असें म्हणतात कीं या बाईचा मी पूर्वजन्मीचा पति आहे. पण त्या बाईचा नवरा हातांत जोडा घेऊन असें विचारीत नाही कीं, " गाढवा तू तीन लाख दहा जन्मांचा पति असलास तरी हा तुझा बाप या जन्मीचा तिचा पति आहे तेव्हां तुला सर्व हजार जोडे मारतो व एक म्हणतो वाचकहो, असे जोरदार पति असतें तर बायका जातील तरी कशाला गुरुकडे ? तेच नाहीं म्हणून तर हें असें होतें. रमाबाई गेली म्हणून ठमाबाई जाते व शंकरराव जातात म्हणून माधवरावेंहि गुरुउपदेश घेत असतात रामभटजी व दामभटजी यांना काय, पूजा व अनुष्ठान मिळाली कीं ते म्हणतात महाराज उत्तम आहे व कृष्णशास्त्री व महादेवशास्त्रीही म्हणतात कीं " गोणता लेक शभर रुपये दक्षणा व शालजोडी अशी संभावना करितो आहे ? तेव्हां बुवाचा गोंधळ काही असला तरी आम्हांस काय त्याचें ? "



वालुकालिंग मार्गेण नष्टं मे ताम्रभाजनं । (पृ. १५२)

जग हे असे आंधळे आहे ते कोणाच्याही मागे लागते कोणालाहि ते ब्रह्मज्ञानी करिते व वेड्यालाहि ते सत्पुरुष बनविते जगाची ही आंधळी प्रवृत्ति पाहून " तुका म्हणे कैसे आंधळे हे जन । गेले विसरुन खऱ्या देवा ।। ' या वाक्याची यथार्थता पटते

कित्येक सत्पुरुषाना 'तुम्ही स्त्रियाना का उपदेश देता ? ' असे विचारल्यास ते निर्लज्जपणे असे म्हणतात की, त्याचे नवरे त्याना आमच्याकडे का पाठवितात ? नवऱ्यानी आपल्या बायका व आईबापानी आपल्या तरुण मुली महाराजाच्याकडे अनुग्रहार्थ वेळी–अवेळी का पाठवाव्या हेच गूढ आहे असे एक गाव आढळत नाही किंवा असा एक बुवा आढळत नाही की ज्याने स्त्रियाना अनुग्रह देताना काही बर–वाईट केलेले नाही ! ! अविवाहित स्त्री–पुरुषाचे सानिध्य हे परमार्थामध्ये तर फारच घातक, असे असता बुवामहाराजाच्या मठात व संस्थानात वर्चस्व शिष्यिणीचे दिसत असते ! ! !

' पचते तर का खाऊ नये, खपते तर का विकू नये आणि चालते तर का चालवू नये ? ' हाहि एक महाराजाचा प्रश्न आहे बुवाच्याकडे बाया जातात, विधवा स्त्रिया त्याना डगेले अर्पण करतात, कित्येक त्याजवर भाळतात ! !

वृक्ष तेथें छाया । ब्रह्म तेथें माया ॥ बुवा तेथें बाया । असणेंची ॥

हा नैसर्गिक व्यवहार सर्वत्र आढळतो सर्वांचे हित साधत, पुष्कळाची तोडे साधु बंद करितात, या स्वार्थी आशेनेच लोक बुवाच्या मागें लागतात त्यात श्रीमंत, गरीब, विद्वान्, अविद्वान्, साक्षर व निरक्षर अशा बहुविध वृत्तीच्या लोकाना विविध आमिषें असतात म्हणून सर्वांचे केंद्र बुवाचे संस्थान होत असते

हिंदु समाजात, देव, धर्म, परमार्थ याच्याविषयी अशास्त्रीय कल्पना इतक्या आहेत, की त्यावर लुच्चे लोक साधुपणाचे ढोंग करून फुकट जगत आहेत ईश्वर व मनुष्य याची भेट करून देणारा हा गुरु अगर महाराज अगर बुवा आहे अशी, शिकलेल्या शहाण्या बॅरिस्टर, डॉक्टराचीहि समजूत असते ! त्या बुवाच्या बरोबर देव किती बळला आहे व आपला अधिकार किती

आहे याचा विचार न करता लोक आपले भराभर गुरु करतात, दीक्षा घेतात, भजनी लागतात व इतरहि पाहिजे त्या गमती करितात !

"परमार्थ, बुवा व ब्रह्मज्ञान म्हटले की, काही लोक अगदी कान टवकारून ऐकतात. त्यात बुवा बोलत नाहीत, खात नाहीत, शिव्या देतात असे ऐकले की, मग त्या बुवानागे अगदी झुंडीच्या झुंडी !! बुवा तीन दिवस झाडावर उपाशी बसला की चौथे दिवशी पेढ्याची ताटे, श्रीखंडाच्या वाट्या व शिऱ्याच्या वेळण्या भरून पुढे येतात अजागळ लोक हे अन्न आणून देतात, पण दुसरे लोक बुवाचे सिद्धिसामर्थ्य कसे* आहे असे म्हणून अद्‌भुतपणा उत्पन्न करितात

अर्धवटपणा व धर्मभोळेपणा हा शास्त्री, पंडित, वकील, डॉक्टर अशा सर्वांत आहे शिवाय वकील, डॉक्टर वगैरेना आपापल्या व्यवसायातले जरी कळत असले, तथापि वेदान्त, अध्यात्म व परमार्थ यातील सर्व काही कळते असे नाही मग केव्हा तरी असे लोक जेव्हा एखाद्या बुवाकडे जातात, तेव्हा त्याच्या भाषेची व माहितीची भुरळ त्यांच्यावर पडते व ते त्याच्या नादी लागतात पुढे बोलाफुलाला केव्हा तरी गाठ पडली म्हणजे अगदी *अधभक्त होतात श्रीमत व सधन माणसाना तर ते मध्यम समाजात* मिसळत नसल्यामुळे कीर्तन. पुराण, प्रवचनद्वारा जे विचार सहज ऐकावयास मिळावयाचे ते त्याना मिळत नाहीत आणि मग हे केव्हा तरी एखाद्या बुवाकडे गेले म्हणजे तेथे भारले जातात व सागतात की, " काय हो, तो अमका कोष्टी आहे, शिपी आहे, न्हावी आहे, काय बृहस्पतीसारखा ज्ञानेश्वरी सागतो! तो ज्ञानी आहे खरा !" अशा तऱ्हेने हे लोक हुरळून जातात बुवाहि अशीच सावजें पाहात असतो त्यामुळ सामान्य लोकाना तेथे काही तरी असले पाहिजे असे वाटते

ज्याअर्थी इतके मोठेमोठे लोक बुवांच्या नादी लागतात त्याअर्थी तेथे 'काहीतरी' असलेच पाहिजे असे एक सर्वांत मोठे व भ्रमोत्पादक म्हणणे असते! पण जे लोक नादी लागतात, ते अडाणी म्हणून लागतात, उद्योग नाही म्हणून लागतात कोणी मतलबाने, तर कोणी स्वार्थाने, तर कोणी मजेने बुवाच्या नादी लागतात त्यात काही शिकलेले, शास्त्री, पंडित, वकील, डॉक्टर, बॅरिस्टर, सॉलिसिटर असेहि असतात पण हे सर्व धर्म-

श्रद्धेच्या दृष्टीने नरम असतात या लोकाना यातील काही कळत नसत म्हणून त काही तरी समजतात अशाच्या मेंदूचा एक पेंच ढिला असतो!

या 'काहीतरीचे' पृथक्करण केले तर त्यात काहींचे अज्ञान, काहींचा धर्मभोळेपणा व काहींचा धूर्तपणा याचे मिश्रण असते इतकच बुवाचा धूर्तपणा व बेरकीपणा बुवाभोवतालच्या टग्याची कारवाई आणि काही शिष्याचा धर्मभोळपणा व अज्ञान यातून या काहींतरीचा उगम होतो

काही बुवा प्रथम वैराग्य दाखवून नतर सार्वजनिक कार्ये काढतात घाट दवाखाने जीर्णोद्धार, याच्या नावावर पैसे जमविता-जमविता खाजगी मिळकतीहि करितात व त्यास साखसुरतपणा यावा म्हणून निकलले लोकहि मडळामध्ये समाविष्ट करितात प्रथम पारमार्थिक वैराग्य नतर सार्वजनिक कार्याची हौस आणि शवटा पक्के दिन्दर स्वार्थी अशा क्रमानव वाढलेले पुष्कळ बुवा आढळतात !!!

तरुणानो, तुम्हाला प्रपच करावयाचा आहे ना ? कीर्ति व पैसा हीं पाहिजेत ना ? म्हणजे धर्म अर्थ व काम हे तीन पुरुषार्थच जर पाहिजेत तर तुम्ही नगती उठाठेव कशाला करता ? सस्कृत पुस्तक पाहिजे असल्यास ते नस चाभाराच्या दुकानात मिळत नाही सोन पाहिजे असल्यास ते ना लाकडाच्या वखारीत मिळत नाही तसच प्रापचिकाना जे काही पाहिजे त त्याना प्रपच करणाऱ्या तज्ञाचा सल्ला घऊनच मिळविले पाहिजे जो नुसत्या जटा वाढवून बसला आहे टिळटापी धारण करितो ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी नुसत्या पोपटासारख्या बोलतो व दुसऱ्याच्या पैशावर आयतावा मारता जगतो अशाकडे जाऊन काय बर मिळणार आहे ?

राष्ट्रातील तरुणानो, तुम्ही बुवाच्या मागें न लागता आधुनिक शास्त्राच्या मागें लागा गुरुमहाराजाच्या चमत्काराचा विचार करून जगात पचमहाभूतातील शास्त्रीय शक्तीनी काय चमत्कार चालवले आहेत ते चांगले डोळे उघडून पाहा इश्वरभजनार्थ दिंड्यापताकात दग न होता जगात ईश्वरी शक्तीचे जे अनत प्रवाह पचभूतामध्ये वावरत आहेत त्याचा शोध करण्यात देहभान विसरा राष्ट्राची महीमासर करण्यापेक्षा राष्ट्रात मोठमोठे मानसचे कारखाने काढा आणि अगठचातून निघाल्ली

गंगा न पाहता जगात ज्ञानगंगा कशी धो धो वाहात आहे ती पाहा व तीमध्ये मनमुराद अवगाहन करा

परमेश्वर तुमचा उद्धार करणार नाही व बुवा महाराज तर कधी करणारच नाही परमेश्वर म्हणतो की "उद्धरेत् आत्मनात्मानम्" स्वत आपला उद्धार करून घेतला पाहिजे जो यत्न करतो, उद्धाराकरता धडपड करतो त्यालाच ईश्वर साहय करतो ईश्वर कर्माचेच फळ देतो, तो अगदी नयनिष्ठुर आहे, आपल्या पदरचे तो काही देत नाही मनुष्याने दीर्घोद्योगाने आपला अधिकार वाढविला पाहिजे व जे पाहिजे ते यत्नानेच मिळविले पाहिजे ईश्वर कार्यसिद्धीचे किंवा मोक्षाचे गाठोडे कधीच आणून देत नाही कारण ते त्याच्याजवळ नाही हा जेथे प्रत्यक्ष ईश्वराचा, न्याय, तर्थ येरा पामराची कथा काय !

कोणत्याहि व्यक्तीचा व समाजाचा जो उत्कर्ष होतो तो अचुक यत्नाने होतो कार्य व कारणसबंध कळल्याशिवाय बिनचुक यत्न होत नाही अज्ञानाने भलत्या गोष्टी करावयाच्या व त्याचे दुष्परिणाम दिसू लागले की देव, दैव, गुरु, कली याच्यावर टकावयाचे हा व्यवहार सर्वस्वी दुबळेपणाचाच आहे सरलाने आपली बुद्धि चालविली पाहिजे, कार्यकारणसंबंध शोधून अचुक यत्न केला पाहिजे, मग उत्कर्ष हा त्याच्या मागोमाग धावून येत असतो

उत्कर्षाचा या अभ्युदयाचा लाभ करून घेण्याकरिता तरुणांनी षड्रिपु-दमन कसे करावे, व आजच्या परिस्थितीस अनुसरून ईश्वरप्राप्तीचा कोणता राजमार्ग चोखाळावा हे पुढील दोन प्रकरणात सांगतो

---

प्रकरण १५ वें. : :

# रिपुदमन का रिपुत्याग ?

आपण जवर पुष्कळ वेळा कीर्तनांमध्ये व पुराणामध्ये षड्रिपूचा त्याग केला पाहिजे, काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर हे षड्रिपु सोडल्याशिवाय परमार्थ साधत नाहीं, हे षड्रिपु जोंवर आहेत तोंवर मनुष्याचा अधःपात होतच असतो, अशा प्रकारचा विषय ऐकला असेलच. फार काय पण भगवद्गीतेमध्यें सुद्धां कामक्रोधादि रिपूंना 'नरक-द्वारें' म्हटलें असून त्यांचा त्याग करावा असें भगवंतांनीं अर्जुनाला सांगितलेलें आहे.

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
काम: क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ अ. १६–२१

*प्रस्तुत प्रकरणामध्यें या रिपूंचा त्याग करावा का त्यांचें दमन करावें,* याचा विचार कर्तव्य आहे. वरील श्लोकात " एतत्त्रयं त्यजेत् " असा पाठ आहे तो " एतत्त्रयं जयेत् " असा असावा का काय असा प्रश्न आहे.

प्रथमतः असा विचार करूं की हें शरीर कोणकोणत्या घटक द्रव्यानी बनलेलें आहे ? शरीरामध्यें पंचमहाभूतें आहेत. अहंकार आहे, बुद्धि आहे, इंद्रियें आहेत, मन आहे, विषय आहेत. त्याचप्रमाणें इच्छा, द्वेष, सुख-दुःख, संघात, चेतना, धृति इत्यादि सर्व आहेत. शरीर जोपर्यन्त आहे तोंवर हीं सर्व असणार हे सिद्ध आहे. अग्नीतील दाहकत्व, जलांतील शीतत्व, पृथ्वींतील गंधत्व हीं जशी त्यांना सोडून असणें शक्य नाही, त्याचप्रमाणें इच्छा, द्वेषादि विकार शरीराला सोडून असणार नाहीत. अर्थात् त्यांचा सर्वथैव त्याग अशक्य आहे. गीतेच्या तेराव्या अध्यायांत या शरीराला क्षेत्र म्हटलेलें आहे. त्या क्षेत्रांत छत्तीस तत्वें आहेत. त्या छत्तीसांपैकीं

इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः । अ. १३–६

इच्छेमध्ये कामाचा, व द्वेषामध्ये क्रोधाचा अंतर्भाव झालेला आहे म्हणून जिवंत मनुष्य प्राण्याला याचा त्याग करणे कसे संभवेल?

काम, क्रोध, व लोभ म्हणजे तरी काय? काम म्हणजे इच्छा, आशा, वासना, तृष्णा असे अनेक पर्याय याविषयी सांगता येतील प्रत्येक शब्दाच्या अर्थात थोडा फार फरक आहे हेहि खरेच तथापि अमुक हवेसे वाटणे म्हणजे काम व इच्छिलेली वस्तु मिळाली की तिच्या संरक्षणाचा किंवा उपभोगाचा जो विकार उत्पन्न होतो त्याला लोभ म्हणतात* इच्छिलेली वस्तु न मिळाली की ज्यायोगाने ती न मिळाली त्याबद्दल द्वेष उत्पन्न होतो, इंद्रिय व विषय याचा संयोग होताच जी इच्छा उत्पन्न होते तिला काम म्हणतात व त्या इच्छेची पूर्ति न झाल्यास तेथे द्वेष तत्काल उभा राहतो*

आणि इच्छिलिया सांगडें । इंद्रिय आमिष न जोडे
ऐसा जो डाव पडे । तोचि द्वेष ॥ —ज्ञा अ १३–१२६

याप्रमाणे काम, क्रोध व लोभ या शब्दांचे अर्थ आहेत मोह, मद व मत्सर याचे अर्थ तर स्पष्टच आहेत प्रथम षड्रिपूचा त्याग व्यावहारिक माणसांनी करावा काय? करणे शक्य आहे काय? ह पा, ।

समजा, आपण एखाद्या गावी आहोत तेथ काही आपले शत्रु आहेत, त्या शत्रूंचा त्याग गावात राहून करता येईल काय? त्यांच्याशी फार झाले तर असहकारिता करता येईल, पण तीहि सर्वस्वी शक्य नाही दरराज उठून त्यांचे तोंड पाहण्याचा प्रसंग येणारच अशा वेळी त्यांचा त्याग करण्यापेक्षा त्यांचे दमन करून त्यांना मऊ करणे हेच व्यवहार्य नाही काय? कोणत्याहि समाजामध्ये गुन्हेगार लोक असतातच, त्या गुन्हेगारांचा त्याग सर्वस्वी करता येतच नाही गुन्हेगार माणस ही वानराप्रमाणे पकडून जरा लांब नेऊन सोडली तरी तीं पुन्हा येणारच म्हणून कोणतही सरकार अशा लोकांचे दमनच करिते गुन्हा केला की सश्रम कारावासाची शिक्षा देणे, कारागृहात त्या लोकांकडून अनेक कष्टाची कामे करून घेणे व त्यांना नरीव करणे हीच रीति सरकार स्वीकारते नाही रिपूचे दमन जसे दंडाने होते तसच काहींचे शब्दाने, शिक्षणाने व सामाने होते हेहि येथे लक्षात ठेविले पाहिजे ।

समजा, घरामध्ये खोडकर, व्रात्य व उच्छृंखल मुले आहेत त्यांना

त्याग करावयाचा म्हणजे त्यांना घरांतून हाकलून द्यावयाचें कीं काय ? नाहीं, तें शक्यच नाहीं ! मग त्याचा सर्व त्रासयातना सहन करावयाचा काय ? तर तसेंही नाहीं. केव्हां चोपून, केव्हा धाक दाखवून केव्हा समजुतीने सुज्ञ बाप मुलाना ताळ्यावर आणण्याचा अखंड यत्न करीत असतो. तसाच यत्न या षड्रिपूच्या बाबतीत केला पाहिजे. खोडकर, त्रास्य मुलें कांहीं झाले तरी तीं आपलीच आहेत. त्याना एकसारखें मारणें किंवा दुरुत्तरे बोलणें हे शक्य नाहीं व इष्टहि नाही. कामक्रोधादि रिपु हे आपल्या शरीरातीलच आहेत, शरीराबरोबरचेच आहेत, त्यांची मगरमिठी सुटणें शक्य नाहीं, अतएव त्याना हळुहळू गरीब करून उपयुक्त केलें पाहिजे. श्री तुकाराम एके ठिकाणीं म्हणतातः--

कामक्रोध बंदीखाणी । तुका म्हणे दिले दोन्ही ॥
इंद्रियांचे धणी । आम्ही झालों गोसावी ।

तसेंचः--

कामक्रोधा न सुटे मिठी । गिन्हे तरी बेठी रावविती ॥

म्हणजे कामक्रोधांची मिठी सुटत नाही पण त्याना गरीब केल्यावर वेठीच्या बैलाप्रमाणें त्याना राबवतां येते ! जोंवर इंद्रियें आहेत तोंवर इंद्रियांचे अर्थ म्हणजे विषय हे आहेतच. इंद्रियें ही विषयाकडे धांव घेणारच. विषयप्राप्तीत प्रेम व अप्राप्तीत द्वेष हेंहि ठरलेलेंच आहे. पण मनुष्यानें विचारून व विवेचून वागून त्यांच्या आधीन होतां कामा नये असेंच गीतेचें सांगणें आहे

इंद्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।
तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥ गी. अ ३-३४

जरा दूरदृष्टीनें विचार केल्यास असे आढळतें कीं, मित्र व शत्रु हे शब्द सापेक्ष आहेत. कुणी कुणाचा मित्रही नाही व कुणी कुणाच शत्रुहि नाहीं. ज्या जातीचें कार्य इष्ट असेल त्याला अनुकूल तो मित्र व प्रतिकूल तो शत्रु असाच सिद्धांत निघतो. जगांत टाकाऊ असें कांहीच नाही. पण प्रत्येक पदार्थाची योजना करणारा मात्र दुर्लभ आहे. षड्रिपुमुद्धां टाकाऊ नाहीत पण त्यांची योजना चांगली केली पाहिजे.

कामक्रोधादि विकार हे शस्त्रासारखे तिखट आहेत व वापराच्या दागिन्यासारखे नाजुकहि आहेत शस्त्राचा उपयोग ज्याला करिता येईल त्याला ते संरक्षण देत व ज्याला तो करिता येणार नाही त्याला, तेच शस्त्र मरणहि देते बापाने मुलाला शत्रूहननाकरिता तीक्ष्ण शस्त्र दिले, परन्तु मुलाने त्याच्या धारेची पारख करण्याकरिता ते प्रथम प्रमादामुळे आपल्याच मनगटावर जर चालविले तर त्याचा दोष बापाकडे येईल काय ? श्रीमंताच्या स्त्रिया उन्हाळ्यामध्ये वापराचे हलके व सुवासिक दागिने जपानामध्ये वापरीत असतात, असे ऐकून एका भटुभटजींच्या सुखलुळा-बाईने जर ते आणविले व शृंगारसाज करून बाई चूलखड फुंकू लागली तर त्याला कोण काय करणार ? चुलीतील लाकडाबरोबर बाईचे दागिने पेट घेतील व तोंड भाजण्याशिवाय काही लाभ होणार नाही तीक्ष्ण शस्त्र काय किंवा नाजुक कर्पूरालंकार काय दोन्ही मारक नाहीत, फक्त उपयोग करून घेण्याचे तारतम्य ज्ञान पाहिजे

येथवर कामक्रोधादि विकार शरीरसंबद्ध आहेत ते शरीराचे घटक आहेत, शरीर आहे तावर सर्वथैव त्याग अशक्य आहे, विषय पाहिला की हे विकार उद्भूत होणारच, मनुष्याने याच्या स्वाधीन न होता त्याचा योग्य उपयोग करून घेतला पाहिजे इ विवेचन झाले आता याची योजना कसवगी करावा व त्याचे दमन कसे करावे या विवेचनाकडे वळता

गेली काही शतके आपल्या समाजावर निवृत्तिपर वेदांताची सारखी पुटावर पुटे चढल्यामुळे आपल्याला षड्-विकाराचा योग्य उपयोग करण्याचे शिक्षणच मिळालेले नाही काम नको, इच्छा नको, राग नको, संताप नको, जगदी काही नको ! ! ! अल्पसंतुष्ट अजागळासारखे आपले जिणे झालेले आहे परंतु पुरुषार्थ व उद्योगप्राप्तीस्तव या षड्विकाराचा उपयोग व्यवस्थित-पणे करावा, असले विचारहि पूर्वीच्या वाङ्मयात आहेत उदा., अलीकडील मुक्तेश्वरी भारतातील पुढील ओव्या पाहा –

काम असावा ईश्वरभजनी । क्रोध असावा इंद्रियदमनी ।
तीर्थप्रसाद-शेष-ग्रहणी । लोभ अपार असावा ॥
मोह असावा सज्जनांसी । मद असावा दुर्जनांसी ।
मत्सर सदा समाचारांसी । असावा तो असे की ? ॥

भारतातील सभापर्वामध्यें धर्मराजाला नारदानी काही प्रश्न विचारले आहेत त्याना " कच्चित् " प्रश्न असे म्हणतात त्याचे रुपातर करताना मुक्तेश्वरानी वरील ओव्या स्वतत्र विचाराने लिहिल्या आहेत

जगात काम म्हणजे इच्छा असावी, का नसावी ? विषयेच्छा आहे म्हणून जगाचे सवर्धन होत आहे काम तरी कोणता असावा तर धर्माला अविरुद्ध असा असावा गीतेत भगवान सागतात—

धर्माऽविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ गी अ ७–११

स्वोन्नति, स्वोत्कर्ष, स्वधर्मपोषक असा काम म्हणजे इच्छा अवश्य असली पाहिजे मी मोठा होणार, आपले कर्तव्य उत्तम करणार, पुरुषार्थी होणार, उद्योग अविरत करणार इ इच्छा वा महत्त्वाकाक्षा मनुष्यामध्ये अवश्य पाहिजेत परतु ही इच्छा जर अनावर होऊन दुसऱ्याची स्त्री, वित्त, अन्न व राष्ट्र याचे हरण करण्याकडे ती प्रवृत्त होईल तर तिचे दमन केलेच पाहिजे व तिला योग्य ध्येयाकडे लाविले पाहिजे दुसऱ्याचे वाईट चिंतणे, त्याच्या कार्यांत विघ्ने आणणे, त्याला बुडावण्याचा यत्न करणे असला जो काम आहे तो वाईट समजावा व त्याचा त्याग करावा परतु सदाचार, सद्वर्तन, सद्‌भिरुचि, सदुद्योग याचा हव्यास अवश्य असावा स्वोन्नति म्हणजे तरी काय, तिची इच्छा म्हणजे काय हे ज्याचे त्यानेच ठरविले पाहिजे ज्या इच्छेच्या मार्गे लागल्याने उद्योग व उत्साह ही सारखी वाढतील अशीच ती असावी नाहीं तर असभ्य, अव्यवहार्य व असभाव्य इच्छेच्या मार्गे लागण्याने जन्माची वणवण व रुखरुख सपत नाही व चित्ताला समाधान नि शरीराला स्वास्थ्य असे कधीच मिळत नाही तात्पर्य, ज्या कामाचे पर्यवसान शेवटी समाजसेवेत व ईश्वरप्राप्तीमध्यें होईल असा कामविचार मनुष्याने सदैव बाळगावा

कामविचाराप्रमाणे क्रोधहि जगताच्या धारणपोषणास अवश्य आहे क्रोध हा प्रतिकार करणारा आहे आत्मसरक्षणाचा अधिकार प्रत्येकास आहे आपल्यावर दुसऱ्याकडून जेव्हा अनेक प्रकारचे आघात होतात, तेव्हा स्वसरक्षणार्थ प्रतिकारपोषक क्रोध अवश्य पाहिजे शातीने क्रोधाला जिंकावे हा सन्यासधर्म आहे परतु क्रोधानेच क्रोधाचा प्रतिकार करणे हा व्यवहारधर्म आहे एकसारखा राग किंवा सताप उपयोगी नाही परतु कोणी

काही केले तरी अगदी माडपणाची शाति ही उपयोगी नाही मुक्तेश्वर म्हणतात—

व्यवहारीं शाति नये कामा । परमार्थी क्रोध नाशी धर्मा ॥

महाभारतातील वनपर्वामध्यें क्रोध व शाति याचा विचार फार मार्मिकपणे केलेला आहे व शेवटी सिद्धात पुढीलप्रमाणे सागितला आहे

न श्रेय: सततं तेज न नित्यं श्रेयसी क्षमा।

तेज म्हणजे क्रोध हा नेहमी श्रेयस्कर नाही तसीच क्षमाहि सदैव श्रेयस्कर नाही अति थड मनुष्याची बायको उपटण्याचा यत्न दुष्ट करीत असतात ( अथास्य दारान् इच्छन्ति ) हा प्रत्यक्ष अनुभव आहे पाडव वनवासाला गेले पण त्यामध्यें भीम व द्रौपदी याचीच अतःकरणे क्रोधाने जळत होती दुष्ट दुर्योधनाशी धर्माने जे शात वर्तन केले तें त्याना मुळीच खपले नाही कवि मोरोपत यानी या सवादावर सुदर आर्या केल्या आहेत द्रौपदी म्हणते—

सर्वत्र क्रोध जसा तैसी सर्वत्र न क्षमा साजे।
ते कैसे न वधावे तोडिति परघातदक्ष माता जे ॥
येऊ द्या कोप मनी एकिकडे सप्रति क्षमा राहो ॥
क्रोध असावा समयी केवळ वश चित्त न क्षमेला हो ॥

भीम म्हणतो—तूं क्षत्रिय आहेस हे विसरलास ! !

काय म्हणो तुज आर्या ! ब्राह्मण वृत्तीस काय अनुसरसी ॥
भणगा परी न वस वनीं म्हण गा बापा मनुष्यदेवा हू ।
दे बाहूस यश रणी खळखळ खळ रक्तपूर दे बाहू ॥

ब्राह्मण वृत्तीचा स्वीकार करून भिकाऱ्यासारखें वनात राहण्यात काय अर्थ आहे ? या बाहूना यश दे त्याचेकडून रक्ताचे पूर खळखळ वाहू देत दुष्टानी जर राज्य घेतले, स्त्री पळविली तर ती शातीने परत मिळत नसतात स्त्रैय, सताप, चीड याच वृत्ति तेंव्हा पाहिजेत धर्माने भीमाला त्या वेळी जरी शातीचा उपदेश केला तथापि शेवटी भारतीय युद्ध अपरिहार्यच ठरले ! ! !

भीम व द्रौपदी यानी धर्माशी जें सभाषण केले त्यावरून व पुढें कुतीने वेळोवेळी जें प्रोत्साहन दिले त्यावरूनहि क्षमाशातीप्रमाणे काम —

क्रोध या विकारांची आवश्यकता आहे असे ठरते. फक्त तारतम्यानें योग्य वेळी योग्य स्थळीं उपयोग केला पाहिजे. समजा एक डॉक्टर मोठा तज्ञ आहे, त्याची रुग्णालय व तुरुगावर नेमणूक झालेली आहे. हा जर अति रागीट असेल तर रोग्याची सेवा त्याच्याकडून नीट होणार नाही व अतिशय थंड असेल तर कारागृहांतील कडक शिस्तीचें काम त्याजकडून होणार नाही. तुरुंगात गेल्यावर त्याने शंकराचा अवतारच धारण केला पाहिजे व रुग्णालयांत गेल्यावर पालनकर्त्या विष्णूची शांत वृत्ति धारण केली पाहिजे."

तुकारामासारखे संत सुद्धा म्हणतात की 'तुका ह्मणे राग। संत शिवों नेदिती आंगा' म्हणजे संत हे क्रोधाचा स्पर्शहि होऊं देत नाहीत. पण हेच तुकाराम दुसरीकडे असे म्हणतात की 'न यावा तो कैसा राग। खोटें मग देखोनी!' म्हणजे असत्य, अन्याय्य व चीड आणण्याजोगें एखादें कृत्य आपल्या डोळ्यासमोर घडल्यास राग आलाच पाहिजे व तें कृत्य करणारास शासन झालेच पाहिजे! संत झाले म्हणून काय झालें? सत्य, नीति, न्याय, दया व परोपकार अशा नीतिधर्माविरुद्ध जेथें वर्तन होत असेल तेथे प्रतिकार केला पाहिजे. समजा, आपण रेल्वेच्या प्रवासाला निघालो, तिकिटें आगाऊ पंचेचाळीस मिनिटें द्यावीत असा रेल्वेचा नियम असतांना खिडकीजवळ जाताच जर मास्तर 'अवकाश आहे' म्हणून दरडावू लागला तर क्रोधानें प्रतिकार केला पाहिजे. तिकिटकलेक्टर, रेल्वेगार्ड यांना हिंदुस्थानांतील उतारूंशी असभ्यपणे वागण्याची जणू संवयच जडली आहे. तिकिटकलेक्टर दार कधीहि वेळेवर उघडत नाही किंवा अर्धवट उघडून माणसामाणसांमध्यें धक्काबुक्कीचा प्रसंग सदैव आणतो. तेव्हा तत्काळ त्याविरुद्ध वरिष्ठाकडे तक्रार केलीच पाहिजे. रेल्वेच्या डब्यांत वाजवीपेक्षां जास्त माणसें कोंबण्याची रेल्वेनोकराना अगदी पिढिजात सवयच जडली आहे. आपल्या डब्यांत तशी खेंचाखेंच असेल तर आपण गार्ड व स्टेशनमास्तर यांना कळविलें पाहिजे व त्यांनी तें ऐकलें नाहीं तर वरहि कळविले पाहिजे. मोटारचे एजंटहि पुष्कळ वेळां उतारूंना फार छळतात. ड्रायव्हर तर नेहमी नियमापेक्षां माणसें अधिक बसवीत असतो. अशा सर्व

प्रसंगी "जाऊ द्या की हो! तो मूर्ख आहे! मला काय त्याचं!" असे न म्हणता 'मी मनुष्य आहे!' 'मी उतारु आहे!' 'मला स्वाभिमानाने व योग्य रीतीने प्रवास करावयाचा हक्क आहे' हे लक्षात ठेवून क्रोधाचा आविर्भाव आणला पाहिजे व काम करून घेतलेच पाहिजे।

हिंदुस्थानातल्या लोकांना क्रोध येत नाही असे नाही, पण येतो तेव्हा तो वाजवीपेक्षा जास्त येतो व तोंडाच्या वल्गनेबरोबरच निघून जातो प्रवासात किंवा अन्यत्र हरठिकाणी असे अपमानाचे प्रसंग येतात त्या वेळी संतापाने डोके भडकू न देता, संतापातही शांति ठेवून झालेल्या धाग छि-कीचे परिमार्जन कसे होईल इकडे लक्ष दिले पाहिजे भांड्यात पाणी घालून ते खूप तापवले म्हणजे त्याची वाफ होते पण खालचा जाळ जर लगेच कमी केला तर पाणी थंड होण्यास उशीर लागत नाही। आमच्या रागाचा प्रकार या भांड्याप्रमाणे होतो। वाष्पयंत्रामध्ये वाफ सारखी उत्पन्न होत असते व ती पुरवून पुरवून तिजकडून काम करवून घेण्यात येते, हेच धोरण क्रोधाविषयी ठेवले पाहिजे अगदी थंडपणा व अगदी तीक्ष्ण भडकपण ही टाळून योग्य ठिकाणी आत्मसंरक्षणार्थ व हितार्थ रागावले हे पाहिजेच

रामकृष्ण परमहंसांनी विवेकानंदांना सांगितलेली एक प्रसिद्ध गोष्ट आहे तिचा सारांश असा एका अरण्यात एक मोठा भुजंग होता भगवान् नारदांची स्वारी त्या अरण्यात प्राप्त झाली असता त्या सर्पाने त्यांना दंश करण्याकरता पादस्पर्श केला पण लगेच त्याला उपरति झाली। तो मनुष्य वाणीने करुणा भाकू लागला नारद म्हणाले, "मी येईपर्यंत कुणाला दंश करू नकोस" सर्पाने ती आज्ञा शिरसावंद्य केली आणि दंश करणे व त्यावरोबर फूत्कार करणे हेही सोडून दिले सर्पाच्या फूत्कारामुळे व दंशाच्या दरान्यामुळे त्या वनात पूर्वी कोणी फिरकत नसे, पण सर्पाने वरील दोन्ही गोष्टी सोडल्यावरोबर गोवारी मुले त्या वनात निर्भयतेने संचार करू लागली व काही तर निर्भयपणे त्याच्या जवळहि गेली काही वात्रटांनी आपल्या काठ्यांनी त्या सर्पाला डिवचले व ठासलेहि! एका दोघांनी हे केल्यावर त्याचे अनुकरण इतरांनी केले त्यामुळे सर्पाची पंचप्राणावर बेतली नारद ऋषी पुन्हा आले व त्यांनी आपला

शिष्य आसन्न-मरण झालेला पाहून 'अरे तुला काय झाले!' असे विचारले तो वनभुजग म्हणाला महाराज! काही चाल नाही पण आपली आज्ञा पाळल्यामुळें मी अधमेला झाला आहे' नारद म्हणाले, 'अरे! तूं सगदीच बअकली दिसतोस! तुला मी डसू नको असे म्हटले खरं! पण तुला मारावयाला कोणी आला तर फूत्कारहि करूं नकोस असे म्हटले होते काय?' भुजग म्हणाला ठीक आहे तसेच करतो दुसरे दिवशी नित्याप्रमाणे गोवारी मुलं व इतर लोक सर्पाला डिवचण्यास व ढासण्यास आले! पण त्या भुजगाने एकदम फूत्कार टाकून फणा उभारल्या बरोबर सर्वांची दाणादाण झाली तात्पर्य हेच की फूत्काराप्रमाणे आत्म सरक्षणार्थ क्रोधविकाराची जरूरी आहे त्यातील तारतम्य सोडले तर सर्पाप्रमाणे मरण्याचा प्रसग येईल

योग्य ठिकाणी जसे रागावलेच पाहिजे तसेच भलत्या ठिकाणी रागाला दाबलेच पाहिजे भारतीय युद्धप्रसगीं दोही पक्षातले वीर युद्ध थांबल्यानतर रात्री एकमेकाचा परामर्श घेत व शातपणे गप्पागोष्टी करीत पण युद्धाचा दुदुभी गजू लागल्यानतर सर्वांची शातता उडून जाई व सर्वांना वीरश्रीचे स्फुरण चढे भीष्म व अर्जुन हे एकमेकासमोर युद्धाला उभे राहिले व दातओठ खाऊन एकमेकावर शस्त्रप्रहार करूं लागले भीष्माचे शातनव असे एक नाव होते पण त्या नावातील वृत्ति युद्धाच्या ठिकाणी दिसेल काय? मोरोपत म्हणतात —

भीष्म म्हणे नर दावा पार्थ म्हणे तेवि शातनव दावा।
अयत्र शात परि ते कोणीहि रणात शात न वदावा॥

रणागणात आलेले वीर हे अयत्र शात असतील क्षमाशील असतील पण रणात युद्धाला उभे राहिल्यावर शातता राहील काय? शाततेने युद्ध होईल काय?

हिंदु समाजामध्ये शिवाशिव व विटाळ याचे वेड फार मोठें आहे आजच्या काळात एखादा पूर्वास्पृश्य जवळून गेल्यास व चुकून स्पर्शहि झाल्यास 'ए! म्हारड्या!' असे म्हणून त्याजवर रागावणे योग्य होईल काय? स्पर्शदोषास्तव या वर्गावर रागावणे आता अयोग्य नाही काय?

पुष्कळ वेळा मनुष्याच्या हातून संतापाच्या भरात वाईट गोष्टी घडतात म्हणून राग आला तर "सहसा विदधीत न क्रियाम्!" एकदम कोणतीहि गोष्ट करू नये असे म्हणतात ते खरे आहे राग आला की दहा अंक मोजा असं म्हणतात, याचा अर्थहि थोडा दम धर, विचार कर असाच आहे कामक्रोधादि विकार हे मनुष्यामध्ये उपजतच आहेत, त्यांना भलतीकडे न जाऊ देता त्याचे दमन केल्यास त्याचा मित्रासारखा उपयोग होतो व तसं न केल्यास ते शत्रु होतात, हे वाचकाच्या ध्यानी येईल

आता लोभ, मोहादि अवशिष्ट विकाराचा विचार करू— •

' तीर्थप्रसादं नेप-ग्रहणीं । लोभ अपार असावा ॥ —मुक्तेश्वर

परमेश्वराच्या तीर्थप्रसादाचा लोभ असावा, या वाक्याचा जरा व्यापक दृष्टीने विचार केल्यास विद्येचा, शीलाचा, सत्कर्माचा, व सदुद्योगाचाहि लोभ• असावा हे कोणीहि मान्य करील 'लोभमूलानि पापानि' व 'अति तृष्णा न कर्तव्या' ही दोन्ही टोकं सोडून सामान्य सात्त्विक लोभ व तो सात्त्विक विषयाबद्दल असावयासच पाहिजे लोभ म्हणजे प्राप्त झालेल्या विषयाच्या संरक्षणाची बुद्धि ही बुद्धि असल्यावाचून ममत्व उत्पन्न होत नाही व ममत्वाशिवाय संरक्षण नाही मुलाचं संगोपन, संवर्धन हे ममत्वानेच होते आज जगात जें सौंदर्य आलेले आहे ते ममत्वामुळेंच आलेलं आहे ममत्वामुळें आसक्ति उत्पन्न होते व आसक्तीमुळंच मनुष्य एखाद्या ध्येयाबद्दल जिवापाड मेहनत करतो तात्पर्य, संरक्षणाकरिता व संवर्धनाकरिता लोभ अत्यावश्यक असला तरी त्याचा अतिरेक झाला म्हणजे दु:खाशिवाय कांहीं फलप्राप्ति होत नाही 'अति तेथें माती' ही म्हण प्रसिद्धच आहे

अतिलोभ कसा वाईट असतो हे स्पष्ट कळण्याकरिता एकदोन उदाहरणे येथे देतो प्रत्येक घरोघरी सासवासुनांचे संबंध जे बिघडतात त्याचे कारण बव्हंशी सासूची अधिकारलालसा हेच असते कुणालाहि आपल्या हातातील अधिकार देण्याचे जिवावर येत सासूला असे वाटते की, सून कितीहि मोठी झाली, जाणती झाली, कर्ती झाली, तरी तिने अगदी आपल्या शब्दाबाहेर जाता कामा नये सुनेला असं वाटते की, हा संसार माझा आहे, पोरेबाळें माझीच आहेत, यासर्वांचे संगोपन करण्याची

योयथा वर्तते यस्मिन् तस्मिनेवं प्रवर्तयन् ।
नाऽधर्मं समवाप्नोति न चाश्रेयश्च विंदति ॥—भारत

व्यवहारांत शेरास सव्वाशेर किंवा ठकास महाठक भेटला पाहिजे असेंच आपण म्हणतों. दुर्जनाशी जर आपण सौम्यपणानें वागलो व सौजन्य दाखवलें तर त्याचा दुरुपयोग होतो मोरोपंत म्हणतात.—

म्हणती क्षमितां दुर्बळ न क्षमितां करिति दुर्जन प्रणति ।

दुर्जनाला क्षमा केली तर तो समर्थाला दुर्बल समजतो, व क्षमा न करता जोर दिला तर लोटांगणे घालूं लागतो! पृथ्विराज चव्हाण व महंमद घोरी यांच्यामध्ये जी इतिहासप्रसिद्ध युद्धें झाली त्या वेळी पृथ्विराज हा जशास तसें न वागल्यामुळें अगाच मृत्यु पावला! पहिल्या दोन तीन युद्धांमध्ये महंमद घोरी हा पृथ्विराजाच्या हातांत सांपडला होता. त्या वेळी त्या धूर्तानें पृथ्विराजाजवळ दयेची याचना केली व आपली सुटका करुन घेतली! पण शेवटच्या युद्धांत जेव्हां पृथ्विराजच त्याच्या तावडीत सांपडला, तेव्हां त्यानें पृथ्विराजाची दया माया न करितां त्याचा (काफराचा) वध करुन आपल्या कृतघ्नतेचें प्रदर्शन केलें! दुष्ट दुर्जनाशी सरळपणानें वागल्यानें उपायापेक्षां अपायच होत असतो असा हा इतिहासाचा व व्यवहाराचाहि अनुभव आहे.

प्रत्यक्ष भगवंतांनीसुद्धां गीतेमध्यें,

ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।

म्हणजे मला जे भक्त ज्या भावानें शरण येत असतात. त्याच भावानें मी त्यांच्याशी वागतों, किंवा अनुग्रह करतों, असें म्हटलें आहे. परमेश्वर अवतार धारण करून वेळोवेळी दुष्टदंडण व सुष्टरक्षण करीत असतो. दुष्ट दुर्जनांचीं जी अघोर कृत्यें घडलेली असतात त्यांचें फल देण्याकरितां दुष्टांना शिक्षाच करावी लागते आणि सज्जनांनीं जी सत्कृत्यें केलेली असतात त्याचीं फलें ईश्वर सज्जनांना दैवी संपत्तीच्या रुपानें देतो.* दैवी–संपत्ति ही मोक्षाला साधक व आसुरी संपत्ति ही मोक्षाला बाधक असते. दुष्टांच्या वाटयास आसुरी संपत्ति, नरक व तापत्रय ही येतात. आणि सज्जनांच्या वाटयास दैवी संपत्ति, स्वर्ग व सुख ही येतात.

* टीप—ईश्वरविषयक विवेचन आमच्या गीता–प्रदीपांतील ज्ञान प्रदीपांत पाहा.

ईश्वराला दुष्टदंडण व सुष्टसंरक्षण हीं कर्में करावीं लागतात. वर ( वैषम्यनैर्घृण्ये न सापेक्षत्वात् । –ब्रह्मसूत्र. ) वैषम्य व नैर्घृण्य दोष येत नाहीत. ईश्वराला जर जगांत जशास तसें (कर्माप्रमाणें फलें देणें) वागावें लागतें तर त्याचेंच अनुकरण व्यावहारिक माणसानें करावयास नको काय ? तुकाराम महाराजांसारखे सर्वाभूतीं भगवद्भाव पाहणारे सत्पुरुष सुद्धां जशास तसें वागण्याचाच उपदेश करतात.

सर्प विंचू नारायण । परि ते वंदावे दुरून ॥

सर्प, विंचू हे सर्व नारायण समजून जर त्यांच्याजवळ जाऊन आपण त्यांना वंदन केलें तर सर्प, विंचू हे दंश केल्याशिवाय कधीहि राहणार नाहींत. पोपट पाहिल्याबरोबर त्याला बाळगण्याची इच्छा होते, पण विंचू पाहिल्याबरोबर आपलें पादत्राणाकडे लक्ष जातें, यांत कुणाचाच दोष नाहीं. अधमाशीं अधम–अनिच्छेनें कां होईना– व्हावें लागतें. विश्वामध्यें विश्वंभर असला तरी परपीडक मनुष्य हा आमचा वैरी आहे असें तुकारामच म्हणतात.

परपीडक तो आम्हां दावेदार। विश्वीं विश्वंभर म्हणवुनी ॥
तुका म्हणे सर्वाभूतीं नारायण। अवगुणीं दंडण गुणीं पूजा ॥

म्हणजे सर्वाभूतीं नारायण असला तरी अवगुणी व अन्यायी दुर्जनांची पूजा करणें अयोग्य होय. जेथें गुण असतील तेथें पूजा (गुणाः पूजास्थान) व जेथें अवगुण असतील तेथें दंडण, हाच सिद्धांत बरोबर आहे. पायाला नारू झाला तर तो कापूर बांधून जाईल काय ? पूजा करीत असतां देव्हाऱ्यावर विंचू आला तर त्याच्यावर गंधपुष्प घालावयाचें कीं काय ?

पाया झाला नारु। तेथें बांधिला कापूरु ॥
तेथें विभव्याचें काम। अधमाशीं तो अधम ।
देव्हाऱ्यावरी विंचू आला। देवपूजा नावडे त्याला ।
तेथें पैंजाऱ्याचें काम। अधमाशीं तो अधम ।

निसर्गाचा स्वभावसुद्धां कसा आहे हे पाहा ! या धरणीमातेवर आपण जेवढ्या जोरानें आघात करूं तेवढ्याच जोरानें उलट प्रत्याघात होत असतो. ध्वनीचा सुद्धां हाच नियम आहे. एखाद्या खोल व शांत जागीं जाऊन मोठ्यानें ध्वनी केल्यास लगेच तेथें प्रतिध्वनीहि तितक्याच मोठ्या प्रमाणांत

र्स ता र अहोरा पा हा वरील प्रतिक्रिया आपण व्यवहारात पाहतो म्हणून मद हा जो विकार आहे त्याचा उपयोग दुर्जनाशी वागताना तसे वर्तन करण्याकडे निश्चय केला पाहिजे त्यात अधर्म नाही। श्रीसमर्थ म्हणतात —

हुड्यास हुडा लावून द्यावा । टोणप्यास टोणपा आणावा ॥
लाठास पुढें उभा करावा । दुसरा लाठ ।
धटासि आणावा धट । उद्धटासी पाहिजे उद्धट ॥
खटनटासी खटनट । अगत्य करी ॥

समर्थाच्या वरील वचनाप्रमाणे हाच सिद्धांत व. जगास तसे भेटल्या वाचून गत्यंतर नाही समजा, एखादा लुच्चा चोर मनुष्य आपल्याकडे आला व चार दिवस अगदी सभ्यपणाचे वर्तन करून पुढें आपल्या द्रव्याची चौकशी करू लागला, अशा वेळी सत्यप्रतिज्ञ माणसांनी त्या चोराला आपले द्रव्य किती आहे, कोठे आहे हे सांगावे काय? एखादा कसाई पळून गेलेल्या गाईचा शोध करीत जर आपल्याकडे आला व 'इकडे गाय गेली का हो?' असे विचारू लागला तर खरे बोलावे काय? भगवान् मनु अशा ठिकाणी काही बोलू नये, नुसते हूं! हूं! करावे असे सांगतो

जानन्नपि हि मेधावी जडवल्लोक आचरेत् ॥

चोराच्या हातीं एखादा मनुष्य सापडला तर त्याची सुटका करण्या करिता पाहिजे त्या थापा द्याव्यात असे महाभारतात म्हटले आहे सत्य बोलण्याचा नियम हा दुसऱ्या सत्यवादी मनुष्याशीच जेव्हा प्रसंग असेल तेव्हा योग्य आहे पण लबाडाशी प्रसंग असेल तेव्हा सापेक्ष वर्तनच करावयास पाहिजे

हिंसा करू नये हे तत्त्व अहिंसक समाजात योग्य आहे परंतु जेथें हिंसकांचाच बाजार भरला आहे, व जेथे आततायीपणाला महत्त्व आले आहे, तेथें अहिंसेचा नियम कसा चालेल? विष देणारा, घर पेटवणारा शस्त्र घेऊन मारण्यास येणारा घर स्त्री व वित्त लुबाडणारा आततायी जर चालून आला तर

आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन् ॥—महाभारत

केवळ प्रतिकार न करता वध करावा याच शास्त्राचा अवलंब केला पाहिजे

दुर्जनाशी वागताना मद व मत्सर या दोन्ही वृत्ति अवश्य आहेत मत्सर, स्पर्धा, ईर्ष्या, असूया इत्यादि वृत्ति समाजाच्या धारण पोषणाला अनवश्यक आहेत असे म्हणता येणार नाही तारतम्याने योग्य उपयोग करून घेतला पाहिजे, हेच या विषयाचे सार आहे

प्रस्तुत विषयाशी संबद्ध असा नवीन प्रसिद्ध शब्दप्रयोग आपणापुढे आहे त्याचा विचार करून हे प्रकरण संपविता

'अनत्याचार' हा शब्द आज सर्व प्रसिद्धच आहे अनत्याचार म्हणजे अत्याचाराचा अभाव व अत्याचार म्हणजे अति-आचार जास्त आचार (वागणूक) असा अर्थ आहे आचार म्हणजे वर्तन किंवा वागणूक, अनाचार म्हणजे आचाराचा अभाव अर्थात् मालिन्य असे म्हणता येईल.

अनाचारस्तु मालिन्यं । अत्याचारस्तु मूर्खता ॥

ही अगदी दोन टोके आहेत ही सोडून मनुष्याने योग्याचार म्हणजे जसास तसे वागावे समजा शरीराला काही रोग जडला आहे त्याकडे अगदी दुर्लक्ष करणे हा अनाचार होय व व्याधिग्रस्त शरीर ठेवून काय करावयाचे अशा विचाराने आत्महत्या करावयास सिद्ध होणे म्हणजे अत्याचार होय वास्तव जपून पथ्याने वागणे व काही तरी औषधोपचार करीत ईश्वरावर भरवसा ठेवून राहणे हाच योग्याचार होय आत्महत्या करणे हा अत्याचारच आहे असे वर म्हटलेच आहे परंतु या ठिकाणी अनत्याचारी वर्तणूक केल्यास म्हणजे आत्महत्या न केल्यास योग्य वर्तन झाले असे मात्र नव्हे अनत्याचार म्हणजे अत्याचाराचा अभाव हा शास्त्रीय अर्थ झाला. परंतु त्या अभावातून योग्याचाराचा भाव उत्पन्न होत नाही लहान मुलाशी ममतेने वागणे हा योग्याचार होय. मुलाने अति खोड्या केल्या किंवा कसला तरी त्रासदायक हट्ट धरिला तर त्याला दटावणे, चूप बैस म्हणणे हा अत्याचार नव्हे मुलाने काही केले तरी सहन करणे हा अनाचारच ठरेल देवाच्या नैवेद्याकरिता ठेवलेला गूळ मुलाने नैवेद्याआधी खाल्ला म्हणून दोन थपडा देणे हा अत्याचार होय पण मुलगा गूळ चोरून खाऊ लागला व खोटे बोलू लागला तर दोन थपडा देणे हा अत्याचार ठरत नाहीं उलट तसे न करणें हाच अनाचार ठरेल

पाय किंवा हात मुरगळला किंवा अंगावर पडून शरीर ठेचले गेले तर

तेथील ठणक कमी व्हावी म्हणून विंचा घातला तर तो उतत नाही जेथें दु:ख असेल त्या अवयवावर विंचा घालणें हा अत्याचार नव्हे, कारण तेथें तो उतत नाही पण शरीराच्या ज्या भागाला कसलेंच दु:ख झालेलें नाही तेथें विंचा घालणें हा अत्याचार होय।

विंचा घालून तो उतला की अत्याचार म्हणता येईल आणि न उतला तर योग्याचारच म्हटला पाहिजे. अत्याचार व अनत्याचार या शब्दांची अशी मीमांसा आहे अनत्याचार म्हणजे अप्रतिकार असा अर्थ हल्ली रूढ होऊं लागला आहे, पण तो व्यवहार्य नाही

सहनं सर्वदु:खाना अप्रतिकारपूर्वकम्।

हे तितिक्षेचें लक्षण मुमुक्षूला व संन्याशाला श्रीमत् आचार्यांनी सांगितलेलें आहे पण मुमुक्षूपेक्षा जे अन्य लोक आहेत त्याना हे तितिक्षेचें शिक्षण काय कामाचें? त्याना प्रतिकारक्षमताच पाहिजे

अत्याचार म्हणजे वाजवीपेक्षा अधिक आचार करूं नये हे बरोबर होईल, पण योग्याचार ऊर्फ योग्य प्रतिकार करूं नये हे तत्त्व कुठलें? हिंसा म्हणजे मारणें, ठार करणें असे लोक समजतात अहिंसा म्हणजे ठार न करणें हा अर्थ ठीक आहे दुष्ट अंगावर चालून आल्यावर त्याची हिंसा करूं नये म्हणजे त्याला ठार मारूं नये हें क्षणभर मान्य केलें तरी जीव न जाईल अशा बेतानें त्याला यथेच्छ चोपणें हा आचार हिंसेमध्यें येईल काय? व तो अत्याचार होईल काय? पाण्यात बुडणें हा अत्याचार ठरला तर पाण्यात पाऊलहि न टाकणें हा अनाचार ठरेल पण पाण्यात प्रवेश करून न बुडता तरणें म्हणजे पोहणें हा योग्याचार नव्हे काय?

अहिंसा शब्दाचा खोल अर्थ पाहिला तर शरीरानें, मनानें, वाणीनें कशानेंहि हिंसा न करणें, कोणाचेंहि वाईट न चिंतणें, कुणाबद्दलहि कुशब्द न बोलणें इतका तो व्यापक आहे हा वेदान्तशास्त्रातील अर्थ पवन ज्ञान्यांना व संन्याशाना लागू होण्याजोगा आहे अहिंसा धारण करणें किंवा अहिंसा वृत्ति ठेवणें म्हणजे अप्रतिकारी बनणें असे मात्र नव्हे प्रतिकारामध्यें संरक्षण आहे शरीर हें प्रतिकारक्षम असलें तर निरनिराळ्या ऋतूंतील हवा-

मताचे आघात ते सहन करते. म्हणजे आधी प्रतिकार व मागून सहनशीलता असा क्रम लागतो समाजाचें किंवा राष्ट्राचे संरक्षण हे प्रतिकारानेच होतें. नि शस्त्र राष्ट्राने अगतिक म्हणून नि शस्त्र प्रतिकार (Passive Resistance) केला पाहिजे पण हा आपत्धर्म आहे कोणतेहि राष्ट्र जर सदैव नि शस्त्र प्रतिकारीच राहील तर त्या राष्ट्रातील लोकांनी सन्यासच घेतला पाहिजे वाघाच्या शिकारीची तयारी करावी तेव्हा ससा सापडतो असे म्हणतात या म्हणीप्रमाणे समाजाने जयिष्णु वृत्तीच धरावयास पाहिजे. चढाई नाही तर नाही, निदान प्रतिकारक्षमता तरी त्यामध्यें अवश्य पाहिजे. तात्पर्य, अप्रतिकार हा अनाचार होईल की काय याचा विचार केला पाहिजे.

कामक्रोधादि विकाराचा तारतम्याने उपयोग केल्यास ते रिपु नसून मित्रच आहेत. देहधारीला त्याचा सर्वथैव त्याग अशक्य आहे वास्तव 'तस्मात् एतत्त्रय त्यजेत्' या पाठाऐवजी 'तस्मात् एतत्त्रय जयेत्' हा पाठ असावा की काय? असा सशय येतो श्रीकृष्णानें कर्मयोग शास्त्राची गीतेमध्यें जी चिकित्सा केलेली आहे त्या चिकित्सेला वरील पाठच पोषक आहे.

---

प्रकरण १६ वें.

# ईश्वरप्राप्तीचा राजमार्ग

जगातील सर्व धर्मामध्यें ईश्वराच्या भक्तीची कल्पना या ना त्या स्वरूपात आहे व ती असण्याचें कारण प्रत्येक धर्मांत ईश्वरविषयक काही कल्पना आहेत हे होय! मनुष्य समाजाच्या निरनिराळ्या अवस्था दिसतात कोणत्याहि अवस्थेमध्यें मनुष्याचे लक्ष सहज निसर्गाकडेच वेधते विजाचा लखलखाट, पावसाचे काळेकुट्ट ढग, मुसळधार पाऊस, सूर्यचंद्राचे उदयास्त असा या निसर्गाच्या चमत्कारामुळें मनुष्याला प्रथम सहज असें वाटते कीं या सर्वांचा नियता कोणी तरी असला पाहिजे

तेथेंच एक सर्वनियामक शक्ति कल्पून तिच्या सवंधानें आदर व्यक्त करणें व आपणास त्रास न होईल या हेतूनें तिची करुणा भाकणें हें ओघानेंच येतें

कोणत्याहि काळीं मनुष्य हा सापेक्ष विचारच करतो. समाजाच्या प्राथमिक स्थितींत मनुष्यामध्यें जो धाडदाड, राकट, क्रूर व शरीरानें धिप्पाड असे तोच मोठा समजला जाई. तेव्हा मोठ्यांत मोठा जो मनुष्य त्याच्यापेक्षां किती तरी मोठा ईश्वर असला पाहिजे असा तर्क सहजच होई. म्हणून प्राथमिक स्थितीमध्यें ईश्वर हा भयंकर क्रूर आहे, तो जुलुमी आहे, तो रागीट आहे, तो फार मोठा आहे अशा समजुती होत्या. कारण त्या काळांत ' बळी तो कान पिळी ' असाच न्याय असे. तो न्याय मनुष्यानें देवावर लादला इतकेंच ! (अद्यापहि तो न्याय नाहीं असें नाहीं!) .

ऋग्वेद संहितेमध्यें केवळ स्तुतिपर अशीं अनेक सूक्तें आहेत. इंद्र, वरुण, मातरिश्वा, सविता, सूर्य इत्यादि देवतांपुढें त्या सूक्तकर्त्यांनीं सारखी करुणा भाकलेली आहे. हे देव हो, "तुम्ही असुरांचा नाश करा, आमच्या गायी, बैल व पशु हे ते पळवितात त्यांना अडथळा करा, हिमप्रलय व जळप्रलय असा आपत्ति आमचेवर आणू नका." अशा प्रकारच्या प्रार्थना वेदमंत्रांत आहेत. वेदकालीन भक्ति म्हणजे यज्ञयाग होत. अग्नि हा सर्व देवांचें मुख, तेव्हां अग्नि पेटवून तेथें सर्व देवांना बोलावून त्यांना कांहीं हविर्भाग देऊन तुष्ट करणें, एवढाच भक्तीचा मार्ग त्या काळीं होता. इतर धर्मांतहि ईश्वरानें आपल्यास त्रास देऊं नये, आपल्या शत्रूचा संहार करावा म्हणून अत्यंत प्रिय पदार्थ त्याला अर्पण करण्याची व बळि देण्याची चालहि पडलेली आहे.

आपल्याकडील मीमांसक हे मंत्रमय देवता मानतात. देव हे आकृति विशेषानें म्हणजे सगुण विग्रहानें युक्त असतात, असे मीमांसक ग्रंथावरून ठरवितात. आदित्य मंडळांत तेज आहे, वायुमंडळांत शक्ति आहे, या वैदिक प्रयोगावरून मीमांसकांनीं त्या देवता शरीरधारी असाव्यात असें कल्पिलेलें आहे. पण त्याउलट इंद्र हा शब्द व्यक्तिवाचक नसून अधिकारवाचक आहे असें वेद ती समजतात. इंद्र म्हणजे स्थानविशेषाच्या निमित्तामुळें असलेला एक अधिकारी होय! त्या स्थानावर जोंवर तो अधिकारी आहे तोंवरच तो इंद्र! स्थानभ्रष्ट झाल्यावर इंद्र नव्हे. उदाहरणार्थ, सेनापति

हा शब्द जसा अधिकारवाचक आहे तसाच इद्र शब्दहि आहे (शाकर भाष्य १-२-२८)

इद्रो नाम कश्चित् विग्रहवान् देवता विशेष असे मीमासकाचे म्हणणे इद्र ही पळाची देवता आहे अपाचा अधिपति म्हणजे वरुण होय, परमात्मा म्हणजे वैश्वानर होय, जठराग्नि म्हणजे विश्वात्मा होय, इत्यादि देवताविषयक मीमासकाचे विचार पाहिले म्हणजे असे दिसते की त्याना या निसर्गाच्या शक्तीचे यथातथ्य आकलन झालेले नव्हते (त्या शक्तीचे आकलन अद्यापि जगात कोणाला झाले आहे असे नाही) तथापि काही शक्ति आहेत असे त्यानी ठरविले व त्याची कृपा व्हावी म्हणून यज्ञयागादि कृत्याचा त्यानी पुरस्कार केला

ईश्वर हा कारुणामय आहे, दयाघन आहे, तो दीनोद्धारक आहे या कल्पना मनुष्यसमाजाच्या वाढीबरोबरच आलेल्या दिसतात मनुष्य समाजाची रानटी अवस्था जाऊन त्याला जशी नागर अवस्था येत चालली तशा प्रेम, कारुण्य, वात्सल्य इत्यादि वृत्ति समाजात आल्या व इतर सुसस्कृतता आली अर्थात् त्या सर्व गुणाचा आरोप ईश्वरावर केला गेला व ईश्वराचे स्वरूप पूर्वापेक्षा बदलले गेले

ईश्वर निर्गुण मानावा ही कल्पना बऱ्याच उशीराने उद्भूत झाली त्यापूर्वी ईश्वर सगुणच आहे, तो मोठ्यात मोठा आहे, तो मनुष्यासारखा आहे, त्यालाहि हस्तादि अवयव, बुद्ध्यादि इद्रियें आहेत असे मानून तत्कालीन मनुष्य समाजातील जो मोठ्यात मोठा मनुष्य असे, त्याला अवतार मानण्यापर्यन्त कल्पनेचा विकास झाला मनुष्याना ईश्वर पाहिजे होता व तो आहे असे वाटत होते, पण तो त्याना दिसत नव्हता म्हणून राम व कृष्ण इत्यादि ऐतिहासिक वीर पुरुषाना अवतार मानण्यात आले महावीर जिन व शाक्यमुनि बौद्ध ही त्या कालातील मोठी माणसे, पण तेहि अवतार समजले गेले व त्या अवतारानी धर्मस्थापनाहि केली अवतारप्रणित धर्म, प्रेषितकथित धर्म हे यामुळेच पुढे उदयास आले, त्यापूर्वी फक्त ईश्वरप्रणित धर्म म्हणजे वैदिक धर्मच होता

निसर्गाचे व्यापार सुसबद्धपणे चालविणारी एक शक्ति आहे, ती मनुष्यरूपाने कधीकधी येते, एवढी कल्पना समाजाने बळकट धरल्यानतर

स्वाभाविकच ईश्वराच्या सगुणत्वाची कल्पना पसंत पडू लागली. या सगुण कल्पनेतूनच मूर्तिपूजा निघाली. मूर्तिपूजेचा अतिरेक मध्ययुगांत हिंदुस्थानांतच झाला असें नसून तो त्या काली सर्वत्र झालेला होता म्हणूनच क्रियेला *प्रतिक्रिया या न्यायाने मूर्तींच्या विध्वंसाचा सपाटा चालविला गेला.* ईश्वर सगुण आहे, पण दिसत नाही. मग सोयीचा देव म्हणजे काष्ठ, धातु व पाषाण यांच्या प्रतिमा पूजणें हा होय ! सगुण कल्पनेमुळेंच नवविधा भक्ति आली व मध्य कालामध्यें देव, देवळें, मूर्ति, पूजा, अर्चा यांची मोठी गर्दी उडाली. ईश्वराला सगुण मानणें हें समाजाला प्रथम सोयीचें वाटलें. पण पुढें त्यामुळें ईश्वरहि अनेक होऊं लागले, त्याची स्वरूपेंहि भिन्नभिन्न होऊं लागलीं त्याप्रमाणें अनेक सांप्रदाय उत्पन्न झाले व सांप्रदायांतील विग्रहामुळें देवाच्या नांवावर समाजांत फारच अस्वस्थता माजली !

सामान्य माणसांना ईश्वर सगुण आहे असें मानणें सोयीचें वाटलें. पण बुद्धिमंतांना ईश्वराच्या सगुणत्वांतील दोष उपनिषद्कालीच दिसूं लागले. ईश्वर हा सगुण मानला तर तो लहानांत लहान मानावा कीं मोठ्यांत मोठा मानावा ? त्याचे अवयव मनुष्याइतकेच मानावेत कीं अधिक मानावेत, अशाहि शंका आल्या असतीलच. शेवटीं या बुद्धिमंतांना ईश्वर निर्गुण आहे, निराकार आहे, तो सर्वत्र आहे, सारखा आहे, सम आहे असें सांगणें हेंच सयुक्तिक वाटलें. तात्पर्य, ईश्वराच्या कल्पनेचा उदय मनुष्यबुद्धींतूनच झाला, प्रथम तो क्रूर व जुलुमी होता. नंतर तो करुणाघन झाला. प्रथम तो सगुण असल्यामुळें अवताररूपानें येत असे पण पुढें वेदांत्यांनी ईश्वराला निर्गुण निराकार ठरविलें असा हा येथवर केलेल्या विवेचनाचा निष्कर्ष आहे.

वेदकालांतील भक्तीचा प्रकार यज्ञ हा होता, पुढें तो बदलला व *त्याच्या ठिकाणी देव, देवळें व मूर्ति येऊन त्यांची भक्ति सुरूं झाली.* म्हणजे मंत्रकाल व तंत्रकाल या कालांतील ईश्वरप्राप्तीचे हे मार्ग होते. आतां या यंत्रकालांत तेच मार्ग चोखाळावयाचे कीं परिस्थितिसापेक्ष भक्तीचा नवा सांप्रदाय सुरूं करावयाचा असा आपणापुढें प्रश्न आहे.

कोणत्याहि कालीं जशी भूक उत्पन्न होते त्याप्रमाणें विचाररूपी अन्नाचा पुरवठा केला जातो, परंतु एकच अन्न कोणत्याहि कालीं पुष्टि देतें

असे मात्र नव्हे तोच न्याय येथेंहि आहे यज्ञयागादिकांनी एका काळी फार मोठें काम केले पण आज ते यज्ञ तितके उपयोगी वाटत नाहीत मूर्ति व देवळें यानीहि आपल्या काली मोठें काम केले पण यज्ञमार्गाप्रमाणे हाहि मार्ग आज उपयोगी नाहीं यज्ञातील दोष, यज्ञातील हत्या, यज्ञातील अपूर्व ही जशी बुद्धीला पटत नाहीत त्याचप्रमाणे दगडात देव आहे, तो सर्व समर्थ आहे, तो पाहिजे ते करतो, हेंहि सर्व झूट आहे असें इतिहासानें आता सिद्ध केलें आहे. जागृत स्थानातील हजारो मूर्तीचे विध्वंस झाले, त्या वेळी एकाहि मूर्तीने सामर्थ्य अगर चमत्कार दाखविला नाही, उलट ते सर्व देव विध्वंसकाना शरण गेले यावरुन दगडात देव नाही म्हणजे सामर्थ्य नाही, मूर्तीमध्यें अद्‌भुतपणा नाही हे अनुभवास आले कोणाचे तरी नाव घ्यावयास पाहिजे व काही तरी पूजिले पाहिजे असा जो मनुष्याचा स्वभाव तद-नुरुप त्या काळी त योग्य होत, पण आज मात्र हा मार्ग उपयुक्त नाही हे खास !

अवतारावद्दलहि पुष्कळ विचारातीं व शोधाअती असं वाटू लागले की हा अवतार एकटा काही करू शकत नाही या अवताराची पार्श्व-भूमिका लक्षात घेतली तर असे दिसत की पुष्कळ सामान्य माणसाचे श्रम अवतारकार्यास सहाय्यभूत झाले म्हणूनच त्यानी ती मोठी कार्यें केलीं श्रीशिवाजी महाराज यांच्या सखधाच्या सशोधनावरून तत्कालीन परि-स्थितीचे जें ज्ञान होते व त्यावरून त्या कालातील लोकाची जी मन स्थिति, उत्कटता व त्यागादि वृत्ति दिसून येते ती पाहिली म्हणजे शिवछत्रपती-प्रमाणेच इतर सामान्य माणसाच्या कर्तृत्वाबद्दलहि आदर उत्पन्न होतो ही सर्व घटना घडविणारे जर हे सामान्य लोक नसते तर शिवछत्रपतीना अपेशच आले असत अस निश्चित वाटत याप्रमाणेच राम, कृष्ण, महावीर, बुद्ध इत्यादि अवताराच्या पार्श्वभूमिकेचा शोध केला तर हेच दिसेल की हे अवतारी पुरुष तत्कालीन समाजात मोठे होते खरे, पण त्याच्या कार्याला इतर पुष्कळाच्या श्रमाचे साह्य झाले आहे, यात शका नाही एवच यज्ञ, अवतारपूजा, विभूतिपूजा व मूर्तिपूजा हे सर्व ईश्वरप्राप्तीचे प्रयोग आज झाले त्या प्रयोगानी आपापल्या कालात अरात कार्य केले प्रस्तुत

कालाला उचित असा ईश्वरसबंधी मार्ग शोधलाच पाहिजे म्हणून प्रचलित स्थितीचा थोडा विचार करू

सांप्रत सांख्य, योग, भक्ति, कर्म, ज्ञान असे ईश्वराच्या प्राप्तीचे निरनिराळे मार्ग समजले जातात सांख्यशास्त्र हे हल्ली शिल्लक राहिले नसून पातंजल योगशास्त्राचे अभ्यासीहि क्वचितच आढळतात अर्थात् कर्ममार्ग, ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग हेच ईश्वराच्या प्राप्तीचे उपाय म्हणून शिल्लक राहातात त्यातल्या त्यात आजच्या या कालात भक्तिमार्ग हा एकच ईश्वरप्राप्तीचा राजमार्ग म्हणून प्रसिद्ध आहे

आजपर्यंत मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यानी पुष्कळ यत्न करून पूर्णपणे न सोडविलेला असा जर कोणता वादग्रस्त प्रश्न असेल तर तो ईश्वराच्या अस्तित्वाचा होय! ईश्वर आहे असे मानणारे ते आस्तिक व तो नाही असे मानणारे ते नास्तिक अशी समजूत आहे यासबंधाने मोठमोठे ग्रंथ झाले असून ते आस्तिकदर्शन व नास्तिकदर्शनें या नावानी प्रसिद्ध आहेत प्रत्येक दर्शनामध्यें सेश्वरवादी व निरीश्वरवादी असे भेद असून मीमांसक तर पक्के निरीश्वरवादी दिसतात सांख्यामध्येहि निरीश्वर सांख्य आहेत तात्पर्य, आज जशी सुसस्कृत व विचारी माणसामध्ये ईश्वराबद्दल दोन मतें दिसतात तशीच ती प्राचीन काळीहि होती आस्तिकाचा वर्ग जसा जुना आहे तसाच नास्तिकाचाहि जुना आहे अर्थात् आजच लोक फार नास्तिक होऊं लागले व धर्म बुडत चालला अशी जी हाकाटी ऐकू येत, ती व्यर्थ होय! ईश्वराची सिद्धि प्रत्यक्ष जोवर करता येत नाही तोवर आस्तिक व नास्तिक हे भेद राहाणे अपरिहार्य आहे

ईश्वर एक आहे का ते अनेक आहेत असाहि एक प्रश्न आहे ईश्वर अनेक मानणें हे फार गैरसोयीचे आहे कारण अनेक ईश्वर मानल्यास त्या मध्ये अधिकाराबद्दल परस्पर तटेबखेडे होणे संभवनीय आहे कारण एक ईश्वर दुसऱ्या ईश्वराच्या अधिकाराचे अतिक्रमण करूं लागल्यास त्यामुळें विग्रह उत्पन्न होईल आणि असे जर ईश्वरा-ईश्वरात सारखे तंटे अगर लढाया उत्पन्न झाल्या तर जगात अव्यवस्था व अनवस्था माजेल व जगात राहणाऱ्या लोकांना मुळींच सुख होणार नाही यास्तव ईश्वर एकच आहे असे मानणे योग्य आहे व तेच सयुक्तिक आहे

ईश्वर निर्गुण आहे वा सगुण आहे, याचा निश्चय अद्याप झालेला नाही ईश्वर जर निर्गुण, निराकार, निर्धाम, निरवयव, अचक्षुपाणि-पाद असा असल तर त्याची भक्ति कशी करावयाची हा मोठा प्रश्न आहे शिवहुना अशा ईश्वराची भक्ति मुळी अशक्यच आहे भक्ति करण्याला काही तरी सगुणता पाहिजे आणि त्या सगुणतेच्या ठिकाणी सत्यसंकल्प, सकलैश्वर्यसंपन्नता, दया, भक्तवात्सल्य, औदार्य, पावित्र्य, कारुण्य पूज्यता, सुन्दरता इत्यादि सर्व गुणांचा संग्रह असावयास पाहिजे ईश्वराचे असा प्रकारचे स्वरूप असल्याशिवाय त्याची भक्ति मुळीच होणे शक्य नाही तो अनादि, अनंत, सर्वकर्तृ, सर्वज्ञ, स्वतंत्र, पूर्णचैतन्यरूप असा आहे, एवढे म्हटल्यानेहि [कार्यभाग होत नाही मानवी बुद्धीला ईश्वराचे स्वरूप काही तरी आकलन होण्याजोगे असेल तरच तेथे भक्ति संभवते ज्या ठिकाणी बुद्धि चालतच नाही किंवा चालूनहि विषयाचा निश्चय करू शकत नाही, अशा ठिकाणी 'अचिंत्याः खलु ये भावा न तांस्तर्केण चिंतयेत्' हाच कोटि-क्रम बरोबर आहे

श्रीमत् शंकराचार्य यांचे परापूजा या नावाचे एक स्तोत्र आहे त्यात पुढील आशयाचे श्लोक आहेत

" जो पूर्ण आहे त्याचे आवाहन कसे करावयाचे ? जो सर्वाधार आहे त्याला आसन कोणते द्यावयाचे ? जो शुद्ध, स्वच्छ व निर्मल आहे त्याला अर्घ्य, आचमन व स्नान याची जरूरी तरी काय ? जो नित्य तृप्त आहे त्याला नैवेद्य कशाला दाखवावयाचा ? जो अनंत आहे, त्याला प्रद-क्षणा घालणे शक्य आहे काय ? जो स्वयंप्रकाश आहे, त्याला नीराजन का ओवाळावयाचे ? तात्पर्य, असा जो पूर्ण, परिपूर्ण, सर्वव्यापी व सर्वांत-र्यामी आहे, त्याची पूजाअर्चा किंवा इतर कसलीहि भक्ति केवळ चिंतना-वाचून मुळीच शक्य नाही "

ईश्वराच्या निर्गुण स्वरूपाने त्याची भक्ति होत नाही आणि माण-साचा स्वभाव तर असा की, ईश्वर म्हणून काही तरी मानून त्याची भक्ति करावयाची ' या स्वभावामुळे अनेक धर्मांत व अनेक पंथांत ईश्वराची सगुण स्वरूपे पाहिजे तितकी व पाहिजे तशी मानलेली आहेत कोणी आपल्या ईश्वराला आकाशात कायमचा बसवितो व 'आकाशातला बाप,

असे म्हणून त्याची प्रार्थना करतो कोणी आपल्या ईश्वराला सात समुद्रा पलीकडे क्षीरसमुद्रात झोपावयास सांगतो आणि जगात काही गडबड झाली तरच त्या देवाला उठावयाची आज्ञा देतो कुणाचा ईश्वर आठ वड्यातून एक दिवस विश्रांति घेतो तर कोणाचा ईश्वर एका विशिष्ट वेळी सर्वांच्या पापपुण्याचा झाडा घेतो ! कुणी ईश्वर हा मोठ्यात मोठा, अत्यंत कडक अमल गाजविणारा असे समजतो व त्याच्यापुढे दास व गुलाम वृत्तीने विनम्र होऊन त्याची करुणा भाकतो कोणी त्या ईश्वराला आपल्या-सारखाच मनुष्य समजून त्याच्याशी लडिवाळपणाने वागतो तत्त्वत व युक्तित ईश्वराला हे अशा प्रकारचे सगुण समजणे चुकीचेच असून अव्यक्त अशा परमेश्वराला व्यक्त म्हणजे सगुण मानणे हा मूर्खपणाच होय असे भगवान गीतेत म्हणतात

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यते मामबुद्धय ।
परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ।। अ ७ श्लो २४

' मी अव्यक्त असता मला मूर्ख लोक मनुष्यदेहधारी मानतात परंतु ' ते खरं नसून माझे अव्यक्त स्वरूपच सत्य होय ' असा या श्लोकाचा आशय आहे त्यावरून निर्गुण ईश्वराला सगुण मानणे अव्यक्ताला व्यक्त समजणे ज्याच्या ठिकाणी कोणताहि मनुष्यधर्म नाही त्याजवर त्या धर्माचा आरोप करणे हे सर्व वेडेपणाचे आहे यात संशय नाही

ईश्वराला सगुण समजणे हे कसे अज्ञान आहे हे श्रीज्ञानेश्वराच्याच शब्दात सांगतो–

नातरी ज्वरं विटाळले मुख । ते दुधाते म्हणे कडू विख ।
तेवि अमानुष मानुष । मानिती माते । ज्ञा अ. ९–१४२
पैं स्थूल दृष्टी देखती मातें । तेचि न देखणे जाण निरुते ।
जैसे स्वप्नीचेनि अमृते । अमर नोहिजे ।। ज्ञा अ. ९–१४४

श्रीज्ञानेश्वर म्हणतात की, रोगग्रस्त मनुष्य जसा दुधाला कडू समजतो तशीच अज्ञानी माणसे मला मनुष्यदेहधारी समजतात हे स्थूल दृष्टीचे लोक मला जसे समजतात तसा मी नाही

ईश्वराला सगुण समजणे हे जसे वेडेपणाचे आहे, तसेच अनेक देव मानून आज याची तर उद्या त्याची पूजा करणे आज याला भजणे तर उद्या

त्याला भजणे, हेहि खुळेपणाचे आहे. मनुष्य स्वतःच्या आवडीनिवडी, सोयीगैरसोयी आणि समजुतीप्रमाणे पाहिजे तसा नवा देव पत्करीत असतो श्रीज्ञानेश्वर म्हणतात आज तो नागोबाच्यापुढे उभा राहून ' जय नागोबा ' म्हणतो तर लगेच पुढच्या महिन्यात नागोबाला विसरून गणोबाकडे धाव घेतो, घरात एक मोठा देव ठेवला तरी त्याचे समाधान होत नाही पुन्हा देवशोधनार्थ व देवांच्या दर्शनार्थ तीर्थयात्रादि करावयास लागतो घरच्या देवावर स्वारी करण्याकरिता केव्हा केव्हा कुलदेवताहि येतात व त्या दिवशी त्यानाच मान मिळतो एकादशीचे दिवशी जेवढे महत्त्व विठोबाला असते, तेवढेच महत्त्व शिवरात्रीचे दिवशी शंकराला असते नवरात्रात जगदंबेचे महत्त्व तर मार्गशीर्षांत षष्टीचे महत्त्व असे समजून आराधना चालू होते आज रामजयंती तर श्रावणात कृष्णजयंती असे जयंत्यांचे उत्सव अनेक देवांच्या कल्पनेमुळेच उत्पन्न होतात।

हिंदुस्थानातील अगदी खालच्या थरातील देव मधल्या थरात नाहीत व मधल्या समाजातील देव वरच्या समाजात नाहीत हिंदूतील देव मुसलमानात नाहीत, मुसलमानातील देव खिश्चनात नाहीत व पारशाचे देव याहूनहि निराळेच आहेत हे सर्व देव साक्षात् ईश्वर समजण्यात येतात व या सर्व देवांचा उद्भवही ईश्वराच्या सगुण कल्पनेपासून झाला आहे तात्पर्य, ईश्वराला सगुण मानणे व त्याची अनेक स्वरूपे समजणे हे तत्त्वच मुळी सयुक्तिक नाही

## दगडाचे देव तारतात काय ?

हिंदु समाजाप्रमाणे इतर समाजातहि या ना त्या स्वरूपात ही मूर्तिपूजा आहे कोणी थडग्याला पूजितो, कोणी डोल्यांची पूजा करतो, तर कोणी क्रॉसलाहि भक्तिभावाने प्रणाम करतो या ज्या देवाच्या अस्तित्वाच्या खुणा म्हणून लोक समजत असतात, त्यात खरोखर काही सामर्थ्य आहे काय ? असा प्रश्न केल्यास त्याचे उत्तर नकारार्थीच द्यावे लागते ! **आजपर्यंत कोणत्याहि दगडाच्या, धातूच्या अगर काष्ठाच्या मूर्तीने दैवी सामर्थ्य कधीहि दाखविले नाही आणि तसे दाखविणे शक्य नाही.** मनुष्य आपल्या अज्ञानामुळे, फार तर भावनेमुळे, मशिदीत

अगर चर्चमध्यें देव आहे असें समजतो. तसेंच तो शाळिग्राम व नर्मदा गणपति या काळ्या व तांबड्या दगडांत बसलेला आहे असें समजतो व मोठ्या श्रद्धेने व भावनेने त्यांची पूजाअर्चा करूं लागतो, इतकेंच !

भाव तसा देव आणि मानला तर देव नाही तर धोंडा, या म्हणीतहि हाच अर्थ आहे. घरामध्यें लहान मुलें काठीचा घोडा करतात आणि आगपेटीची आगगाडी करून कांही वेळ गमतीनें खेळतात. त्या मुलांना कांहीं वेळ त्या कल्पनेंत आनंद वाटतो. पुढें ती लगेच कटाळून ती काठी व ती पेटी फेंकून देतात. दगडाधोंड्यात देव आहे असें मानून जे पूजाअर्चा करीत बसतात त्याची स्थिति लहान मुलांप्रमाणेंच असते. एक सुपारी ठेवून त्याला गणपति म्हणून त्याची पूजाअर्चा करावयाची व ती झाली की त्याचें लगेच विसर्जन करावयाचें ! शाडूचा गणपति अगर मातीचें पार्थिव लिंग करून त्याजवर आपल्या भावनेनें देवत्वाचा आरोप करावयाचा व पूजा झाली की अक्षता टाकून विसर्जन करून मोकळें व्हावयाचें हाहि एक लहान पोरांप्रमाणेंच खेळ आहे.

लहान मुलाला काही तरी अल्प वस्तूवर मोठी कल्पना करून वागण्यांत गंमत व आनंद वाटतो, तशीच येथें अल्प अशा दगडाधोंड्यावर देवाच्या महत्त्वाची भावना करून कांही काल गमतीनें आनंद भोगण्याची स्थिति असते. पण तत्त्वतः आणि शास्त्रतः हें खरें आहे काय व योग्य आहे काय ? भागवतासारख्या भक्तिप्रधान ग्रंथांतसुद्धां कांही स्थली या मूर्तिपूजेचा म्हणजे प्रतीकांतच देव असतो या कल्पनेचा निषेध केलेला आहे. ( भा. स्कंद ३ –अ. २९ )

अहं सर्वेषु भूतेषु भूतात्मावस्थितः सदा ।
तमवज्ञाय मां मर्त्यः कुरुतेऽर्चाविडम्बनम् ॥ २१ ॥
यो मां सर्वेषु भूतेषु सन्तमात्मानमीश्वरम् ।
हित्वार्चां भजते मौढ्याद्भस्मन्येव जुहोति सः ॥ २२ ॥

मी सर्व भूतांमध्यें असतांना माझी अवज्ञा करून जो मूर्तीची अर्चा करून थट्टा करतो तो सर्वभूतस्थ जो मी त्याचा अपमान करून भस्मातच जणु हवन करतो. गंधपुष्पादिकांनी माझी पूजा केली असतां

मी तुष्ट होत नाही म्हणून सर्वभूतस्थ जो मी त्या माझी पुढीलप्रमाणे पूजा करावी—

अथ मां सर्वभूतेषु भूतात्मानं कृतालयम् ।
अर्हयेद्दानमानाभ्यां मैत्र्याभिन्नेन चक्षुषा ॥२७॥

सर्व भूतांच्या ठिकाणी ज्याने आपले वसतिस्थान केले आहे अशा त्या परमेश्वराची अभिन्न दृष्टीने दान, मान आणि इतर अनेक प्रकारांनी सेवा करावी मोठ्यांचा बहुमान करावा, दीनांवर अनुकंपा करावी, बरोबरीच्यांशी मैत्री करावी, यमनियम पाळावे, सरळपणाने वागावे आणि हे सर्व आत्यंतिक अशाच भक्तियोगात येतें, असे भागवतांत सांगितले आहे, हे समजले म्हणजे वाचकांना खरोखरीच आश्चर्य वाटेल

एखाद्या क्षयरोग्याला कितीहि जरी उत्कट भावनेने 'तू निरोगी आहेस' असे शिकविले तरी तो काही निरोगी होणार नाही, अगर अठरा विश्वे दारिद्र्याने पीडलेला मनुष्य आपल्या प्रबळ इच्छाशक्तीने मी श्रीमंत आहे असे समजू लागला तर तो श्रीमंत होऊ शकणार नाही! केवळ भावनेने अविद्वान् विद्वान् होऊ शकत नाही निर्धन धनसंपन्न होऊ शकत नाही आणि दुबळा बलवान् होऊ शकत नाही हाच प्रकार ईश्वरभक्तीचा आहे दगडात देव आहे, मूर्तीत देव आहे सुपारीत देव आहे ही कल्पना काही काळ मनुष्याला सुख देईल, पण विचार जागृत झाल्यानंतर या कल्पना व हे सर्व देव मिथ्या आहेत असे वाटल्यावाचून राहाणार नाही

भावनेला काही महत्त्व आहे, ती एक मनाची शक्ति आहे व मानसशास्त्राप्रमाणे मानवी मनात काही एक सामर्थ्य आहे हे सर्व खरे आहे म्हणूनच 'जसे लोक तसे त्याचे देव' अशी म्हण पडली आहे तेजस्वी लोकाचे देव तेजस्वी असतात, समर्थांचे देव समर्थ असतात आणि गुलाम लोक आपल्या देवाना गुलाम बनवितात देव तर बिचारा असा आहे की जसे त्याचे भक्त त्याला बनवितील तसा तो बनतो 'मला स्वातंत्र्य नाही, **मी भक्तपराधीन आहे'** असे देवाने पुष्कळ वेळा सांगितले आहे भक्त जर तरवारी घेऊन धावू लागले, गदा घेऊन युद्ध करू लागले अगर तोफा व बंदुका यांच्या साहाय्याने जग आश्रमण्याची इच्छा करू लागले तर त्या भक्ताच्या भावनेप्रमाणे हे सर्व देव करतो असे वाटते वास्तविक तो काही करीत नाही तो कूटस्थ आहे, साक्षी आहे, सर्वव्यापी आहे आणि विभु आहे प्रकाशमान दिवा हा जसा गृहव्यापाराला निमित्तभूत असून कोणाचे नियमन किंवा निवारण करीत नाही, तसाच वस्तुत ईश्वर आहे पण अज्ञ लोकाना हे समजत नसल्यामुळे ते मूर्तीत व दगडाधोंड्यात देव आहे असे मानून त्याला भजतात व त्याच्या कृपेने सर्व काही मिळते असे समजतात हे कथन निष्ठुर असले तरी ते सत्य आहे, हे पुन पुन्हा सांगितले पाहिजे

येथपर्यंत निर्गुण परमेश्वराचे स्वरूप हे आकलण्यास कसे कठिण आहे व ईश्वराचे जे सगुण स्वरूप मूर्ति वगैरेच्या रूपाने मानण्यात येते ते अशास्त्रीय, चुकीचे व हानिकारक आहे असे सांगितले अर्थात् मग ईश्वराचे स्वरूप कोणते? ते सांगितले पाहिजे

ईश्वराचे स्वरूप याणत, ते तर्कदृष्टचा शुद्ध कसे असावे हे पाहू अखिल चराचराच्या बुडाशी एक तत्व आहे व ते प्रत्येक अणुरेणूमध्येंहि भरले आहे, हे मान्य करावे लागेल प्रत्यक अणूत जी गति, (Motion) जो वेग (Force) दिसतो तीच ती शक्ति होय। ईश् धातूचा मूळ धात्वर्थहि ईश-सत्तायां व ईश = ऐश्वर्य असा आहे या निसर्गातील सर्व व्यापार सुसबद्ध, सुसगत व कार्यकारणयुक्त असे जे चाललेले आहेत ते एका शक्तीच्या नियमनानेच चाललेले असले पाहिजेत ती शक्ति म्हणजेच ईश्वर होय। ईश्वराच्या विशुद्ध स्वरूपाची कल्पना गीता व उपनिषदें यामध्येच आहे ता सम आहे, पक्षपाती व निर्दय नाही, त्याला कोणी प्रिय नाही, द्वेष्य नाही तो कुणाचे पुण्य घेत नाही व कुणाचे पाप नष्ट करीत नाही तो साक्षी, चेतन, नित्य असा आहे ही ईशशक्ति दिव्याप्रमाणे साक्षीभूत व प्रवर्तक असते दिवा जसा सर्वांना प्रकाश देतो, पण तो कोणाचे नियमनहि करीत नाही, तसाच ईश्वर आहे

अथवा ईश्वर हा पावसासारखा किंबहुना जलासारखा आहे जल हे प्रत्येक बीजाला जीवन देते व त्या त्या बीजात जी शक्ति असेल, तिचे विकसन करण्यास साहाय्य करते ऊस, कारले व मिरची यांच्या बीजाशी जलाचा सयोग झाला की ते जल बीजस्थ शक्तीचा विकास करते पाणी स्वत गोड, कडू अगर तिखट असतच नाही पण उसात गेले की गोड, कारल्यात गेले की ते कडू आणि मिरचीत गेले की तिखट असे होते पाणी स्वत मिरचीतील तिखटपणा नष्ट करीत नाही किंवा कारल्यात गोडीहि घालीत नाही बीजात जो सस्कार असेल त्याचे विकसन करणे एवढेच जलाचे कार्य होय।

त्याप्रमाणेच अनेक प्राण्याची जी कर्मे, त्याचे झालेले जे सस्कार म्हणजे कर्मांचे जे 'बीजदोष' असतात त्याचे विकसन करून प्रत्येक प्राण्याला त्याच्या त्याच्या कर्माप्रमाणे फल देणे व ते त्याला भोगावयाला लावणे हेच नियतीचे कार्य आहे कर्माचा कर्ता आणि त्याचे फल याची सांगड घालणारी जी एक शक्ति तीच ईश्वर होय ती शक्ति निर्गुण, निराकार नामरूपातीत आहे व मनुष्यप्राणीहि या शक्तीचाच एक अश आहे इतकेच ईश्वराविषयी बोलता येते

ईश्वराच्या स्वरूपाचा कितीहि ऊहापोह केला तथापि तो अपुरा व अनिश्चित अशा स्थितीत राहणार, म्हणून दृश्य जें जगत् तेच ईश्वराचे सगुण स्वरूप आहे व या जगताला नियामक अशी एक शक्ति आहे तीच ईश्वर असे समजून आपण पुढें जाऊ मनुष्यप्राणी ईश्वराचा अंश आहे, हे सर्व विश्व ईश्वराने उत्पन्न केले, अर्थात् या विश्वात तो सर्वत्र भरला आहे (हे जगत् म्हणजे ईश्वराचे स्वरूपच आहे असे समजण्यात काही दोष नाही साखर व तिची गोडी, रत्न व त्याचे तेज, अग्नि व त्याच्या ज्वाळा, कमळ व त्याच्या पाकळ्या, जल व त्याची आर्द्रता ही जशी वेगवेगळी काढता येत नाहीत, तसच ईश्वर व जग याचाहि भेद करणे व त्याना भिन्न मानणे शक्य नाही ईश्वर व जगत् ही एकरूप आहेत असेच समजल पाहिजे व जगताच्या सगुण स्वरूपानें असणाऱ्या या ईश्वराची भक्ति कशी करावी हे पाहिले पाहिजे ईश्वराविषयींचें जें उत्कट प्रेम ती भक्ति होय। पण सगुण ईश्वर म्हणजेच हें जगत् असल्यामुळें जगतावर प्रेम करणें, आपल्या समाजावर व राष्ट्रावर प्रेम करणें आणि आपल्या हातून होईल तितकी त्याची प्रेमानें सेवा करणें म्हणजेच ईश्वराची भक्ति होय.)

आज समाजामध्यें ईश्वराचे नामस्मरण करणे, त्याची पूजाअर्चा करणे, त्याच्या कथा सागणे व ऐकणे, त्याला वदन करणें, तीर्थयात्रा करणे, देवस्थानच्या वाऱ्या करणे म्हणजे ईश्वराची भक्ति करणें असे समजतात पण हा ईश्वरभक्तीचा प्रकार बरोबर आहे काय? राम, राम, राम, अशा केवळ नामोच्चाराने ईश्वराची भक्ति होईल का त्याबरोबरच राम हा मोठा क्षत्रिय वीर होता, त्याने दक्षिण दिग्विजय केला, आर्य संस्कृतीचा झेंडा लंकेत नेऊन रोवला, तो मोठा पितृभक्त, एकवचनी, एकपत्नी असा शीलसपन्न वीरपुरुष होता असे समजून ते गुण आपल्या अंगी व समाजाच्या अंगी आणण्याचा यत्न करणे ही खरी भक्ति होईल? भगवान् श्रीकृष्णाच्या केवळ नामोच्चारान भक्ति होईल, का तो तत्वज्ञ

जगत् हा कर्माचा परिपाक आहे, मनुष्यप्राणी कर्मामुळे व कर्म करण्याकरिताच जन्माला आला आहे मनुष्यजन्म ही कर्मभूमि आहे येथे ज्ञान व कर्म यांच्या साहाय्यानेच वागावे लागते समाजात जन्मलेल्या मनुष्याला मागील पिढ्याच्या यत्नामुळे कित्येक सुखें सहज भोगता येतात मागील पिढ्याप्रमाणे हल्लीच्या पिढीनेंही यत्न करून मनुष्यसमाजाच्या सुखात काही तरी भर टाकलीच पाहिजे ही भर टाकणे म्हणजेच जुन्या समजुतीप्रमाणे देव, ऋषी व पितर यांची ऋणे फेडणे आणि नव्या समजुतीप्रमाणें कुल, समाज, धर्म व राष्ट्रसबंधी जी अनेक कर्तव्यें आहेत ती पार पाडणे होय प्रत्येक मनुष्याने या जगात आपापले कर्तव्य सारखें करीत राहावे व ते करीत असताना ईश्वराचे स्मरणहि ठेवावे समाज हा विराटस्वरूपी असून मनुष्य हा त्याचा लहान घटक ही जाणीव ठेवून निमित्तमात्र या भावनेने सारखे कर्तव्य करीत राहाणे हच इष्ट होय ! स्वकर्तव्य सोडून उगर त्याकडे दुर्लक्ष करून नुसतें ईश्वराचें नामस्मरण करणें, ही ईश्वरभक्ति नसून ईश्वराचा द्रोह आहे.

अपहाय निजं कर्म कृष्ण कृष्णेति वादिन ।
ते हरेर्द्वेषिण पापा धर्मार्थं जन्म यद्धरे. ॥ विष्णुपुराण

स्वकर्तव्य सोडून हरिहरि म्हणत असणारे लोक हे हरीचे द्वेष्टे व पापीच होत कारण हरीचा जन्म म्हणजे ईश्वराचा जन्म हा धर्मरक्षणा करिता म्हणजे एका दृष्टीने कर्माकरिताच असतो !

ईश्वरविषयक प्रेम म्हणजे भक्ति, अशी भक्तीची व्याख्या आहे खरी, पण ती भक्ति तरी कर्तव्याशिवाय होते कशी व त्या भक्तीचा खरा प्रकार कोणता हा प्रश्न शिल्लक राहातोच व्यवहारात प्रेमाचे पर्यवसान कृतीमध्यें होते, असे आपण पाहातो दोघा मित्राचे उत्कट प्रेम असले तर ते जीवास जीव देण्यास तयार होतात! म्हणजे त्याच्या प्रेमाचे पर्यवसान एकमेकास साहाय्य करण्यात होते आईचे मुलावर प्रेम असतें म्हणून ती त्याकरिता अनेक खस्ता खाते पत्नी पतीकरिता काय पाहिजे ते करते लोभी द्रव्याकरिता, व्यसनी व्यसनाकरिता काय पाहिजे ते सोसतो, म्हणजे जो तो आपापल्या इष्ट वस्तूकरिता प्रेमाने कृतीच करतो कृतीशिवाय निष्क्रिय प्रेम व्यर्थच होय. सविषय दया व निर्विषय दया असे दयेचेहि दोन प्रकार

होतात ज्या दयेमुळें कृति होऊन दुःख नष्ट केले जाते, तीच खरी दया होय! ज्या दयेंत कृति नाही, ज्या प्रेमाचे पर्यवसान क्रियेंत होत नाही, ते प्रेम पढच म्हटले पाहिजे याच दृष्टीने ईश्वरविषयक प्रेमाचे पर्यवसान कृतीत न होता ते नुसत स्मरण व स्तवनरूपानेच राहू लागले तर त्या प्रेमाला ईश्वरभक्ति असे म्हणता येईल काय? मुळीच नाही

√ एक मुलगा मातृभक्त आहे असे आपण समजू मातृभक्तीचे लक्षण हेच की, माता सांगेल त्याप्रमाणे वागणे व तिच्या सेवा-शुश्रूषेंत काहींहि कमी न पडेल असे करणे मुलाने आईच्या सांगण्याप्रमाणे वागले पाहिजे, पण तसे काही न करता एखादा मातृभक्त मुलगा 'थोर तुझे उपकार, आई थोर तुझे उपकार' अशा पदांनी तिला आळवू लागला तर ते कर्म आईला पसंत पडेल काय? ती सरळ म्हणेल, की मेल्या, होय! मी अशी आहे खरी आईची योग्यता मोठी आहे, पण तू माझ्यापुढे मूर्खासारखा स्तुति करीत कशाला बसतोस? येथून चालता हो व मी सांगितलेले काम आधी कर पाहू' आईने सांगितलेले काम करणे, तिच्या मनाप्रमाणे वागणे व तिजवर प्रेम करणें हीच मातेची सेवा होय व तेच मातृभक्तीचे द्योतक होय!

√ दोन राजे आहेत असे समजू एक राजा सैन्य, कोश, मंत्री व प्रजा या सर्वांकडे दुर्लक्ष करून सारखा ईश्वराचे स्मरण व भजन करीत आहे व ईश्वराचे म्हणजे मूर्तीचे डोके धरून बसतो आहे दुसरा राजा राजधर्मा-प्रमाणे सैन्य, कोश, दुर्ग व मंत्री या सर्वांकडे उत्तम तऱ्हेने लक्ष देऊन ईश्वराचें स्मरणहि 'मामनुस्मर युध्य च' याप्रमाणे प्रसंगी ठेवीत आहे तर या दोघांपैकी ईश्वराला कोणता प्रिय होईल? स्वकर्तव्य सोडून जो सारखी ईश्वराची स्तुति करीत असेल, तो ईश्वराला कधीहि प्रिय होणार नाही, फार काय, पण अशा राजावर परचक्र आले तर ईश्वर त्याचे निवारण न करता मंत्री, कोश, दुर्ग इत्यादिकांकडे दुर्लक्ष केल्यामुळें त्याला पराभवाचेच फळ दिल्याशिवाय कधीहि राहाणार नाही कर्माप्रमाणे फळ देणे हा ईश्वराघरचा सिद्धांत सारखें

युद्धविषयक सामुग्री सिद्ध न ठेवणाऱ्या राजाला केवळ तो स्तुतिपाठकाचे काम करतो म्हणून ईश्वर जय कधीहि देणार नाही व दुसरा राजा आपली थोडी कमी स्तुति करतो म्हणून त्याच्या युद्धशास्त्रनिपुणत्वाचा लाभ कधीहि काढून घेणार नाही, असा हा ईश्वरी दंडक आहे

*शिक्षकाने आपला विषय मुलांना थोडक्यात व कष्ट न पडता कसा* समजेल, इकडे लक्ष दिले पाहिजे पण तो जर बारटी सगळी 'ढ' आहेत अशा समजुतीने अध्यापनाकडे दुर्लक्ष करून पढरीच्या वाऱ्या करू लागेल तर ती ईश्वराची भक्ति नसून तो एक भाजाकार आहे असेच समजले पाहिजे पक्षकार वकीलाला खरीखुरी व योग्य माहिती देण्याचा यत्न करीत नाही व दिलेली माहिती वकीलहि मार्मिकपणे अवलोकनात आणीत नाही, पण दोघेहि आपापले कर्तव्य सोडून जर नामसप्ताहात (खटल्यात जय मिळावा म्हणून) नाचू लागले तर ईश्वर त्याना अपयशच देईल

एक विद्यार्थी होता, त्याला थोडें संस्कृत येत होते त्याने 'प्रणम्य शिरसा देवम्' हे महागणपतिस्तोत्र पहिली वारा नाव व पुढची फलश्रुति यासह पाठ केले व अर्थहि समजून घतला स्तोत्रातील फलश्रुति प्रमाणे स्वत मोठे विद्वान् व्हाव म्हणून त्याने गणपतिस्तोत्राच्या मोठ्या श्रद्धेने हस्तलिखित वळणदार प्रती करण्यास प्रारभ केला दोन चार दिवस विद्यार्थी पाठाला का येत नाही व चुकवाचुकवी का करतो याची गुरुजींनी चौकशी केल्यावर त्याने सागितले की, 'गणपतीच्या प्रसादाने सर्व विद्या एकदम येण्याचा उपाय मी हल्ली करीत आहे' गुरुजी म्हणाले, असा उपाय आहे तरी कोणता त मला साग त्यावर 'आठ ब्राह्मणाना स्वहस्ते लिहून जो कोणी हे स्तोत्र अर्पण करील

तस्य विद्या भवेत् सर्वा गणेशस्य प्रसादत ।

त्याला सर्व विद्या प्राप्त होतात असा श्लोकार्थ त्याने म्हटले। त्यावर गुरुजी म्हणाले, 'अरे मूर्खा! हा अर्थवाद आहे कोणीकडून गणपतीचे नाव घ्यावे म्हणून ही फलश्रुति सागितली आहे तू अभ्यास सोडून तुमच्या या स्तोत्राच्या नकला करीत बसलास व आठाच्या जागी जरी त्या आठ हजार ब्राह्मणाना अर्पण केल्यास तथापि अक्षर सुधारण्याशिवाय कोण-

तीहि विद्या तुला यणार नाही विद्या ही अभ्यासाने, दीर्घ परिश्रमान व पद्धतशीर शिक्षणानेच प्राप्त होते तन्हा तू तुझा अभ्यास कर '

समजा, खड्यातील एका घाणेरड्या विहिरीत लोक स्नान करतात आणि धुणेहि धुतात नि तियल्च पाणी पितात' या घाणेरड्या प्रकारामुळे जर लोकाना सारखे नारू होऊ लागले तर, ती ईश्वराची अवकृपा असे समजून नामसप्ताह सुरू करावयाचे की काय ? आणि त्या नामसप्ताहान ईश्वर प्रसन्न होऊन त्या नारूचे जतु मरतील काय ? मुलाला शाळेत न पाठविता, त्याजकडून अभ्यास करवून न घेता तो केवळ स्तोत्रे म्हणत जर सारखा बसेल तर त्यामुळे त्याला परीक्षेत खरोखर यश मिळेल काय ? घरात रोगी आसन्नमरण आहे अशा स्थितीत त्या रोग्याच्या औषधोपचाराचा विचार न करता देवापुढे नुसत ध्यानस्थ बसल्यान घरातील रोगी रोगमुक्त होईल काय ? द्रव्य मिळविण्याकरता जगातील कोणताही उद्योग न करता जर षोडषोपचार पूजेचा सारखा सपाटा चालविला तर कोणी कधी तरी सपन्न होईल काय ? देवाच्या भक्तीने कोर्टातील केस जर जिंकता येत असेल तर वकील दण आणि इतर व्यवहार करणच सोडून देऊन गोमुखीत हात घालून खुशाल -जप करण्यास कोणती हरकत आहे ?

ईश्वर मूर्तिमत दयेच्या रूपाने असतो ईश्वरान ह जगत् निर्माण करून प्राण्याना ते उपभोग्य असे केल आहे ईश्वराच्या न्यायनिष्ठुरतेमध्येच त्याची दया साठविली आहे अशा ईश्वराचे मनोगत काय असावे ह काय सागावयास पाहिजे ? गीता अध्याय ३, श्लोक २२ ते २४ मध्ये तो भगवान् श्रीकृष्णमुखे सागतो की 'मला कर्तव्य उरलेल नाही तथापि मी जगत् चन चालाव म्हणून सारखा कर्म करीत आह जर मी आळस टाकून सारखा कर्म करीत राहीन तरच इतर लोक माझे अनुकरण करतील मी जर कर्मपराङ्मुख झालो तर जग उत्सन्न होईल'

ईश्वर केवढ्या जबाबदारीने वरील उद्गार काढीत आहे हे लक्षात घतल म्हणजे ईश्वराला प्रिय काय असाव व ईश्वराची सेवा किंवा भक्ति कशान होईल याचा उलगडा होतो जगच्चक्र चालविणाऱ्या ईश्वराला ' जगातील प्रत्येक माणसान आपआपल कर्तव्य उत्साहाने, धैर्याने अनह-

राने व आसक्ति सोडून करावें हें तत्त्व इष्टतम आहे यांत शंका नाही स्वकर्तव्य डावलून जो केवळ ईश्वराची भाटाप्रमाणे स्तुति करीत बसेल त्याजवर ईश्वर प्रसन्न न होता रुष्टच होईल

ईश्वराचें सगुण प्रतीक हें जगत् असून त्यांतील समाज व राष्ट्र यांच्या अभ्युदयाकरिता प्रत्येकाने आपापलें कर्तव्य करीत राहणें हीच परमेश्वराची भक्ति असून ईश्वरप्राप्तीचा खरा मार्गहि तोच आहे कर्तव्यानंदांत परमानंद आहे अहर्निश कर्तव्य करीत राहण्यांतच खरें सुख आहे कर्म करीत राहण्यांत जें सुख आहे तें कर्मफल भोगण्यांत नाही म्हणूनच ईशोपनिषदामध्यें कर्मे करीतच म्हणजे कर्तव्य करीतच शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी असें म्हटलें आहे गीतेच्या द्वाराने श्रीकृष्णमुखांतून हाच संदेश बाहेर पडला असून

स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥ —अ १८ श्लो ४५ ॥

म्हणजे स्वकर्मकुसुमांनी सर्वात्मक ईश्वराची स्मरणपूर्वक पूजा केली असता मनुष्याला आत्मसंतोषरूप सिद्धि मिळते, असें म्हटलें आहे

आतां व्रतादिकांच्या योगानें ईश्वर प्रसन्न होतो व सर्व काही देतो अशी जी एक समजूत, तिचाहि परामर्श घेऊं अमुक व्रत केल्यानें अमुक मिळतें हा सर्व अर्थवाद पोकळ स्तुतिपर असतो कोणीकडून मनुष्यानें कर्मप्रवण व्हावें म्हणून या असल्या फलश्रुत्या सांगितलेल्या असतात त्या खऱ्या मानून सकामतेनें जर कोणी काही करूं लागेल तर तो भ्रम होय ! लोकप्रसिद्ध असलेल्या सत्यनारायणव्रताचेंच उदाहरण घेऊं

एकदा म्हणे नारद परानुग्रहार्थ संचार करीत करीत मृत्युलोकाला आले तेथें नाना क्लेशांनी पीडलेले लोक त्यांनी पाहिले ते क्लेश कसे नष्ट करावे हें विचारावें म्हणून नारद विष्णुलोकास गेले, अशी स्कंदपुराणांतर्गत रेवाखंडांतील या व्रताची प्रस्तावना आहे नारदांनी विष्णूपुढें मृत्युलोकांतील दुःखाचें रडगाणें गायलें व विनंति केली कीं, ' तत्कथं शमयेन्नाथ लघूपायेन तद्वद ' दुःखशमनाचा सोपा उपाय सांगा त्यावर भगवंतांनी हें सत्यनारायणव्रत सांगितलें व त्याचें महत्त्व वर्णन केलें —

दुःखशोकादि शमनं धनधान्य प्रवर्धनम्।
सौभाग्यसंततिकरं सर्वत्र विजयप्रदम् ॥

दुःख नष्ट करणार, धनधान्य वाढविणार, सौभाग्य व संतति देणार, सर्वत्र जय देणार असे हें व्रत आहे या व्रताकरता उत्तम प्रकारचा प्रसाद विशिष्ट प्रकाराने करावा, तो सत्यनारायणाला अर्पण करावा, ब्राह्मणाना द्यावा, नृत्यगान करावे, असे सांगून कलियुगात हाच सोपा मार्ग आहे असे भगवान्‌ म्हणाले भगवानानीं प्रथम पूर्वीची एक कथा सांगितली, इतर कथा- पुढें सूतानी शौनकाला सांगितल्या आहेत व शेवटी या व्रताची फलश्रुतीहि पुष्कळच दिली आहे.

हें व्रत सांगणारा खरोखरीच जर श्रीकृष्ण भगवान असेल तर हा भगवान गीतेत एक बोलतो व स्कंदपुराणात दुसरेंच बोलतो असे सिद्ध होतें हे व्रत भगवानाच्या तोंडून ज्यानें वदविले आहे, त्याने त्या भग- वानाची खास बदनामी केली आहे असे वाटते कारण याच भगवानानें अर्जु नाला युद्धाच्या वेळेला अनेक विषय सांगून अगदी पुरे केले व शेवटी कर्तव्य कर, तेच मला प्रिय आहे असे म्हणून त्यास लढावयाला लावले अर्जुनाला कर्मयोगशास्त्र सांगणाऱ्या या भगवानाला विजयप्रद असे हें सत्यनारायणाचे व्रत माहीत नव्हते काय ? कारण भारतीय युद्धकालीच कलियुगाला प्रारंभ झाला व कलियुगाकरिता नुकतेच चालू केलेले व्रत भगवंताला विदित नव्हते असे नाही त्याने असे सांगितले असते की, युद्धात आप्त जनाना मारण्याचे पातक तुला लागेल ही काळजी कशाला ? हें सत्यनारायण व्रत कर यथा- शास्त्र घृत, शर्करा, रंभाफळें घालून प्रसाद तयार कर, तो आपण सर्व मिळून खाऊ, मग पाहा विजय मिळतो की नाही ? ज्या व्रतात केवळ तीर्थ- प्रसादाचेच महत्त्व आहे असे व्रत गीता सांगणाऱ्या भगवंतानी तेव्हा सांगितले नाही, त्याअर्थी हा प्रसादखाऊ भगवान निराळा असला पाहिजे किंवा हे व्रत अगदीच खालच्या अधिकाऱ्याकरिता सांगितले आहे, असे तरी समजले पाहिजे. गोडगोड खाण्याची ज्याना चटक आहे अशा लोकाना फलश्रुतीच्या अर्थवादपर थापा देऊन देवाच्या निमित्तानें तरी ' गोड खा ' असे सांगण्या- करिताच हें व्रत आहे एक हजार नाही दहा हजार सत्यनारायण केले तरी त्यात सत्यरूपी नारायणावर निष्ठा वाढणार नाहीं, सत्याग्रह बाणणार

नाही व त्याकरिता प्राण देण्याची वृत्ति तर उत्पन्न होणारच नाही, पण गोड खाण्याची चटक मात्र लागेल !

नाना क्लेश निवारण करणारें हे जर व्रत आहे व ते व्रत गेली काही दशके जर होत आहे, तर लोकांची निरक्षरता का जात नाही ? स्वाभिमान-शून्यता का कमी होत नाही ? आणि दैन्य, दारिद्र्य व मूर्खत्व यांचा नायनाट का होत नाही, हे पाहावयास नको काय ? नारदानी विचारलेले व भगवतानी सांगितलेले जर हे व्रत असेल तर या व्रतापासून नाना क्लेश नष्ट व्हावयास पाहिजे होते परंतु ज्याअर्थी तसे झालें नाही, त्याअर्थी क्लेश निवारण्याचा मार्ग म्हणजे साक्षरतेचा प्रसार, जबाबदारीची जाणीव व कर्तव्य हीच भक्ति, या तत्त्वाचा प्रसार, हाच होय

आतापर्यंत आपण भक्तिमार्गाचे ऐतिहासिक अवलोकन केले ईश्वर एक आहे का अनेक आहेत, तो सगुण आहे का निर्गुण आहे याचा विचार करून मूर्तिपूजेतील दोष पाहून ईश्वराचे स्वरूप केवळ तर्काला पटण्याजोगे कसे असू शकेल हेंहि पाहिले नवविधा भक्तीने ईश्वर प्रसन्न होत नाही, व्रतादि साधनानी तो भेटत नाही, पारायणे व स्तोत्रपाठ यानी तो प्रसन्न होत नाही तर केवळ कर्तव्यरूपी कुसुमानेच तो संतुष्ट होतो असे आपणास दिसले, म्हणून आजच्या कालातील ईश्वराचे सगुण प्रतीक जर काही असेल तर तें स्वसमाज व स्वराष्ट्र हेंच होय !

'सा परा अनुरक्ति ईश्वरे' या नारदसूत्राप्रमाणे स्वराष्ट्रविषयक उत्कट प्रेम म्हणजे ईश्वरभक्ति होय ! काष्ठपाषाणाचे प्रतीक घेऊन त्याची नवविधा भक्ति जशी पूर्वी करीत तशी आजच्या कालात या प्रतीकाची म्हणजे राष्ट्राची भक्ति केली पाहिजे उत्कट भक्ताचे लक्षण हेच की तो आपल्या प्रतीकाकरिता सर्वस्व त्यागाची तयारी दाखवितो अशी तयारी दाखविणारे देशभक्त आजच्या कालात निघाले पाहिजेत अर्थात् राष्ट्रसेवा हीच आजच्या कालची सगुण भक्ति आहे, असे समजून त्या मार्गाने ईश्वरप्राप्तीचा मार्ग आक्रमिला पाहिजे

आज आपल्या राष्ट्रात स्वच्छतेची, शिक्षणाची, ज्ञानाची, संघटनेची, शिस्तीची, स्वाभिमानाची अत्यंत वाण नाही काय ? शेतकऱ्याची उन्नति,

ग्रामकन्याची उन्नति, स्त्रियांची उन्नति, उद्योगधंद्याची उन्नति अशा कित्ती तरी प्रकारची उन्नति व्हावयास पाहिजेच ना? प्रत्येक नागरिकाला सर्व पाहिजे. प्रत्येक नागरिकाचा संघ, कोर्टे, कचेऱ्या पोस्टें आगगाड्या शाळा, म्युनिसिपालिट्या, तालीमसंस्था व्यापार, उद्योगधंदे पोटीसंस्थात न्यायखात अशा प्रकारच्या कित्ती तरी विविध संस्थाशी यत असतो या सर्व संस्थात दोष कित्ती तरी भरलेले आहेत हे सर्व दोष शोधून ते नष्ट करण्याचा उद्योग पुष्कळ लोकांनी करावयास नको काय ? समष्टिहितार्थ निःस्वार्थ बुद्धीनें उद्योग करणें हीच खरोखर ईश्वराची भक्ति होय !

✓ दगडाच्या मूर्तीत देव मानून तिच्या पूजाअर्चेत काळ घालविण्यापेक्षा सभोवारच्या अज्ञान माणसांना सुज्ञ करण्याचा यत्न करणे हीच खरी भक्ति होय हजारो माणसं मारे देवालयात येत आहेत व पूजाअर्चा करीत आहेत हे दृश्य पाहण्यापेक्षा शकडो तरुण ज्या व्यायामसंस्थेत येत आहेत व बलाची उपासना करीत आहेत अशी संस्था पाहणे हे अधिक इष्ट होय ! नवीं देवळे बांधणे, देवाला विविध भोग देणे या भक्तीपेक्षा ज्यायोगे ज्ञानदान अखंड चालू राहील आणि ज्ञानवानांना आश्रय मिळेल अशी व्यवस्था करणे हेच अत्यंत श्रेयस्कर होय ! देवाच्या नावाने ब्राह्मणभोजने घालण्यापेक्षा ते द्रव्य अर्थोत्पादक अगर आरोग्यहितवर्धक अशा संस्थांकडे योजणें हा आजच्या काळातील भक्तीचा प्रकार आहे

जगात सर्वश्रेष्ठ प्राणी कोणी असेल तर तो मनुष्यप्राणी असून मनुष्याचे शरीर हेच देवाचे वसतिस्थान होय ! अर्थात् ईश्वर ज्या ठिकाणी राहातो, तिकडेच ना मनुष्य जो ईश्वराचा अंश—त्याच्या उन्नतीकडे दुर्लक्ष करुन ईश्वराची भक्ति कधीच होणार नाही सर्व मनुष्यमात्रात नारायण आहे मनुष्याच्या उन्नतीकरिता झटणें हीच देवपूजा आहे, अशा विचारांनी व भावनेनें राष्ट्रातील स्त्रीपुरुष जेव्हा अनेक कार्यक्षेत्रामध्यें उड्या घेतील तेव्हाच खऱ्या भक्तीचा उदय होऊन ईश्वरप्राप्ति होणार आहे

---

प्रकरण १७ वें.

# बोकेशाही व उपासनी बाबा

ह्या प्रकरणापर्यंत ब्रह्मज्ञान व बुवाशाही या ग्रंथाचा मार्ग आपण बराच आक्रमण केला तेव्हां कोठून कोठवर आलो व पुढें कोठें जावयाचें आहे, याचें सिंहावलोकन थोडें अवश्य आहे.

पहिल्या प्रकरणात आर्यसंस्कृतीची वैशिष्टयें कोणती, त्या वैशिष्टयात तत्त्वज्ञानाचें स्थान कसें श्रेष्ठ आहे हे सागून बुवाशाहीची व्याख्या केली. दुसऱ्या प्रकरणात ज्या पायावर ही बुवाशाहीची इमारत उभी होते त्या पायाचें म्हणजे ब्रह्माचें व जगताचे स्वरूप निवेदन केलें ब्रह्म हें सद्रूप व चिद्रूप असे असता असत्, जड व दुःखरूप जगत् कसें उत्पन्न होतें व त्या-करिता अविद्या ही शक्ति व ईश्वर का मानावा लागतो याचें विवेचन तिसऱ्या प्रकरणात केलें जगत् हे उपटसुंभासारखें एकदम उत्पन्न होत नसून तें अनादि असे आहे व कर्म हेच या जगताच्या रूपाने कसे परिणत पावतें हें चौथ्या प्रकरणात सांगितलें.

ब्रह्म, ईश्वर, अविद्या, जगत् व कर्म यांचा विचार झाल्यावर सहजच जीवस्वरूपाकडे लक्ष्य जातें म्हणून आत्मविचार, जीवाचें स्वरूप, पंचकोश व मरणोत्तर स्थिति हा भाग प्रकरण पाच व सहा मध्यें वर्णन केला. प्रस्तुत चर्चेतील जो वादग्रस्त मुद्दा की ब्रह्मवेत्ता हा कसा असतो, तें ध्यानात यावें म्हणून मोक्ष म्हणजे काय, मोक्षाचें स्वरूप कसें असतें, मुक्त कसा वागतो, त्याची लक्षणें कोणती हे अनेक आधारासह समजावण्याचा यत्न सातव्या प्रकरणात केला आहे गुरु कसा का असेना त्याच्यावर श्रद्धा पाहिजे, गुरुकृपेनेच मोक्ष मिळतो ही समजूत कशी धादांत खोटी आहे हे प्रकरण आठमध्यें मट्टे गुरुभक्त जे ज्ञानेश्वर त्याच्या ज्ञानेश्वरीच्या आधारें स्पष्ट केल्यानंतर श्रद्धेने व भावनेने विलपत कार्य होतें आणि श्रद्धा व भावना

या ज्यावर ठेवावयाच्या असतात त्यांची स्तुति ही वास्तविक नसून तो अर्थवाद कसा असतो, याचें समग्र समालोचन नवव्या प्रकरणात केल्यानंतर अलीकडच्या महाराजाच्या भोंवती जें चमत्कारांचें वलय असतें तें किती वेगडी असतें व पूर्व संतांच्या नांवावरील चमत्कारसुद्धां कसे फुगविलेले असतात याबद्दलहि वाचकांशी प्रकरण दहामध्यें हितगुज केलें. प्रकरणें अकरा व बारा ही श्री एकनाथ व तुकाराम यांच्या वचनाधारें लिहिलेली आहेत. साधकाचें अध:पतन कसें होतें हें एकनाथांनी व लुच्च्या संतांचा प्रतिकार कां केला पाहिजे हे श्री तुकारामांनी मोठ्या सणसणीत भाषेंत सांगितलें आहे.

हिंदु समाजांत आज जी बुवाशाही बोकाळलेली आहे तिजपासून कोण-कोणतें अनर्थ होतात, या बुवाशाहीचा उगम बौद्धिक गुलामगिरीतच कसा आहे, हें प्रकरण तेरामध्यें निर्भीडपणें मांडलें असून प्रकरण चौदामध्यें ब्रह्मविद्येची जी आज विटंबना चाललेली आहे; तिचे स्वरूप दाखविल्यानंतर पुढच्या पिढीला उद्देशून संसार कां केला पाहिजे, षड्रिपु त्यागापेक्षा त्यांच्या दमनाचीच आवश्यकता कशी आहे, आणि आजच्या कालांतील ईश्वरप्राप्तीचा राजमार्ग जर कोणता असेल तर तो समाज व राष्ट्रसेवा हाच कसा आहे, हें सोळाव्या प्रकरणाच्या अंतापर्यंत सांगितलें. इतकें झाल्यावर ग्रंथाचें काम संपलें ! म्हणजे काय चुकत आहे, काय नको आहे हें सांगि-तल्यावर काय केलें पाहिजे व ते कसें पाहिजे हेंहि विधायक दृष्टीनें सांगि-तलें, *अर्थात् ग्रंथाची पूर्तता झाली !*

तथापि सांप्रत समाजात जी बुवाशाही बोकेशाहीप्रमाणें गाजत आहे तिची कांहीं उदाहरणें दिल्यावांचून हा ग्रंथ पुरा होत नाहीं; म्हणून कांहींच्या लीला वर्णन करून हा ग्रंथ पुरा करतों.

प्राचीन काळी ढोंगी व लुच्च्या माणसाला बैडालव्रती असें म्हणत असत. ब्राह्मणामध्यें जे असे दांभिक असत त्यांना श्राद्धाचा क्षण देऊ नये असें स्मृतिग्रंथात सांगितलेलें आहे. कांहीं ठिकाणीं तरी या अशा लुच्च्याशी बालू सुद्धां नये तर त्याजवर बहिष्कार घालावा असें म्हटलें आहे

बैडालव्रतिकान् शठान् वाङ्मात्रेणापि नार्चयेत् ।

या बैडाल व्रताचा बोध एका बोकोबाच्या गोष्टीवरून चांगला होतो. ज्या गोष्टीवरून बुवाशाही व बोकेशाही यांमध्यें साम्य आहेसें दिसतें.

बोकोबा उदरावर जसे जगतात तसेच बुवाहि प्रज्ञाहत मनुष्यावर जगतात बुवा लोक प्रज्ञाहत करण्याकरिता अनेक कारवाया करितात तसेच बोकेहि करीत असतात एका बोक्याने गगातीरावर कसे गमन केले, व उदराचा विश्वास बसावा म्हणून खोटी तपश्चर्या कशी आरंभिली, व शेवटी ते सर्व वर्म उघडकीस आले; याबद्दल एक मजेदार आख्यान महाभारतातील उद्योग पर्वामध्ये आलेले आहे तेच आता येथे देतो.

• एकदा एका दुष्ट बोक्याने विचार केला की आपल्या भागात काहीं पोट भरत नाहीं, तेव्हा दूर कोठें तरी जावे आणि तेथें असलेल्या उदरामध्यें विश्वास उत्पन्न करावा व जगता आले तर पाहावे अशा विचाराने तो गगातीरावर येऊन बसला प्रथम तपश्चर्या करीत आहोत व अहिंसा आपला धर्म आहे हें समजावे म्हणून त्याने आपल्या गळयात एक फुटक्या मडक्याचे फर्डे अडकविले. पुढील दोन्ही पाय वर करून मागचे पाय वाळूत पुरून घेऊन डोळे मिटून तो असा ताठ वाळवटात उभा राहिला. एक दोन दिवस गेल्यावर अद्याप आपल्याकडे कोणीच कसे येत नाहींत, अशी त्याला चिंता वाटली परंतु लवकरच त्याचे ते तपस्वीरूप पाहून आसपासचा पक्षिगण त्याच्या भोवती जमू लागला कोणी जवळ बसत, काही चिमण्या त्याच्या डोक्यावर बसत, तथापि त्या बोकोबाने मोठी शांति धरून आपण शांतिदेव आहोत असे भासविले. एकदा बरेचसे पक्षी पुढे आले व म्हणाले 'महाराज खरोखर आपण आला, फार चागली गोष्ट झाली. ईश्वरी कृपाच म्हणावयाची ! आम्हा सर्व पक्षिगणाना केव्हा तरी येऊन बसावयाला हे विश्रामस्थानच झाले आपण ही कडक तपश्चर्या का आरंभली आहे ? आपणास काही फळें वगैरे आम्ही आणून देऊ का ?'

सर्व पक्षिगण आपणावर विश्वास ठेवून वागतो आहे असे पाहिल्यावर, बोकोबाला तपाला फळ आले व आपले कार्यहि झाले असे वाटू लागले

आत्मकार्यं कृतं मेने चर्यायाश्च कृतं फलम्। ११ ॥ अ. १६०

तथापि अद्याप आपल्याकडे मूषकगण का येत नाहीं बरें, अशी त्याला चिंता उत्पन्न झाली आश्चर्य असे की पुढे ४।८ दिवसात हळूहळू उंदीरहि बोकोबाकडे येऊ लागले गगाकाठी काळ्या रंगाचे, भुऱ्या रंगाचे लठ्ठ अर्थात् सपन्न असे बरेच उंदीर होते

एकदां उंदराचा घोळका जमला होता, तेव्हां एक उंदीर म्हणाला, ' गड्यांनो आपल्या या वाळवटांत एक मोठे तपस्वी आले आहेत, ते फार सात्त्विक दिसतात. अशांच्याकडून आपल्या समाजाला कांही तरी लाभ करून घेतला पाहिजे. ' सर्व उंदीर म्हणाले 'ठीक आहे, तसें जर असेल तर पाहू चला !!'

नंतर ते सर्व त्या वाळवटांत गेले व या तपस्वी बोकोबाला नमस्कार करून म्हणाले, 'अहो महाराज, काय सांगावें बरे; काय हें आपलें वैराग्य, काय हीं आपली तपस्या व काय हा आपला अनुग्रह! खरोखरी ईश्वरी कृपेमुळेंच आपलें आगमन झालें आहे. आपण काही झालें तरी जगाच्याच कल्याणाकरिता आहांत. तेव्हां आमची आपणास अशी आग्रहाची विनंति आहे की कसेंहि करून आपले पाय आमच्या वास्तव्यस्थानाला लागावेत.'

बोकोबा म्हणले 'हें काय, हें काय, ही विनंति कशाला? मी येथें तपाकरितां आलों आहें.'

उंदीर म्हणाले, ' महाराज आपण धर्मपर आहात, धर्मनिष्ठ आहात, भूतदया व अहिंसा हे तत्त्व पाळणारे आहात, तेव्हां कसेंहि करून आम्हां पामराचें रक्षण करावें. आम्हाला शत्रु फार ! विशेषतः आम्ही बाहेर गेलों म्हणजे आमच्यांतील बाल व तरुण यांना फारच उपद्रव होतो. तेव्हा कसेंहि करून दीनदुबळ्यांचें रक्षण करावें अशी हात जोडून प्रार्थना आहे '

उंदरांचें हें केविलवाणें भाषण ऐकून बोकोबाला बरें वाटलें व तो म्हणाला, ' गड्यांनो ' तुम्ही सांगतां हेंहि धर्मकार्य आहे व तप हा माझा धर्माचार आहे. पण एकट्याला या गोष्टी कशा साधतील ! तप करूं लागलो तर तुमचें रक्षण होणार नाही व रक्षणांत गुतलों तर तपश्चर्येत खंड पडेल! !

द्वयोर्योगं न पश्यामि तपसो रक्षणस्य च । २६ । अ. १६०

मित्रांनो, मी येथें केवळ तपाकरिता आलों आहें, तेव्हां हें लचांड माझ्यामागें कशाला लावता ? आतां तुमचा आग्रहच असेल तर नाइलाज आहे. कारण शरीर आहे तोंवर लोकसंग्रह केलाच पाहिजे. पण लक्षांत ठेवा, हा मी तपामुळें असा कृश झालो आहें, मला शक्ति नाहीं चालवत नाही. तुम्ही उचलूनच नेत असाल तरच मला येथें शक्य आहे. '

उंदीर म्हणाले, ' महाराज आपण कांही श्रम करूं नका, आपण नुसतें

बसून रहा. आपलें अधिष्ठान व भक्तिभाव यामुळेंच आमचें कार्य घडून येईल' हे शब्द ऐकून बोकोबा मनांत संतुष्ट झाले व मग 'मला उचला' असें म्हणाले.



श्रद्धाळू उंदरांनीं बोकोबाला आपल्या प्रांतांत नेलें
व आपलीं बिळें दाखविलीं !!!

झालें ! तपावर भाळलेले, ढोंगावर मोहित झालेले उंदीर प्रज्ञाहीन झाले व त्यांनी या बुवांना वाजत गाजत आपल्या खांद्यावरून मोठ्या समाधानानें आपल्या प्रांतांत नेलें. तेथें गेल्यावर उंदरांनीं आपलीं सर्व बिळें व आपला वृद्ध, तरुण समाज दाखवून दिला आणि ते निर्धास्तपणें आपल्या भक्ष्याकरितां नित्याप्रमाणें जाऊं लागले.

पहिले चारदोन दिवस जाऊं दिल्यावर या बोकोबानें हळुहळू उंदराचीं पोरें आपल्याशीं बागडण्याकरितां आलीं कीं तीं आत्मस्वरूपीं नेण्याचा उद्योग सुरू केला. तपानें वाळलेल्या आंतड्यांना स्निग्धता पाहिजेच होती

ती यामुळें मिठू लागली खताला चरावलेल त्याच ताड हळुहळू अनक उदराना गट्ट करू लागल

तत स पापो दुष्टात्मा मूषकानथ भक्षयन् ॥
पीवरश्च सुवर्णश्च दृढबधश्च जायत ॥ ३१ ॥ अ १६०

या थोक महाराजाच्या प्रतापामुळ त्या उदराची सख्या हळुहळू कमी होऊ लागली त्यामुळें त्या उदरात मोठी खळबळ उडाली ताही उदीर म्हणाल 'हा मामा लुच्चा आह हा तपस्वी नाही हा ढागी थाह, हा आमच्या भक्षणाकरिता आला आहे ! पण काही प्रज्ञाहत उदीर ज होत न म्हणत ' छ ! ह भव्य आहे काय ? तपस्वी मामा असे करील काय ! इतक्या लाबून जो मामा या गगातीरावर आला आह तो आम्हाला खाण्याकरिता का काय ?

शेवटा डिंडिक व कौलिक या दोन मधकानी मामाच्या पाळतीवर राहाव अस ठरल त्यातील कौलिक हा फार शहाणा हाता ता हा बोनोबा जय शौचास बसे तेथें जाऊन ती विष्टा तपासून यऊ लागला व डिंडिक हा खडपुच्छ असल्यामुळें घरी टपून बसला

दान दिवसानीच गमत अशी झाली की वृद्ध व बाल उदराबरोबर त्या डिंडिकालाहि बोनोबान गट्ट केल शपूट तुटल्यामुळें डिंडिक चागला ओळखण्याजोगा होता कौलिकान सव मूषकगणाला जमविल व म्हणाला गड्यानो, गल्या आठ दिवसात तो खडपुच्छ डिंडिकहि दिसत नाही आमची सख्या तर फारच कमी होत चालली आह आणि हा मामा मात्र लठ्ठ गाजरासारखा लाल आणि मजबूत होत आहे तव्हा हा आपला हितकर्ता आह का शत्रु आहे याचा विचार करा ! तुम्हाला मामाची विष्टा दाखवितो चला असे म्हणाला या मानभावी मामाची अगदी ताजी विष्टा त्यानी पाहिली तो त्यात उदराचे केस व हाडें आढळली कौलिक म्हणाला गड्यानो, कद मुळें व फळें खाणा त्याची ही विष्टा केसयुक्त अशी का असावी बर ?

न मूलफलभक्षस्य विष्टा भवति लोमशा ॥ ३९ ॥
अद्य सप्ताप्य दिवसान् डिंडिकोऽपि न दृश्यत ॥ ४० ॥ अ १६०

गड्यानो अहो हा मामा ढोंगी लुच्चा आहे हा तपाच्या

नावावर आम्हाला फसवितो आहे यानं केवळ ढोंग म्हणून हे तप आरंभिलें होतें इतके म्हटल्यावर ते सर्व उंदीर मावध झाले व पळून गेले मायावी बोकोबाने आता येथे राहाण्यात अर्थ नाही असे ठरवून पलायन केलें

मूषकासारखा लहान प्राणि जर अनुभवाने शहाणा होतो तर माण-सांनी निदान त्याचे अनुकरण तरी करावयास नको काय ?

## बुवाशाहीचें बडें प्रस्थ उपासनी बाबा

( अनेक सद्गृहस्थाच्या सूचनानुसार बुवाशाही विध्वंसक सघ स्थापन केल्याचे फेब्रुवारी १९३४ च्या किर्लोस्कर अर्थात घोषित केले त्यानंतर अनेकाच्याकडून अनेक बुवाबद्दल माहिती येऊ लागली त्यात उपासनीबाबा हे प्रमुख असल्यामुळें त्याच्या सबधाची माहिती स्वत बऱ्याच ठिकाणी जाऊन व काहींना किर्लोस्करवाडीत बोलावून जमा केली पाच हजार पृष्ठ छापील वाङ्मय वाचावे लागले ! व जवळजवळ तितकीच माहितीची भिडोळी उस्त-टावी लागली सारांश, आठ महिन्याच्या परिश्रमाने तयार केलेला पुढील लेख किर्लोस्करच्या ऑगस्ट १९३४ च्या अकात छापला या लेखातील कु प्रेमाबाई वर्दे याचे सबधाचा भाग त्या विवाहबद्ध होऊन ससारास लागल्यामुळें गाळला आहे.)

उपासनी महाराजाचे सर्व शिष्य त्याना 'बाबा' असेच म्हणतात, म्हणून प्रस्तुत लेखातहि महाराजांना उद्देशून 'बाबा' हा शब्दप्रयोग केला आहे या बाबाचे सातशें पानाचे 'उपासनी लीलामृत' र गो बरील हैद्राबाद यांनी लिहिलेले प्रसिद्ध झाले आहे तसच बाबा ज्या ज्या वेळी जें जें बोलले तेहि श्रद्धाळूपणाने तारीखवार टिपून घेऊन 'साई वाक्सुधा' या नावाने १९२३ ते २५ अखेरीची मोठ्या पाच भागात सर्व प्रवचन छापलेली आहेत याशिवाय इतरहि छापील वाङ्मय पुष्कळच आहे हे वाङ्मय, बाबाविषयी अनेका कडून आलेली माहिती, बुवाच्या नादी लागून पोळलेल्या व पश्चात्ताप पावलेल्या अशा कित्येक भक्तगणाकडून आम्हास समक्ष कळलेला वृत्तात आणि प्रत्यक्ष आमच्या प्रतिनिधीने जें समक्ष जाऊन पाहिले, त्या सर्वांच्या आधारेच प्रस्तुत लेख लिहून आम्ही आमच्या वाचकास सादर करीत आहों

उपासनीबाबाचे वाडवडील नाशिक जिल्ह्यातील सटाणे येथे राह-

णारे होत. बाबांचे पूर्वज सर्व विद्वान् दिसतात. परंतु गोविंदशास्त्र्यांचा हा मुलगा काशिनाथ त्याला अपवाद दिसतो. मास्तरांनी चोप दिला म्हणून प्राथमिक शिक्षणास त्यानें रामराम ठोकला! आजोबांनी याचें लवकर लग्न केलें! घरची गरिबी म्हणून वैतागून देहत्यागाचाहि यत्न यानें केला. अल्प वयांतच एकामागून एक दोन बायका मेल्यावर तिसरेंहि लग्न झालें. त्यानंतर सांगलीच्या पाठशाळेंत येऊन या काशिनाथानें वैद्यशास्त्र व व्याकरण यांचें अध्ययन केलें!. उमरावतीस या काशिनाथपंतानीं श्रीमंत दादासाहेब खापर्डे यांच्या आश्रयानें एक दवाखाना काढला व 'भेषज् रत्नमाला' या नावाचें मासिकहि कांहीं वर्षें चालविलें. आठ नऊ वर्षें उमरावतीस काढल्यावर शके १८३२ पासून रा. काशिनाथपंत हे महाराज होण्याच्या मार्गाला लागले असें दिसतें. ॐकारेश्वर व अशाच कांहीं ठिकाणी संचार झाल्यावर काशिनाथपंत हे शिरडीस आले. शिरडी येथें श्री साईबाबा हे राहात असत. त्यांचेपाशीं यांचा कांहीं काल गेला. चार वर्षें तेथेंच राहिलें पाहिजे, अशी साईबाबांची यांना आज्ञा होती. शिरडीस असतांना श्रीमंत दादासाहेब खापर्डे हे या उपासनीबाबांना पंचदशी सांगत असत. अत्यंत अवघड विषय सुबोध व रसाळ भाषेत सांगणारा दादासाहेबांसारखा वक्ता असतानाहि उपासनीबाबांच्या गळ्ठ डोक्यांत कांही प्रवेश होत नसे. याबद्दल त्यांना वाईट वाटे. शिरडीस असतांनाच यांचें तृतीय कुटुंब वारलें. साईबाबांनीं एके दिवशी 'तुला आतां कळतां कळतां कळेल. अरे, कळावयाचें काय? आपल्या उपयोगाचें एवढेंसें आहे.' असें म्हणून बोटाचें एक कांडें अंगठ्यावर ठेवून दाखविलें आणि मस्तकावर हात ठेवले! झालें! आणि तेथून हे वैद्य काशिनाथशास्त्री उपासनी हे उपासनी महाराज बनले!

बाबांनीं यानंतरें बुवाशाहीचें जाळें हळूहळू पसरण्यास प्रारंभ केला. लोकहि असे भोळसर व श्रद्धाळू असतात की, ते कुणाच्याही मागें एकदा लागले की त्याला 'महाराज' बनवितात. ज्योतिषी व सामुद्रिक यांनी येऊन बाबांना सिद्धपुरुष ठरविलें. ईश सृष्टींतील गूढ अनुभव बाबांना आला; अशा वार्ता त्यांच्या शिष्यशिष्यिणी बोलू लागल्या. बाबांच्या बुद्धीत, डोळ्यापुढें व स्वप्नांतहि सिनेमाच्या फिल्मप्रमाणें अनेक अद्भुत वर्तुळें

दिसू लागली व बाबा हे उन्मत्तावस्थेमध्ये गेले ! कधी कधी बाबा अहमदनगर या शब्दावर अह–मदन–आणि गर म्हणजे अहंकार, वासना हेच कोणी विष अशा कोटया करून शिष्यगणावर छाप पाडू लागले; तर कधी कधी आपल्या अंगी स्त्रीत्वाचा सचार झाला असे दाखवून स्त्रीत्वाचे चाळे करून, कुंकू लावून, बांगडया भरून, लुगडेंहि नेसू लागले अशल्या सर्व गोष्टींचे कौतुक करणारे शिष्यगण भेटले म्हणजे मग कोणाचेहि महात्म्य वाढावयाला उशीर लागत नाही, तसेच यांचेहि झाले शिर्डी, नागपूर व खरगपूर या भागात बाबाचे वास्तव्य साधुपणाच्या पहिल्या दशेत, झाले तेथूनच त्याच्या प्रसिद्धीला सुरुवात झाली, असे म्हटले तरी चालेल तिकडे गेल्यापासून बाबा नग्न राहू लागले, आणि विष्टा मावडणे, चिवडणे, अगाला फासणे, चाटणे, मोरीतील पाण्याने चूळ भरणे, गटारात जाऊन, लोळणें व उभें राहणे असले प्रकार करु लागले बुवा ज्या खापरीत शौच करीत, त्यातच भिक्षेचे अन्न घेत व खात (पृ ३१२) सत्पुरुष म्हणजे वेडा, पागल अगदी मूर्खासारखा वागणारा, तोंडाला येतील तसल्या शिव्या देणारा, उघडया नागडयाने पाहिज तसा वावरणारा, कुठेहि काहीहि, कसलेहि खाणारा व तसेच बोलणारा असा असतो, अशी या लेखकाची समजूत दिसते व त्याप्रमाणेच त्याने बाबांचे लीलामृत प्रकरण ९ ते १६ पर्यंत रगविलेले आहे महारवाडा, भगीवाडा येथेंहि बाबा जात, तेथेंहि लीला करीत आणि व्यापारी, पेन्शनर, रेल्वेतील नोकर हे सर्व आपापल्या स्त्रियासह याना भजत त्या नग्न बाबाना न्हाऊ घालीत (पृ २७७) आणि प्रेमालिगनेहि देत असत (पृ ३८९) बाबाना मुळव्याधीचा विकार असल्यामुळें रक्त पडणें आणि शौचाला न होणें, हे एक मोठेच प्रकरण असल्यामुळे शौचविधीच्याहि अन्याच लीला ग्रथामध्यें वर्णिल्या आहेत बाबाचे पाय ज्या पायखान्याला लागत त्या पायखान्याची पूजा बायानी केली, व बाबाच्या खाणण्यावरून मोरी हेच बाबाचे तोड समजून मोरीत चहाच्या किटल्या ओतल्या, इतकेंच नव्हे तर चैत्र शुद्ध प्रतिपदेच्या दिवशी सक्रांतीचा सणहि बाबानी सांगितल्यावरूनच स्त्रीपुरुषानी पाळला ! लिंब खाण्याचे ऐवजी तिळगूळ खाऊन गुढयाची वाणें दिली आणि ध्वजावदन न करिता तिलतर्पण करून सक्रांतीनिमित्त श्राद्धहि केले अंधश्रद्धेचा कडेलोट म्हणतात तो हाच

आणि सत्पुरुषाला प्रसन्न करून घ्यावयाचें म्हणजे आपली 'बुद्धि गहाण ठेवून अंध श्रद्धेनें सत्पुरुष जें बेडेंबांकडे सांगेल ते ते सर्व श्रद्धेनें ऐकावयाचें अशी जी लोकांची समजूत आहे तिचें प्रत्यंतर (पृ. ३९८) उपासनी लीलामृतांतील प्रत्येक पानावर दृष्टीस पडतें.

एक बाई बाबांकडे पूजा करावयास आली. बाबा म्हणाले, ' पायाची पूजा न करतां माझ्या गुदाची पूजा कर; कारण जगात सर्व गूच आहे, आणि गुदापासून जग झालें. ' झालें ! त्या बाईंनीहि म्हणे तसेच केलें ! धन्य - ती बाई व धन्य तो बुवा ! यात ईश्वरप्राप्तीचा मार्ग कोणता हें कळणें कठिण आहे ! (पृ. ३५७).

बाबांच्या प्रवचनामध्यें अनेक विषय आहेत. त्यातल्या त्यात कन्या-अर्पण, कुमारी पूजन, स्त्रीपुरुषांची जननेंद्रियें आणि मलमूत्रें यांची पुनरुक्ति फार झाली आहे आणि सर्वत्र ठराविक कोटया केलेल्या आहेत, त्या कोटया युक्ति व भाषाशास्त्र या दृष्टीनें किती योग्य आहेत हें वाचकांनीच पाहावें! ' न अरिः विद्यते सा नारी ' शत्रु जिला नाही अशी, ' कम् नीयते सा कन्या' म्हणजे ब्रह्मप्रत नेणारी, भंग ज्याचा होत नाही तो भंगी, अर्थात् ईश्वर, ' गाम् ददाति ' म्हणजे गांड, ' गुवम् ददाति' म्हणून गुद, असल्या अश्लील ग्राम्य कोटयांचा उल्लेख करणेंहि आमच्या मोठें जिवावर येतें; पण त्या-खेरीज बाबांच्या विद्वत्तेची खरी कल्पना येण्यासारखी नसल्यानें आम्हांस तसें करणें प्राप्त आहे.

बाबांच्या चरित्रांत त्यांच्या भक्तगणानी अनेक चमत्कार वर्णिले आहेत. बुवा आणि चमत्कार म्हटले की, कां व कसें हे विचारावयाचेंच नाही! म्हणून पाहिजे ते चमत्कार दडपून द्यावेत असा प्रघात पडलेला आहे. या प्रज्ञाहत भक्तांना एवढें कळावयास पाहिजे की, जो एवढें पाहिजे तसे घट-वित करतो त्याला आपल्या मूळव्याधीची व्यथा कां घालवितां आली नाही? मूळव्याधीच्या शस्त्रक्रियेकरिता बाबाना मिरजेच्या वॉनलेसकडेच यावें लागलें! आणि तेथेंहि बाबाचा प्रभाव न पडल्यामुळें मिरजेच्या सरकारी दवाखान्यांत बरे होण्याकरितां त्यांना पडावें लागलें. ही जर वस्तुस्थिति आहे तर बाबांच्या दर्शनाने व स्पर्शानें, उदीनें व प्रसादाने अनेकांचे अनेक रोग गेले, अनेकांना बरें वाटलें इत्यादि वर्णन करण्यांत काय हंशील आहे ?

बावाना जर स्वत चा दुरभोग टाळना येत नहीं तर ते दुसऱ्याचा कसा टाळणार ?

## पुरुषांचें हरतालिका पूजन !

उपासनीबावाचे सर्वच बाहो और ! हरतालिकेची पूजा स्त्रिया करतात, असे असताना उपासनीवावा हे व्रत पुरुषांचेहि आहे असे म्हणतात, आणि पुरुषाना लुगडी नेसावयास लावून स्वत शकर होऊन पूजा करून घेतात हा काय चमत्कार पहा ! ! (पा ६३७) 'हरतालिकेच्या दिवशी शेंकडो भक्तमडळी साकोरीस होती, त्यातील सर्व पुरुष लुगडी, चोळ्या, बागड्या, गळेसर, कपाळास कुंकू असे स्त्रीवेष घेऊन आणि पूजा-साहित्य घेऊन दुपारच्या महाराजाच्या आरतीच्या वेळेस महाराजाच्या झोपडीत सर्व जमले महाराज स्वत हरतालिका व प्रत्यक्ष शकराची मूर्ति अस समजून त्या वेषधारी सर्व स्त्रियानी महाराजाची पूजा करून नेहमीप्रमाणे त्या दिवशी आरती झाली हा अपूर्व प्रसग पाहून सर्वास मोठी गमत वाटली व ह्याचा परिणाम आपल्याला परमार्थ दृष्टीने फारच चागला होणार अहे असे ते मानू लागले ! त्यावेळी स्त्रीवेषांत बापूसाहेब जोग, वकीलमामा दत्तोपत पिंसोळकर वगैरे मोठमोठी ब्राह्मण मडळी शिवाय मोठमोठे अधिकारी, पारशी गुजराथी, मद्रासी वगैरे सर्व पुरुष-मडळी होती' तात्पर्य, बावाच्या चरित्रात शास्त्र व तर्कविरुद्ध अशा गमती पुष्कळच आहेत !

## पैसे काढण्याचे प्रकार

कोणतेहि महाराज स्वत अगदी विरक्त आहो असं दाखविनात व पैशाला शिवत देखील नाहीत ! बरावरच आहे ! शिष्य व कारभारी यानी पैशाचे व्यवहार परस्पर ठरविले आणि देणेघेणे केले म्हणजे महाराजाना द्रव्याला स्पर्श करण्याची तरी काय जरूरी आहे ? द्रव्याला स्पर्श न करता त्यावर मालकी स्थापिता आली आणि उपभोग घेता आला म्हणजे बस्स आहे पान ५९३ मध्ये लेखक लिहितात की, 'महाराज पुढें आलेल्याला हात न लावता उठून जातात मग कोणी तरी ठरलेला मनुष्य (कारभारी) त्याची व्यवस्था पाहतो व त्याची व्यवस्था महाराजाच्या आज्ञेप्रमाणें होते.'

महाराजांच्या मठात काहीही न घताच तीनचार लाखांची मिळकत झाली आहे ! जमाखर्च, कोर्टें, कचेऱ्या वगैरे सर्व शिष्यगणच पाहातात साकोरी येथ बावाच्या दर्शनास शकडो लोक जात असतात त्यात धर्मभोळे, श्रद्धाळू व महाराज म्हणतील ते खरे असे समजणारे पुष्कळ लोक असतात अशा येणाऱ्या–जाणाऱ्यांना चाचपून पाहून कोणाच्या मेंदूचा पेच किती ढिला आहे हे पाहण्याचें काम बावाच्या भोवतालचे शिष्य करतात

गव्हनराना भेटण्यास कोणी मनुष्य गला तर त्याचा सव इतिहास जमा तय असतो व तो लाटसाहेबाच्या कानावर जसा पूर्वी घातला जातो तसे यथ होते असे भक्त आल्यावर महाराज एकदम 'या शंकरराव या गजानराव, या माधवराव, काल स्वप्नात मी आपणास पाहिलच आहे, आपण अमुक अमुक सत्कर्मे करीत आहेत व ईश्वराची तुमच्यावर कृपा आहे' असे म्हणून महाराज अशा लोकांना सूप चढवितात आणि ज्ञान, व्रत व धनसतर्पण याचे महत्त्व सांगून अनेक गोष्टी करावयास लावतात त्याचा एक अगदी घडलेला मासला यथे देतो

वृद्ध बाई–महाराज, आपले दर्शन झाले, मी कृतार्थ झाले मला साक्षात् दत्तमहाराजच भेटले

बावा–अहो बाई आलात फार चागल झाल मी दत्तमहाराज नव्हे पण काल स्वप्नात दत्तमहाराज आलेले मी पाहिले त्याच्या शजारी अगदी आपल्यासारखीच वृद्ध व काळी स्त्री होती दत्तात्रय तिला म्हणाले की, आमची सेवा कर म्हणजे आम्ही तुझ्याजवळच आहोत

वृद्ध बाई– ( आश्चर्याने ) आपल्या स्वप्नात माझ्यासारखी बाई व दत्तमहाराज ! मग आता आपली आज्ञा तरी काय ?

बावा–आज्ञा ती काय ! हजारबाराशे रुपये खर्चून श्रीदत्ताच्या पादुका यथे स्थापन करून त्यांची सेवा करीत बैस. तुला सेवा न करता आली तर दरमहा दहा रुपये देऊन एक ब्राह्मण ठेव

वृद्ध बाई–एवढी मोठी रक्कम मला शक्य नाही तेव्हा काय करू ?

बावा–शक्य नसावयाला काय झाले ? तुझ्या बायकाच्या जवळ पैसे नसले तरी जिन्नसपान्नस असतात तेव्हा एकदोन जिन्नस मोडून दे हजार रुपये माझ्याकडे

शवटी बावानी हजार रुपये निजवडून काढले दोनशे रुपये खर्चून पादुका बसविल्या असे सागितले व बाकीचे आठशे रुपये ब्रह्मस्वरूप झालेल्या या बावानी ब्रह्मार्पण केले !

साजूक व घाऊक गिऱ्हाइके पाहून, व्रते सागून, उद्यापनाकरिता आधी पैसे मागून घेण्याची सुन्दर हातोटी बावाजवळ आहे पतिनिधनानतर धर्म-भोळ्या सपन्न विधवा स्त्रिया बावाकडे येतात पतिविरहानलात जळत असल्यामुळे बावाच्या प्रवचनाचा त्याच्यावर परिणाम होतो हळुहळू श्रद्धेमुळे बिचाऱ्या आपले डवोले बावाच्या स्वाधीन करतात व पैसे सपल्या-वर स्वतःची स्थिति भोलकरणीपेक्षाही वाईट करुन घेतात सर्वस्व गमाव-लेल्या,पश्चात्तापाने पोळलेल्या अशा किती तरी विधवा साकोरीचा आश्रम सोडून शिव्याशाप देत चालत्या होत असतात

एकदा एक श्रीमत भाविक गृहस्थ काशीयात्रेच्या तयारीला लागले दर-म्यान एकाने त्याना एक उपासनी-चरित्र वाचावयास दिले, ते वाचल्यानतर काशीला जाण्यापूर्वी साकोरीस जावे असे त्यानी ठरवले व ते गेले या गृहस्थाची माहिती शिष्यानी आगाऊ जमवून महाराजाना सागितली होती हा गृहस्थ आल्यावर बावानी काल रात्री मला स्वप्न पडले अशी प्रस्ता-वना करुन खडानुखडा माहिती अंतर्ज्ञानाने सागितली ! त्या गृहस्थाचा विश्वास बसला व आता काशीला कशास जाऊ, असे म्हणून त्याने तेथेच गुरुपदी पिंड अर्पण केले व १००१ रुपये दक्षणा दिली तेव्हापासून पिंड अर्पण करणे, श्राद्ध करणे हे साकोरीस सुरू झाले आहे काशीयात्रेनिमित्त होणारा सर्व खर्च त्या गृहस्थाने बावाच्या चरणी अर्पण केला हा गृहस्थ पुढे दरमाल तेथे वाऱ्या करू लागला, धर्मशाळेकरिता याने पुढे बावाना सोळा हजार रु दिले; पण त्यानी ती न बाधताच बाधलेली धर्मशाळा तुमची आहे असे सागितले असेच निरनिराळया रूपाने पन्नास हजार रुपये हया गृहस्थाकडून काढले आहेत, असे समजते !

## पिंजरा प्रकरण !

जितका विक्षिप्तपणा अधिक तितके साधुत्वहि श्रेष्ठ दर्जाचे अशी लोकात समजूत आहे अर्थात् साकोरीस बावानीहि एकदा असा विक्षिप्त-

पणा केला की, एक वेळवाचा पिंजरा तयार करून त्यांत त्यांनी स्वतःला अडकवून घेतलें. महाराज पिंजऱ्यात अडकले असे समजतांच भक्तगणांनी मोठा उत्सव सुरुं केला, नामसप्ताह सुरू केले व पुढे त्याच पिंजऱ्यांत महाराजांच्या अंगांत स्त्रीत्वाचा संचार होऊ लागला झालें! महाराज



स्त्रीवेषधारी बाबा

लुगडें नेसून, मळवट भरून, काकणे घालून पिंजऱ्यात बसल्यावर मग काय विचारता! स्त्रियांनीं लुगडी, खण, नारळ, सोन्यामोत्यांचे दागिने असे सर्व भराभर अर्पण केलें!

एका बाईनें सोन्याच्या बांगड्या बाबाच्या हातात घातल्या. त्यावर ते म्हणाले, 'या बांगड्या आल्या! मी बायको असल्याचा अनुभव मला वरचेवर येतो. आज कृष्णजन्मानिमित्त या सोन्याच्या बांगड्या चाळंतविडा म्हणून आल्या आहेत. मला सौभाग्य पाहण्यांत पाहणारांचें सौभाग्य कायम राहण्याचा उपाय आहे. माझें सौभाग्य अखंड आहे. *मी अखंड सौभाग्यवती आहें; म्हणून जिनें हें दिलें तिचेंही सौभाग्य* कायम होऊन जाईल. वरें राहूं दे.' (वाक्सुधा, ऑगस्ट १९२४).

दुसऱ्याचें द्रव्य साळसूदपणें गट्ट करण्याच्या युक्त्या जगांत कशा आहेत याचा हा एक नमुना आहे.

एकदा एका बाईने महाराजाना मंगळसूत्र अर्पण केले त्यावर महाराज म्हणाले, 'काय सांगावे व काय करावे ? लोक म्हणतील किडुक मिडुक बाबा काय जमवीत बसले ? परंतु न घ्यावे तर त्या गरीब बाईचा तरी उद्धार कोण करील ? ती गरीब आहे म्हणून तिचे मला घेतलेच पाहिजे ! ' (साक्षुधा, ऑगस्ट १९२४) कोण हा वनवाळूपणा व काय ही उद्धाराची तळमळ ! गरिबांचे पैसे व बायाबापड्यांची चीजवस्त उपटून त्यांचा उद्धार करण्याची ही कला मोठी थोर आहे ! कारण सर्वस्व हरण केल्याशिवाय अनुग्रह होत नाही ! स्त्रियांकडून दागिने, उपट, गोरगरिबांकडून द्रव्य घे, असा क्रम चालतोच ! पण याशिवाय द्रव्य मिळविण्याच्या आणखी अनेक कला आहेत

पुष्कळ आईबाप आपल्या मुलीसह तेथें आले म्हणजे बाबा व त्यांच्या भोवतालचे गण मुली ठेवण्याबद्दल हळूच गोष्ट काढतात नव्या अल्लड मुलींना त्या टिपऱ्या, तो नाच आणि एकंदर प्रकार प्रथम बरा वाटतो, व त्या तेथें राहू इच्छितात पुढें बाबा हे काही दिवसांनी प्रत्येक मुलीमागें खर्चाकरिता दहा रुपयांची मागणी करतात व कोणी भवन आले म्हणजे कन्याकुमारीपूजनालाहि पैसे मागतात तात्पर्य, पैसे मिळविण्याची चागलीच वाव तेथें आहे गोकुळ अष्टमी, सनात व गि ३ ।। दिवस फारच प्राप्तीचे आहेत गोकुळअष्टमीस गृहस्थ बाबाच्याकडे अनेक स्त्रिया गोपीभावाने त्यांना सर्वस्व अर्पण,प्रेमचा सहवास मिळावा दिवशीं बाबा स्वत च (सनात होऊन) स्त्रीस्वभुमति देताच त्याने तुळशी- स्त्रिया त्यांच्या चरणीं आपली सौभाग्यचिंतान घातलेले मंगळसूत्र वगैरे दिवशी बाबा साक्षात् दिगंबर शंकरसह स्वस्त्रीचे महाराजाच्या चरणावर पूजा करून घेतात शास्त्र व्हावा म्हणून या गृहस्थानं त्र्यंबके- स्थावर इस्टेटहि बाबांनी केले। (पा ६४६) तथापि चोपगीर्ती जी लोकांनी याबद्दल बाबांच्यावर गोदावरी ही मुंबईच्या एका वकिलाच्या दावा कोळघाना अनुकूल झगरदोन वेळा महाराजांकडे गेल्यावर या सुस्वरूप बाबाच्या नावावर अगेला, म्हणून ती पुढें नवऱ्याकडे जाईना. वारवातेंत पुष्कळच आहेत पफिनविरमाबद्दल' नोटीस दिली व तिची मागणी करीत नाहीं लोक फक्त घाबरले व "रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति" असे

वरून त्या गृहस्थाना बरीच मोठी रक्कम पुढ बाबानी दिली असे बाहेर भक्तगण सांगतात हा गृहस्थ पुढ या बाबकोशी जमणार नाही असा विचार करून निघून गेला



बाबा व त्यांच्या पारमार्थिक पत्नी गोदावरीबाई

याप्रमाण ही बाइ आपलाशी केल्यावर मग ती सती योगिनी अशी झाली आहे तिजबद्दल बाबानी हिला वाचासिद्धि प्राप्त होईल असे पुष्कळ भविष्य केल होत, पण अद्याप त्यातील काहीही खर झाल नाही असे भक्तगण सांगत आहत ही खास गोदावरी अनुग्रहि तिचे पावनत्व अद्याप जगाला दिसत नाही! ही दररोज निरनिराळी जरीची पातळ नेसून केव्हा पासोटा घालून केव्हा घालीत नाही कानात हिऱ्याच्या कुड्या, हातात व गळ्यात सोन्याचे दागिने, नाकात चमकी अशा शृंगारानेच ही बाई मारुती पान मग चांदीच्या पिंजऱ्यात बसलेली असत पाय बाहेर काढल्यावर फुल वाहून भक्त पूजा करतात पिंजऱ्यात बसून तिला कंटाळा आला की येग यतो भक्तगण गोदावरीबाईंची समाधि लागली असे कौतुकाने म्हणतात! महाराज आल्यागेल्याना हिचा महिमा सांगून सेवा करण्यास प्रवृत्त करतात महाराजाचा बराचसा वेळ या बाईच्या व या बाईना गप्पागोष्टी करण्यात जातो

# बाबा व भक्त यांच्या जबान्या

मागल्या प्रकरणांत दिलेला उपासनी बाबावरील लेख प्रसिद्ध झाल्यावर कोपरगांवचे एक उपासनीभक्त श्री. मांगरे वकील यांनी श्री. दिवेकर शास्त्री व किर्लोस्कर यांजवर बदनामीचा दावा कोपरगांव येथें दाखल केला. या दाव्याची इत्थंभूत हकीकत किर्लोस्कर मासिकांत व इतर वृत्तपत्रांत आली असल्यामुळें ती येथें न देतां, फक्त बाबांच्या जबानींतील महत्त्वाचा भाग येथें देतों. मांगरे याचेतर्फे रा. वैद्य वकील (कोपरगांव), यांनीं बाबांची सर तपासणी ता. २६।१०।३४ रोजीं केली. नगर येथील मध डिव्हिजनल मॅजिस्ट्रेट मे. देहेजिया आय्. सी. एम्. याच्या कोर्टामध्यें शपथविधीनंतर उपासनी म्हणाले:—

## उपासनी बाबांची जबानी

ता. २६।१०।३४

' माझें नाव उपासनी. मी बापाचें नांव लावीत नाहीं. जात स्वतःस नाहीं. धर्मबिर्म कांहीं नाहीं. वय ६६–६७, धंदा धर्मप्रवचन व सदुपदेश करण्याचा. राहाणार साकोरी. साकोरी येथें माझें मकान आहे. मठ नाहीं. मी स्वतःस पुष्कळ वर्षे पिंजऱ्यांत अडकवून घेतलें होतें. किर्लोस्कर मासिक मला ऐकून माहीत आहे. भक्त व शिष्य यांत मानला तर फरक आहे. सद्गुरूपासून जो मंत्रोपदेश व गुरूपदेश घेतो तो शिष्य.

पुरुषांना लुगडें नेसविणें, बांगड्या भरणें, कुंकू लावणें, स्त्री-वेष घेवविणें हें सर्व माझ्या दृष्टीनें रास्तास्त आहे व हें फार दिवसांपूर्वी मी केलें आहे. ' बाबांचे पाय ज्या पायतान्यास लागत त्याची पूजा बायकांनीं केली ' हा मजकूर खरा व योग्य आहे, व हें सर्व परमार्थाच्या दृष्टीनें

करावें लागत तुमची व्यावहारिकाची दृष्टि निराळी असते मी जेथे वसतो त्या जागेची लोक पूजा करितात

चहा मोरीत मी ओतला हे खरे आहे. चैत्र शुद्ध प्रतिपदच्या दिवशीं संक्रातीचा सण पाळला हे खरे आहे हरतालिकेच्या दिवशी पुरुषाना स्त्री वेष देऊन मी पूजा करविली ज्या गोष्टींची जरूर आहे त्या मी करविल्या-

परमार्थाच्या दृष्टीने असे करणें जरूर आहे. परमेश्वरप्राप्तीचा हा एक मार्ग आहे शास्त्रदृष्ट्या ही गोष्ट योग्य झाली आहे त्यांनी ते मूर्ख म्हणून केले नसून शहाणे म्हणूनच केलें मी पिंजऱ्यात अडकून बसतो व स्त्रीवेषहि पुष्कळ वेळा धारण करितो.

लोक मला आपण होऊन मुली देतात अहो, माझे वय आता संसार करण्याचे आहे काय ? मी मुलीशी कशी बरे लग्न लावून घेईन ? व त्या तरी असल्या म्हाताऱ्याबरोबर कशा लग्न लावतील ? उपासनी लीलामृतात जें कांही लिहिले ते खरे आहे लीलामृतातील अर्पणविधीचा मजकूर खरा आहे

मी आजारी असताना गोदावरीच्या नवऱ्यानें तिचें दान केलें हे खरे आहे त्याना ब्रह्मस्वरूपिणे करावे असे मजविषयी वाटले असल्यास त्यानी तसें म्हणून उदक सोडलें असेल लीलामृतात यासंबधानें जे लिहिले आहे ते खरे आहे बाळकृष्ण हातात घेऊन मी मुलीचा संबंध बाळकृष्णाशीं जोडून दिला आहे. व ते करणें शास्त्राधार योग्य आहे-

! स्त्री ही एक अज्ञानी व श्रेष्ठ भोग्य वस्तु आहे, हे खरे आहे ब्रह्माप्रत नेणारी ती कन्या, भग ज्याचा होत नाही तो भगी, अर्थात ईश्वर इत्यादि कोटचा मी केल्या हे खरे आहे. लिंगपूजा करून घेतो माझी कृष्ण समजून गोकुळअष्टमीस, संक्रात म्हणून संक्रातीस व शिव म्हणून शिवरात्रीस लोक पूजा करतात, लिंग, पाय, आदींची पुजा व त्याप्रमाणे स्त्रियाहि पूजा करतात

' मी बायको असल्याचा अनुभव मला वरचेवर येतो आज कृष्ण जन्मानिमित्त या सोन्याच्या वागड्या वाळतविडा म्हणून आल्या आहेत. मला सौभाग्य वाहण्यातच वाहणारीचे सौभाग्य कायम राहील

## माझें सौभाग्य अखंड आहे

मी अखंड सौभाग्यवती आहे म्हणून जिने हे दिले तिचेही सौभाग्य कायम होईल' इत्यादि मजकूर खरा आहे

(सरतपासणीत बाबानी लिखातील बहुतेक गोष्टी मान्य केल्या त्यानंतर आरोपी दिवेकर शास्त्री व किर्लोस्कर याचे वकील श्री नानासाहेब सप्तर्षी व दादासाहेब कोल्हाळकर यानी उपासनीची उलट तपासणी केली उलट तपासणींतील जबानीचा महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे आहे)

## • उलट तपासणींतील जबानीचा सारांश

'मी धर्मशास्त्र वाचले नाही वेदात वगैरे पढलो नाही तें वाचावें लागत नाही, सद्गुरुकृपेनें सर्व कांहीं समजतें जळगाव येथें १९१७ साली असताना औषधासवधी खटला होऊन चार महिने मला साधी कैद झाली मी शिर्डीपासून साधूपणात आहे तेथें मला अद्भुत वर्तुळ गुरुकृपेने दिसू लागली तदनतर मी उन्मत्तावस्थेत होतो शिर्डीस असताना स्त्रीअवस्था उत्पन्न झाली साकोरीस लुगडे नेसणे, बांगड्या भरणे, कुकू लावणे हे सुरू झाले त्या अवस्थेंत तसें होण्याची जरूरी असते शिर्डीनंतर खडगपुरीं गेलो तेथें एक वर्ष होतो तथ विष्टा चिवडणें, अगास फासणें, मोरीचे पाणी पिणें, गटारात लोळणें, इत्यादि प्रकार मजकडून झाले ज्या खापराच्या भांड्यात मी शौच करीत होतो, त्यातच भिक्षा मागत असे त्या वेळीं नग्न स्थितीत राहात होतो तेथें स्त्री-पुरुषानी मला प्रेमालिंगन दिलें व न्हाऊ घातले, हे खरें आहे. उपासनी लीलामृत मला माहीत आहे त्यात जे लिहिलें, त खरच असल खडगपुरी मामी नावाची बाई होती तो मला नग्नावस्थेंत आलिंगनें देई व मिठ्या मारी खरा, पण ती बाई वृद्ध होती त्या वेळी मला भान नसे मामीनी चहा मोरीत ओतला तिने मजकरिता पत्रावळीचे ताट भरुन आणले, व ते मी तिला उकिरड्यावर टाकण्यास मागितलें. सद्गुरूवर किती श्रद्धा आहे, हे पाहण्याकरिता असें करावे लागते पाडव्याच्या दिवशी मकरांतीचा सण पाळला हे खरे शास्त्राप्रमाणे त्या दिवशीं लिंब खाण्याची वहिवाट आहे व मकरातीच्या दिवशी तिळगूळ देण्याची व खाण्याची वहिवाट आहे. याला शास्त्राधार नसला तरी त्या गोष्टी मी करण्यास सांगितल्या म्हणून तो धर्मशास्त्र असे म्हणताइ पण

माझ्या भक्ताना मी जें सांगेन तेंच धर्मशास्त्र ह्याशिवाय त्याना शास्त्र नाही विठ्ठेची पूजा,पायखान्याची पूजा करण्यास मी सांगितले असेल माझ्यावर त्याची भक्ति म्हणूनच त्यानी केले असेल

स्त्रिया या भोग्य वस्तु आहेत त्याना प्रारब्ध व संचित नाही 'ब्रह्मस्वरूपिणे वराय' असे म्हणून मुलगी अर्पण केल्यास आईबापाना मोक्ष मिळतो, असे मी प्रतिपादन केले आहे डॉक्टर, वकील, इस्टेटवाला याना कन्या देणे म्हणजे आईबापानी खड्यात (अधोगतीत) पडणे होय स्मृतीत ब्रह्मस्वरूप झालेल्याला कन्या देण्याचा निषेध केलेला आहे की नाही हे मी पाहिले नाही 'लक्ष्मीनारायणस्वरूपिणे वराय' असा संकल्प आहे की नाही मला माहीत नाही संन्यासी, विरक्त वगैरेना मुली द्याव्यात की नाही हे मी वाचले नाही मला धर्मशास्त्र येत नाही मुलगी ही ब्रह्मवेत्त्याला द्यावयाची नाही तर द्यावयाची कुणाला? धर्मशास्त्रात काही असले तरी मी म्हणतो तेंच माझ्या भक्ताना धर्मशास्त्र !!'

२७।१०।३४ रोजी पुन जबानी सुरू झाली तेव्हा बाबा म्हणाले, 'मतो गोदावरी व इतर मुलींची लग्नें मी गोपालकृष्णाशी तुलसी-विवाहपद्धतीने लावली त्यास शास्त्राधार आहे परंतु तो आज मला सांगतां यणार नाही अर्थात् यामध्यें मुलींचा व त्याच्या वाड-वडिलाचा ईश्वराशी संबध जोडण्याकरिता ही कल्पना काढली मोक्षप्राप्ती-करिता अन्य मार्ग आहेत परंतु मला हाच मार्ग श्रेयस्कर वाटला या पंचकन्या तुलसीप्रमाणे बालकृष्णाच्या विवाहित स्त्रिया आहेत खडावास ज्याप्रमाणे मुली वाहतात, त्याप्रमाणे ही पद्धत समजली तरी चालेल या सर्व मुलींची वयें १६ ते २१ च्या दरम्यान आहेत

त्यानी जर पुन्हा लग्न केले तर परमेश्वर व मनुष्य यांच्यात जो फरक आहे, त्याप्रमाणे त्या होतील परमेश्वराशी ज्यानी लग्न लावले त्या माणसाशी कशा लग्ने लावतील? व जर त्यानी तसं केले तर त्या ईश्वराला सोडून खाली आल्या असे होईल त्याच्या निर्वाहाची व्यवस्था अद्याप केलेली नाही पुढें ती आपोआप होईल त्याचे आईबाप अगर कोणीहि त्याच्या निर्वाहाची व्यवस्था करील परमेश्वर सत अवस्थेत असल्याने त्याला जी दिली ती सती म्हणूनच ती सती अखंड सौभाग्यवती होत.

कन्याकुमारी म्हणजे ब्रह्मचारी अवस्थेत राहाणारी स्त्री. सांई वासुधा वर्ष दुसरें, अंक १ ते १२ मधील २७-३-१९२५ च्या अंकांतील हा उतारा बरोबर आहे. तो उतारा असा 'त्यांना तत्त्व समजून गेलें की, ती पत्नीपासून पुत्रापर्यंत सर्व एकरूप पाहूं लागली; मग त्यानें कितीहि स्त्रिया केल्या तरी तो ब्रह्मचारीच व ती कन्याच. त्याचा संबंध व सहवास करणारे सर्व ब्रह्मस्वरूप होतात. त्या तशा स्त्रीनें इतर पुरुषांशीं संबंध ठेवला तरी ती ब्रह्मचारी (कन्या) परंतु ब्रह्मरूप झालेल्या स्त्रिया इतर व्यवहारी स्त्रियांप्रमाणे व्यवहार करीत नसतात. त्यांच्यात इतकी शक्ति आलेली असते की, त्या कोणास नुसते पाहातील तर त्याला ब्रह्मरूप करून टाकतील. त्यांना इतर प्राण्यांप्रमाणे सहवास करण्याचें कारण नाहीं. ती दुसऱ्याकडे पाहील किंवा दुसरा तिच्या पायावर डोकें ठेवील तरी तो ब्रह्मरूप होतो.'

'हे उद्‌गार मीं ब्रह्मावस्थेत काढले आहेत. त्याचा व्यावहारिक अर्थ करूं नये. ब्रह्मावस्थेंत असतांना असे उद्‌गार निघतात. त्याची कल्पना तुम्हांस कशी येणार?'

मॅजिस्ट्रेट यांच्या प्रश्नास 'ज्यांना मीं हा उपदेश केला ते ब्रह्मावस्थेंत नव्हते. ते सामान्य संसारी श्रोते होते.'

'वीस बावीस वर्षांपासून मी साकोरीस आहें. जमिनीआदि स्थावर व जंगम सर्व माझ्या मालकीचें आहे. साकोरीस अंदाजें पांच सात नंबर आहेत. सर्व इस्टेटीची व्यवस्था माझ्यातर्फे बाप पाहातो. इमारतींकरितां आतांपर्यंत एक लाखाच्या आंतबाहेर खर्च झाला. बनारस येथें नुकतीच दहा हजारांची जमीन बक्षीस मिळाली आहे. जसराज कल्लुरचंद मारवाडी को-हाळकर यांजकडून दहा हजारांची जमीन विकत घेतली आहे. रोकड होती ती संपली. पूर्वी पुष्कळ होती. नॅशनल बँकेंत ऐंशी हजार व बँक ऑफ इंडियामध्यें पन्नास हजार होते. आकोला कोर्टात तीन हजार रुपयांचा दावा मी लावलेला आहे

'मूर्तिजापूर येथील कांहीं भाग मला व सती गोदावरीस दान दिला होता. दानपत्र व संकल्प झाल्यानंतर ती जमीन गहाणाची आहे असें (दान करणारा) सांगूं लागला. म्हणून ती गहाण जमीन ताब्यांत घेण्याकरितां तीस हजार रुपये सावकारास दिले. त्या मिळकतीवर माझ्या

पश्चात् गोदावरीची मालकी प्रस्थापित करणार आहे कोपरगावी कोळध्यानी दानपत्र रद्द करण्याबद्दल दावा लावला हे खरे आहे

द्रव्यरूपी घाण टाकण्याची जागा– उपासनी लीलामृत पान ५९२ मध्ये द्रव्य हे पापरूप आहे, ते टाकण्यासाठी तुम्ही हे ठिकाण समजता गू व घाण टाकण्यासाठी जसा उकिरडा त्याप्रमाणे पापरूपी द्रव्य टाकण्याची ही जागा असे तुम्ही ठरविता व मला त्याची व्यवस्था करण्यास सागता, हा मजकूर खरा आहे पापरूप धन लोक मजकडे आणून टाकतात लोकाचा उद्धार व्हावा म्हणूनच मी पैसा घेता, मी चमत्कार केले नाहीत व करण्याचे कारण नाही

लीलामृतातील चमत्कार खरे–' खडगपुरला गुप्त होऊन मी नागपुरास प्रगट झालो खडगपूर ते नागपूर दोन दिवसाचा प्रवास आहे नागपुरात मला नग्न जाऊ नये असे सागितले, परतु मी त्यास चतुर्भुज पीताबरधारी दिसलो माझ्या हुकुमाने खडगपुरी पाऊस थाबला' इत्यादि चमत्कार खरे आहेत मी एकदा हरतालिका पूजन स्त्रियाप्रमाणे पुष्पावडून करवून घेतले हे व्रत पुरुषाचेहि आहे व्यवहारात तशी पद्धत नाही याला शास्त्राधार नाही, व तो लागतहि नाही. सक्रातीच्या दिवशी मला लुगडे नेसविले पिंजऱ्याच्या फटीतून बागड्या भरल्या, मळवट भरला व स्त्रीवेष दिला त्या दिवशी डागदागिनेसुद्धा अर्पण केले

आश्रमात कायमच्या अशा बाबा असतात टिपऱ्याचा फेर धरला जातो, गोदावरीचे डोक्यावर टोपी घालून तिला कृष्ण समजून गोकुळ अष्टमीच्या दिवशी लोक तिची व माझी पूजा करितात मी झोपाळ्यावर' बसता माझ्या शजारी गोदावरीबाई कृष्णवेषात असतात शिवरात्रीच्या दिवशी मी मुद्दाम दिगबर होऊन बसत नाही मी नेहमीच नग्न असतो त्या दिवशी लोक डोक्यावर फुले वाहतात तशीच लिंगावर वाहून लिंगपूजा करतात शिवरात्रीचा उत्सव वर्षी वर्षी करतात गुदद्वार, स्त्रीपुरुषाची जननेंद्रियें यात अश्लील असे काय आहे ? अश्लीलता मुळी वस्तूतच नाही 'गुद वै गुरुपूजनम्' हे उपनिषदातील वाक्य (असावून) हो, सर्व शास्त्रातील हे वाक्य मला एका स्वामींनी सागितले मी उपनिषदे व धर्मशास्त्र वाचले नाही.



गोदावरीला कृष्ण समजून गोकुळअष्टमीच्या दिवशी लोक
तिची व माझी पूजा करतात. (पृ. २२५)

वेदाभ्यास केला नाही मला स्वतःला जो अनुभव येतो म्हणजे जें परमेश्वरी अंतःप्रेरणेने बाहेर पडते ते (सर्व) माझें धर्मशास्त्र. मी जें काही आतापर्यंत शास्त्रांत सांगितलें असें म्हटलें ते माझें अनुभवसिद्ध होय जे लोक मजकडे येतात त्याना मी माझे ग्रंथ घेण्यास सांगतो. त्यांतील लीलामृत हा मुख्य होय त्यातील मजकूर खरा आहे. वाक्सुधेमध्यें माझी प्रवचनें आहेत. ती मी लोकांना वाचण्यास सांगितली. लोक मला अनंतकोटि ब्रह्मांडनायक राजाधिराज महाराज, श्री सच्चिदानंद सद्गुरु योगिराज असे म्हणतात, हे खरें आहे स्वतःच्या इमारतीच्या आंत गेल्यावर सभामंडपात वरील बाजूस अशी अक्षरें भक्तानी लिहिली आहेत. मी त्याना तसे लिहिण्यास हरकत घेतली नाही

कोर्टाच्या प्रश्नास— कोणी इमारतींत राहू लागला तर त्याला मी हरकत घेईन

श्री कोन्हाळकर वकील याच्या प्रश्नास— सती गोदावरी वगैरे पंचकन्याच्या अर्पणप्रसंगी मी ब्रह्मस्वरूपात होतो त्याच्याशी संबंध झाल्यानें मला ब्रह्मस्वरूप प्राप्त झाले असे नाही. आधीच मला स्त्रीत्व आलें होतें, व स्त्रीत्व आल्याशिवाय ब्रह्मस्वरूपत्व प्राप्त होत नाही. माझ्या लग्नाच्या बायकोमुळें मला ब्रह्मस्वरूपत्व आलें माझी शेवटची बायको शिर्डीस आल्यानंतर वारली

(हा खटला नगर येथेंच जर चालला असता तर साक्षीदार कोर्टात येण्यास तयार होते, पण तें न जमल्यामुळें त्याच्या ज्या जबान्या जनता जनार्दनाच्या कोर्टापुढें मार्च १९३५ च्या किर्लोस्कर अंकात प्रसिद्ध केल्या, त्यातील प्रमुख साक्षिदाराच्या जबानीतील महत्त्वाचा भाग येथे देत आहे

साक्षीदारांपैकी श्रीमती दुर्गाबाई करमरकर याचे वय ५५ वर्षांचे असून त्या उपासनीच्या सहवासात पुष्कळ वर्षें होत्या व त्याचे चिरंजीव रघुनाथ वीरेश्वर करमरकर (वय २९) हे उपासनीचे एका काळी खाजगी कारभारी व मानसपुत्र असल्यामुळें या मातापुत्राच्या जबानीला बरेच महत्त्व आहे श्रीमंत गजानन शांताराम रावते (वय २६) याच्या वडिलांनी बरेचसे द्रव्य या बुवाबाजीस घालविल्यामुळे रा गजाननराव यांनी

पन्नास हजाराची प्रामिसरी नोट उपासनीच्या कारभाऱ्याकडून लिहून घेतली त्याचहि म्हणणें विशेष लक्ष देण्याजोगें आहे. श्रीमती दत्तीबाई कामत (वय ४०) व त्यांचे चिरंजीव मोतिराम शांताराम कामत (वय २१) हे दोघे मातापुत्र बरेच वर्षे उपासनीच्या नादी अमल्यामुळें त्यांनी दिलेले अनुभव विचारार्ह आहेत श्रीमत शेठ अमोलिकचंद चंद्रभान साड हे स्वत: राहाता येथें वास्तव्य करणारे प्रमुख व्यापारी आहेत अर्थात् त्यांच्या लेखातील जो भाग पुढे देत आहों तोहि वाचकांना विचार करावयास लावील असा आहे )

श्रीमती दुर्गाबाई करमरकर— मी शिर्डी येथें ८।१० वर्षे होते उमरावतीचे श्रीमंत खापर्डे व दीक्षित सॉलिसिटर वगैरे शिर्डीस येत असत उपासनीला काही येत नसे श्री खापर्डेच त्याला पंचदशी शिकवीत काशी, प्रयाग, नागपूर, मिरज, कोल्हापूर वगैरे भागात मी उपासनीबरोबर प्रवास केला साकोरीस जवळजवळ दहा बारा वर्षे होते प्रथमारंभी उपासनीचे वर्तन वावगें नव्हते मनिऑर्डर आली की मीच सही करून घेत असे पैसहि माझ्या नावेच पाठविले जात व जास्त झाल्यावर बँकेत जमा होत मुंबईस मोटारीतून बँकेमध्यें ठेवण्याकरिता पैसे पाठवीत मी आलेले पैसे उपासनी जवळ देई नाव माझें व कारभार त्याचा, असे होत असे मला वाटे की, देवधर्म, ब्राह्मणभोजन, यज्ञ असा गोष्टीकडे जर उपासनी पैसे खर्च करतो असा म्हणतो तर तो पैसा मला तरी काय करावयाचा? सुमारे तीन लाख रुपये जमल्यावर त्याने एक दिवस मला सांगितले की, 'आतां गार्धीची चळवळ सुरु झालेली आहे, तो काय करील याचा नेम नाही, तेव्हा तुझ्या व तुझ्या मुलाच्या नावाने जें मी करून दिले आहे ते सर्व माझ्या नावे कर'

आहे, तेव्हां तुम्ही तुमच्या बायका येथें परमार्थाकरितां ठेवा. त्यांनीं पुण्य केले तर तुमच्या उपयोगी पडेल व इहपर कल्याण होईल.'

तेथें राहिलेल्या बाया मजकडे येत व मला विचारीत की, 'उपासनी हे आम्हाला रात्रीच सेवेला का बोलावितात ?' तेव्हा मी त्याना म्हणावे की 'सत्पुरुषाची सेवा रात्रंदिवस करावी.' प्रथम स्त्रियाना असे करा म्हणून मीच सांगे. ज्या मुली त्याचे इच्छेप्रमाणें सेवेस जात नसत, त्याना तो कांही-तरी निमित्त करून मरेपर्यंत मारी मारण्यात तो पशूसारखा वागे व नंतर म्हणे की, 'तुझें पाप वाढले होतें म्हणून मला मारण्याची बुद्धि झाली.' उपासनीचा लोभ पाहून मी लोकांना "त्याला पैसे देऊ नका" असे पुढें पुढें जाणवू लागले पण उपासनीच्या टेहळणी करणाऱ्या मुली त्याला तें सांगू लागल्या; म्हणून त्याचे व माझे खटके होऊ लागले.

गोदीला अर्पण करून घेण्याची गोष्ट, त्याने प्रथम मजजवळ काढली. तिचे मन वळविण्याबद्दल तो मला सांगे मी त्याचा धिक्कार केला उपासनी म्हणे की, 'गोदीला अर्पण करून घेण्यात (इतर मुलीहि) तिचें, तिच्या कुळाचे व जगाचे कल्याण आहे. मी जगाच्या कल्याणाकरिता हे सर्व करितो. तेव्हा तर उपासनी हा निर्लज्जपणे असे म्हणे की, 'माझे वैराग्याचे दिवस गेले माझ्या वासना आता जागृत झाल्या आहेत अनायासाने फुकट द्रव्य व स्त्रिया जर मिळत आहेत, तर त्याचा उपभोग मी का घेऊ नये ?'

थोरा मोठ्याच्या अनेक सुंदर मुली उपासनीकडे असत त्यावर त्याची नजर असे त्या अर्पण व्हाव्यात म्हणून तो माझ्या मध्यस्थीने अनेक पारस्थानें करी मला ही सर्व वारस्थानेंच आहेत हे प्रथम कळत नसे, म्हणून मीहि मुलींना प्रथम बाबा सांगतील तसे वागावे व करतील तसे करून घ्यावे असे सांगे

साकोरीला धर्मभोळ्या, सात्विक, सज्जन अशा स्त्रिया येत असत त्यातील कांहींच्या अब्रूचे मातेरे झालेले मला ठाऊक आहे उपासनीच्या सहवासात मी दहा बारा वर्षे होते पण परमार्थाच्या दृष्टीने मला काडीचाहि लाभ झालेला नाही.

मी आता वृद्ध आहे बायाबापड्यांना माझें असे हात जोडून सांगणे आहे की, तुम्ही कोणाहि बुवाच्या अगर महाराजाच्या नादीं लागूं नका ही

सर्व विषयवासना तृप्त करण्याची दुकानें आहेत जे सत्कृत्य करावयाचे असेल ते प्रपंचात राहून करा, व त्या द्वाराने परमार्थ साधा

* * *

श्री र. वि. करमरकर—माझे वडील वारल्यावर माझी आई शिरडीस आली माझी मुंज शिर्डीस झाली प्राथमिक शिक्षण उमरावतीस श्रीमंत खापर्डे यांच्या आश्रयानें झाले मी मॅट्रिक पास आहे उपासनीबाबा सर्व खर्च देत असत उपासनींच्या आज्ञेवरून मी कॉलेज कोर्स घेतला नाही 'शिकून काय करावयाचे' असे ते म्हणत सन १९२४ ते १९३० सालापर्यंत मी साकोरीस होतो उपासनींनी यथील सर्व कारभार पाहाण्यास मला सांगितले होते आणि हे 'सर्व तुझेच आहे' असे ते म्हणत

१९२४ ते ३० सालापर्यंत बाबांच्याकडे अंदाजे चार साडेचार लक्ष रुपये आले याशिवाय गोट पाटल्या कुड्या, नथा, अमर दागिने, मोत्यांचे कंठे व रत्नजडित मुकुट मिळून दीड दोन लाखांचा विषय महाराजांकडे आला मी साकोरी सोडली तेव्हा बाबांच्या जवळ अडीच लाख रुपये रोकड होती भाजीपाला, गुऱ्हाळ, शेती, देणें घेणें यामुळेंहि बाबांकडे बराच पैसा येई

१९२७ सालापासून बाबांचे व माझे सटक उडू लागले त्यांच्या वर्तनातील स्त्रिया, पैसा व लौकिक यांचा अभिलाष मला स्पष्ट दिसू लागला 'माझें चरित्र लिहा, माझे फोटो अमुक अमुक ठिकाणी लावा मी बोलतो ते टिपून घेऊन वाक्सुधा म्हणून प्रसिद्ध करा' असे ते सांगू लागले साकोरीच्या आश्रमात 'अनंतकोटि ब्रह्मांडनायक राजाधिराज' ही अक्षरं बाबांनी सांगितली म्हणूनच लिहिली गेली हैद्राबादचे रंगराव गोविंदराव वकील हे साकोरीस चार वर्षें होते उपासनी लीलामृत व वाक्सुधा हे ग्रंथ आम्ही दोघांनी बाबांनी सांगितल्याप्रमाणे व त्यांनी सांगितले म्हणून लिहिले आहेत गोदावरीला अर्पण करून घेतल्यावर तिचे महत्त्व वाढावे म्हणून बाबांनी राजाराम गोविंद चिरपुटकर या गृहस्थाला पैशाची लालूच दाखवून 'कन्याकुमारी सती गोदावरी उपासनींची जय' असे म्हणावयास लावले । गांधी चळवळ सुरू झाल्यानंतर त्या निमित्तानें बाबांनी आम्हांला काय वाटले ते सांगितले व गांधींच्या राज्यात काय वाटेल ते होईल असे सांगून मी इस्टेट प्रथम नारायण गोविंदरास माझ्या नावे केली पण तोहि बनिया

व त्याचा तरी नेम काय, म्हणून या आपल्या नेहमीच्या सशयी स्वभावास अनुसरून त्यानी पुढें सहा महिन्यातच ती इस्टेट गोदावरीच्या नावे करून टाकली केव्हा तर ते स्पष्ट म्हणत की, 'माझे वैराग्याचे दिवस गेले मी आता किती दिवस दुःखात काढू ? प्रभुकृपेने जर द्रव्य व स्त्रिया येत आहेत तर मी त्याचा उपभोग का घेऊ नये ? '

बाबाच्या दृष्टीने माझे मुख्य दुर्वर्तन म्हणजे ते मला 'लग्न करून ती बायको स्वतःला अर्पण कर असे म्हणाले, अर्थात् मी त्यास अनुमति दिली नाही हे होय बाबाच्याकडे अनत भाविक लोक येत त्यात एक चित्पावन पन्तनर फौजदार गृहस्थ होते त्याची एक सुस्वरूप मुलगी होती, ती मुलगी मला देण्याबद्दल बाबानी त्या गृहस्थास सांगितले ते म्हणाले, वा ! रघुनाथरावासारखा जावई व बाबाची कृपा, मग काय, माझ्या मुलीचे भाग्यच उदयास आले, असे मी समजेन ! इकडे बाबा मला असे म्हणाले की, तूं तिच्याशीं लग्न लाव व ती मला अर्पण कर. तुला मी दुसरी मुलगी देतों, आणि असें पाहा, अरे, तूं घरचा आहेस घरच्या गृहस्थानें असें केलें म्हणजे इतर माणसें तसें करतात व मग वहिवाट पडते. तेव्हा ही वहिवाट तू पाड. या गोष्टीत मी विरुद्ध गेलो हेच माझें दुर्वर्तन होय !

ते मजजवळ व माझे आईजवळ म्हणत की, 'एवढी सपत्ति घेऊन काय करावयाची आहे ? एवढ्या सपत्तीला जर सततेचे मनुष्य नसेल तर तिची शोभा ती काय ? हे दागिने मी आता कोणाला घाल म्हणून सागू? माझें मन अगदी उदास आहे '

या पुढें बाबानी एक निराळाच घाट घातला आपली दृष्टि त्यानी गोदावरीकडे वळविली व अनेक परन करून, तिला फिनवून थाळारान्या मिषाने पचवटीस जाऊन त्यानी तिला अर्पण करून घेतली

गोदीशी बोलण्यात व गप्पा मारण्यात बाबाचा बराच काल जाऊ लागला सुस्वरूप व तरुण स्त्रियांच्या घोळक्यात बाबा सदैव बसत पुरुषाना बाबाकडे मज्जाव व स्त्रिया ना मात्र सर्व द्वार खुली असा प्रघात पडू लागला मी व इतर माणसानी बाबाना 'हें काय आरभले आहे, हे सत्पुरुषाला शोभत नाही असे म्हणावे पण बाबा म्हणत की 'अरे, माझा उत्कर्ष



बाबा व सुस्वरूप तरुण स्त्रियांचा घोळका (पृ. २६१)

तुम्हास सहन होत नाही राजेरजवाडे येतात व पुष्कळ पैसाहि देतात, ते तुम्हाला देत नाहीत म्हणून तुम्ही माझा मत्सर करता पण लक्षात ठेवा की, तुम्ही सगळे गेलात तरी माझें काही वाकडें होणार नाही मी द्रव्याच्या साह्याने पाहिजे ते करीन यापुढे लोकानी मला सत्पुरुष नाही म्हटल तरी चालेल पण ते श्रीमंत व जहागिरदार असे तरी म्हणतील ना? तेव्हा तुम्ही येथें राहणार असाल तर माझ्या आज्ञेप्रमाणेच राहिले पाहिजे, नाही तर चालते व्हा मजकडे कोणी न आले तरी चालेल कारण मला माझ्या माणसाशी ( मुलीशी व स्त्रियाशीं ) बोलावयास वेळ पाहिजे

'बाबा, आता पुरे, आम्ही जातो' असं म्हणून आम्ही निघालो त्या वेळी बाबा माझ्या व आईच्या पाया पडले 'क्षमा करा, मी लकरू आहे, कृपा करून जाऊ नका' असे म्हणून त्यानी पदरहि पसरला तुम्ही येथें राहाण्यात जगाचें कल्याण आहे' असेहि त्यानी सांगितल पण अंतस्थ हेतु मी बाहेर जाऊन याच्या सत्पुरुषपणाचा बभ्रा करू नये हा होता तात्पर्य, माझ्या दुर्वर्तनाने मी निघालो नसून बाबाचे दुर्वर्तन पाहूनच मी निघालो

ग्वाल्हेरवडील एक मोठी जहागिरदारीणबाई बाबा व गोदी याना प्रमकलहात असताना पाहती झाली तेव्हा बाबानी तिला वाटेल त्या अद्वा-तद्वा शिव्या दिल्या ती बाई तेव्हापासून परत आली नाही

साकोरी आश्रमात अनेक गुप्त कृत्य चालत त्याची कुजबुज स्त्रियात होई, ती शेवटी आम्हाला कळे 'अमकी ओकू लागली, अमकीला डोहाळे लागले असे बायका म्हणत गोष्ट उघडकीस आली की बाबा त्या स्त्रियाना नवऱ्याकडे धाडीत

×××वडील एक सुशील व सधन आणि सुस्वरूप बाई तेथ आली तिचा नवरा वेडा होता तिला अर्पण करून घ्यावे असा बाबाचा हेतु होता तू माझीच होऊन येथें बैस' असं बाबा म्हणत तिला पुढे मूल झाले तो ईश्वराचा प्रसाद आहे, असं म्हणून बाबानी तिच्या नवऱ्याची समजूत घातली व मुलासह त्याच्या बायकोला परत पाठविले

इतक्या वर्षांच्या सहवासान उपासनीचा स्वभाव कृतघ्न, नामसाधु, "गरज सरो व वैद्य मरो" असा तऱ्हेचा आहे उपासनी हा सत्पुरुष तर नाहीच, पण अत्यंत उलटया काळजाचा व भयंकर असा मनुष्य

आहे. माझ्या हातीं जर सत्ता असती, तर आमच्या समाजांत बोकाळलेल्या बुवाशाहीला अंदमानात रवाना करणें, हे मी पहिले कर्तव्य ठरविलें असतें, इतकी मला या बुवाशाहीची चीड आली आहे.

* * *

**श्री. ग. शां. रावते**—माझे वडील एकदा काशीयात्रेस जाणार होते,त्याच सुमारास उपासनींच्या एका भक्तानें उपासनींचें चरित्र आमच्या वडिलांनीं दिलें. तें वाचून सन १९२४ साली प्रथम वडील तेथें गेले व नंतर त्यानीं आम्हा सर्वांना तेथे नेलें. उपासनी मला सांगत.कीं, वडिलांच्या इस्टेटीकडे मुलानें दुर्लक्ष्य करावें; वडिलार्जित इस्टेट जर मुलानें घेतली तर मुलें नरकांत जातात. तसें न व्हावे म्हणून ती ईश्वरकारणी लावावी. एकदां तर पांच हजार रुपये वडिलांनीं माझ्या हस्तेच बाबाना देवविले. मी १९२४ ते १९३१ सालापर्यंत सुमारें तीस खेपा साकोरीस केल्या.

आम्ही वडीलमातोश्रीसह स्वतंत्र खोलीत राहात होतो. आमच्या सेवेस बाबांनी सांगितल्यावरून गोदावरी येत असे. ती उष्टी काढणें, व भांडी घासणें ही कामे करी. पुढे तिचें लग्न झालें त्या वेळी मी तेथें होतो. माझ्या वडिलांनीच दागिने दिले व लग्नाचा खर्चहि केला.

'कन्या अर्पणाचा प्रकार आपण कां काढला ?' असें विचारतां उपासनी म्हणाले की, 'हा ईश्वरी संकेत आहे. मी तर कोणास सांगत नाही. लोक आपण होऊनच मला बळजबरीनें मुली देतात' मीं पुनः विचारलें, 'अहो, लोकांनीं आजवर मुली दिल्या नाहीत; पण त्या आतांच देत आहेत, याचें कारण मुली दिल्यानें ईश्वरप्राप्ति होते, बेचाळीस कुळें उद्धरतात, असे तुम्हीच सांगूं लागला हें होय.' उपासनी पुन्हां म्हणाले, 'अरे, जरी मी प्रवचनें दिली तरी त्यांना तशी बुद्धि कां व्हावी? तो ईश्वरी संकेतच आहे.' मी म्हटलें, 'मी स्वतः तुम्हांस अर्पण होतों. तुम्ही मला अर्पण करून घ्या, म्हणजे तुमची इस्टेटहि नीट राहील.' तेव्हां बाबा म्हणाले, 'मुलगा अर्पण करून घेऊन ईश्वरप्राप्ति होत नाही. खंडोबाला मुलीच अर्पण करितात व पुरुष अर्पण करीत नाहीत. तेव्हां परमार्थांत मुलाचें काम नाहीं. मुलीची योग्यता अधिक असून त्याद्वारेंच मोक्ष मिळतो.'

माझे वडील वरचेवर जात व पुष्कळ पैसे देत असत. मी चारदोन वेळा वडिलांना म्हटलें, 'असें काय तेथें विशेष आहे? उगाच कां पैसे देतां ?

त म्हणाले, 'तुला ह नसते काय करावयाचे आहे ? ' पुढें माझ्या वडिलांनी सोळा हजार रुपये धर्मशाळेकरिता देण्याचे योजिले पण मी म्हटले की, 'तुम्ही स्वत येथे राहून धर्मशाळा बांधा नाहीं तर हा बाबा पूर्वीच्या बारा हजाराप्रमाणेच हेहि सोळा हजार लाटील

वडील पैसे देत व त्याचा विनियोग अनाठायी होई ते पाहून मी म्हटले की, 'माझे भाऊबद या वडिलार्जित इस्टेटीबद्दल तुम्हावर दावा लावतील' या भीतीमुळेंच कारभारी रघुनाथराव बरमरवर यांनी बाबाच्या सल्ल्याने मला प्रॉमिसरी नोटा लिहून दिल्या ५०००० ची प्रामिसरी नोट, पैसेफेडीचे हप्ते व पैसे पावल्याची पावती (पोस्टाच्या तिकिटावर सही घेतलेली, ) असे कागद मजजवळ आहेत

रघुनाथरावाने उपासनी संस्थानाच्या वतीने सही करून ही प्रा नोट दिली आहे. ते काही दिवस बाबाचे मानस पुत्र व कारभारी होते कन्यार्पण विधीवरून त्याचे बिनसले गांधी चळवळीबद्दल वाटेल ते सांगून उपासनींनी सर्व इस्टेट आपल्या नावे करून घेतली

मी सप्तपदी करीत असे त्या व्रताचे उद्यापन करावे म्हणून मजकडून उपासनींनी पुष्कळच पैसे काढले ३१ तोळे सोन्याचा गणपती त्यांनी मागितला आणि इतरहि वाटेल ते मागितले मी कसाबसा हजारअकरासे रुपये देऊन त्यांच्या तावडीतून निसटलो

त्याच खेपेस मी उपासनींचा एक घाणेरडा प्रकार पाहिला तो असा —

एकदा एका बाईबरोबर बाबांनी मला ' दुपारी चार वाजता दर्शनास य ' असा निरोप पाठवला त्या वेळी मी माझ्या इच्छेविरुद्ध व त्या बाईच्या सांगण्यावरनच दर्शनास निघालो पण वाटेंत पहारेकरी दाडेकर व द्वारपाल मीना टूब पारशी यांनी मला आडविले मी त्यांना धुडकावून आत जातो ताच पिंजऱ्याबाहेर बाबा गोदावरीस मांडीवर घेऊन मोठ्या रंगात आलेले दिसले मी आत जाताच त्याचा विरस झाला व बाबा मला आईबापावरून शिव्या देऊन मारावयास धावले

काही भोळी व श्रद्धाळु जोडपी साकोरीस येत त्यातील बाईचा हे बाबा बुद्धिभेद करीत 'नवरा नोकरीस जाऊ दे, तू येथेच राहा ' असे ते सांगत नवऱ्यास म्हणत की, 'तुजवर गंडांतर आहे, अरिष्ट आहे, तुझ्या

बायकोनें येथें राहून कांहीं पुण्य केलें तर ते गडांतर टळेल. नाही तर तिला वैधव्य येईल.

पहाटेस काकडआरती होताच नग्न स्थितीत बाबांची पूजा गाडेमामी स्वतः त्याच नैसर्गिक वेषांत करी. पूजेनंतर ती बाबाला घट्ट आलिंगन देई व बाहेर येऊन बाबाच्या लघुशंकेचे तीर्थ देत असे. कांही स्त्रिया बाबांना पंचामृत स्नान घालावयास जात तेव्हा बाबा म्हणत की ' मी जसा आहे तसा तुम्ही विवस्त्र होऊन मला स्नान घाला.' बाबांचे नादी लागणारे महा मूर्ख आहेत, असें माझें ठाम मत झालेलें आहे. ईश्वर करो व या बुवाशाहीचा विध्वंस होवो !

* *

**श्रीमती दत्तीबाई कामत**–माझें नांव दत्तीबाई कामत. वय ४०. जात सारस्वत ब्राह्मण. शिक्षण लिहिण्यावाचण्या पुरतें. धंदा घरकाम. राहणार मुबई. मी सत्यपूर्वक सांगते कीं,

मी प्रथम माझ्या भावाबरोबर साकोरीस गेले. तिकडे जाण्यास उपासनीचरित्र कारणीभूत झालें. मी भावाबरोबर प्रथम १९२४ साली तेथे गेलें. बाबांचें गोणपाट नेसणें पाहून आमची श्रद्धा बसली. एकदोन दिवसांनीं बाबा माझ्या बंधूस म्हणाले की, ' तुझे वाडवडील येथें पिंजऱ्यांत येऊन रडतात, तेव्हा तुम्ही त्यांना तृप्त करा.' माझे बंधू म्हणाले, ' ब्राह्मणभोजन वगैरे असेंच कांहीं करूं कां? बाबा म्हणाले " छे, ब्राह्मण खाऊन नुसतें हगतील! ते सर्व पैसे मला द्या." त्याप्रमाणे त्यांनी दोन हजार रुपये उपासनीस दिले.

मला परमार्थाचा नाद होता. मी सात वर्षांत सुमारें २५ खेपा साकोरीस केल्या. बाबा मला ' एकवीस वाऱ्या करा ' असें सांगत. माझा कल पाहून बाबा म्हणत की, ' ईश्वर गुप्त आहे, तो दिसत नाही. त्याची कायिक, वाचिक, मानसिक, सेवा घडत नाही, तेव्हां कांही द्रव्यरूपानें तरी सेवा करावी. मी असा मनुष्यधारी दिसतों तथापि माझी अवस्था परमेश्वरी आहे. मजकडील सर्व कांही ईश्वरी आहे तेव्हां मला जें द्याल,तें ईश्वराला पोंचेल.

माझ्या मुलाच्या मुंजी तेथेंच केल्या. त्यानिमित्त उपासनींना मी २०० रुपये दिले. ब्राह्मणभोजनाचे शंभर रुपये बाबांनींच घेतले. मजजवळ माझ्या पैशाची व माझे जे नातलग बरोबर येत त्यांच्या पैशाआडक्याची निर-

निराळ्या तऱ्हेने त चौकशी करीत तिचे कसे चालते, किती पैसे आहेत, कोण व्यवस्था पाहतो असे प्रश्न ते विचारीत

एकदा एका अधिक आषाढात मी तेथे गेले, तेव्हा तीन महिने राहिले त्या तीन महिन्यात या अर्पण केलेल्या मुलीची काही पारमार्थिक दिनचर्या मला दिसली नाही त्या सारख्या हसत, खिदळत, खेळत व सर्वावर देखरेख करून बाबाना चहाड्या सागत असत

मी एकदा बाबाना म्हटले की, 'बाबा, हे काय चालविले आहे' ते म्हणाले, 'प्रारब्ध भोगले पाहिजे ना!' मी म्हटले, 'तुम्ही जगाचे प्रारब्ध काढता तर तुमचे या काढीत नाही?' तेव्हा ते म्हणत की, 'मी हे जगाचे प्रारब्ध जगाच्या कल्याणाकरिता भोगतो'

मी बाबाकडे नैवेद्य व काही खाण्याचे घेऊन जात असे, त्या वेळी बाबा व गोदी एकत्र बसलेली असत टिपऱ्यातील मुली टेहळणी करून बाबाला चाहाड्या सागत पारमार्थिक चर्चा अशी मी कधीच ऐकली नाही बाबा मला 'परमेश्वराचे व्हावे' असे वरचेवर म्हणत, त्याचा अर्थ मला समजत नसे देवाचे व्हावे, म्हणजे काय या प्रश्नास ते 'हळूहळू समजेल' असे उत्तर देत

एका गोकुळअष्टमीस बाबा गोदीला जवळ घेऊन झोपाळ्यावर बसले जरीचा पितांबर, डोक्याला मुकुट, कफनी असे घातले होते गोदावरीलाहि जरीचे लुगडे नेसवले व इतर अलकार घातले होते हैदराबादेकडील बाया गाणी म्हणून झोपाळा हालवीत झोके देत होत्या ते झाल्यावर नग्न बाबाना स्नान घालण्याची गर्दी उडाली सुमारे पन्नास स्त्रिया स्नान घालण्यास गेल्या व स्नानाचे अगावरील पाणी तीर्थ म्हणून सर्वांस वाटण्यात आले

बाबा कधी पिंजऱ्यात तर कधी बाहेर निजत बाबा निजलेले असतानाच त्याची काकडआरती होई दुपारच्या आरतीची घटा बाबाच देत असत आम्ही काकडआरतीला गेलो, म्हणजे बाबाभोंवतीं निजलेल्या मुली अंथरुणें गुंडाळून पळून जात असत हे व अशा तऱ्हेचे आणखी प्रकार पाहून मला असे वाटू लागले की, कोणताहि बुवा, बाबा किंवा महाराज याच्या दर्शनास म्हणून यापुढें जाऊ नये हे सगळे लबाडीचे धदे आहेत यापुढें मी केव्हाहि या बुवाच्याकडे जाणार नाही

* *

श्री. मो. शां. कामत–मी बुवा, किंवा महाराज कोणी जाणत नाहीं. माझी वडील मंडळी साकोरीस जात म्हणून त्यांच्यासमवेत मी दहाबारा वेळां उपासनीबाबाकडे गेलों असेन.

उपासनीच्या दर्शनास जेव्हां मी जाई तेव्हां त्यांचे सांगणें एक असे– ' अहो, पैसा ही घाण आहे, मी येथें उकिरड्यांत बसलो आहे. तेव्हां ती तुमची घाण ह्या उकिरड्यात टाकली की, स्वच्छता प्राप्त होईल !' जीं माणसें साकोरीस जाऊन आजारी पडत, त्यांना उपासनी सांगत की, ' बाबांनो, आपणां माणसांना प्रारब्ध हें आहेच व ते भोगावेहि लागतेंच. ' कांहीं दिवसांनीं त्यांनी प्रवचनात म्हटले की, ' स्त्रियांना प्रारब्ध नाही. ' तेव्हां मी विचारलें, ' ते कशावरून ? स्त्रिया माणसें नाहीत काय ? ' तेव्हां ते म्हणाले, 'तू लहान आहेस, तुला कळत नाही. **मी जें बोलतों तें शास्त्र व तें तूं मानावेंस.** ' मीं म्हटलें, 'तुमचें शास्त्र मतलबी व स्वतःस सोयीस्कर असें आहे. '

पांचसहा वर्षांपूर्वी उपासनींना मुंबईहून त्यांच्या भोंदूपणाबद्दल पत्रे जात असत. त्या वेळीं ते एकदा मुंबईस आले असतांना मला म्हणाले, 'कोण रे हें असें करतो ?' तेव्हां मी म्हटलें, 'तुम्ही अंतर्ज्ञानी व सर्वज्ञ आहांत, तेव्हां खरें काय तें तुम्हीच सांगा. ' असें म्हणतांच ते रागावले व म्हणाले, 'होय, मी पाहिजे तें करतों, तुम्हांला काय करायचें तें करून घ्या' असें म्हणून स्वतःचें गोणपाट वर करून त्यांनी अत्यंत ग्राम्य शिवी हांसडली. त्या वेळीं मी दुसऱ्याच्या घरीं होतों म्हणून गप्प बसलों. भोंवताली उपासनीचे सर्व प्रज्ञाहत कावळे होते, त्यामुळें माझा नाइलाज झाला.

ह्या उपासनी प्रकरणापासून मित्रमंडळींना माझें असें सांगणें आहे कीं, बुवाशाहीपासून सावध राहा व तिचा विध्वंस करण्यासाठी झटून यत्न करा. बुवा, किंवा महाराज म्हटला की, तिकडे जाऊंच नका, व गेलां तर सोटा घेऊन जा !

* * *

अमोलिकचंद चंद्रभान सांड–राहते येथील एक प्रमुख व्यापारी यांनी किर्लोस्करमधील ( मार्च १९३५ ) आपल्या लेखांत लीलामृत प्र. २२ मधील सर्व हकीगत खोटी आहे असें लिहिलें असून लीलामृतांत नसलेल्या पण महत्त्वाच्या अशा गोष्टी पुढीलप्रमाणें दिलेल्या आहेत.

(१) सखाराम पाटील हे साकोरीचे वतनदार पाटील होत त्यांचे नाव चरित्रात पुष्कळ वेळा आले आहे, त्यानी महाराजावर फारच उपकार केल्याचे व भक्ति केल्याचे दिसून येत परंतु ते आता पाचसहा वर्षापूर्वीच निवर्तले आहेत त्याच्यामागे त्याचे पुतण सर्जेराव पाटील हे गावचे पाटीलकीचे काम करीत होते, त्याचे वतन जाण्यास या ब्रह्मांडनायकाच्या लीलाच कारणीभूत झाल्या असे म्हणतात

(२) दुसरे साकोरीचे शकर पाटील रोहोम याचेहि नाव लीलामृतात वरचेवर आलेले आहे त्याची शेती व इस्टेट बरीच होती त्यामुळ महाराजाची नजर त्या इस्टेटीवर होतीच त्यानी शकर पाटलाच्या भोळसर स्वभावाचा फायदा घेऊन त्यास कर्ज वगैरे देऊन जबर व्याज लावून प्रामिसरी नोटा करून घेतल्या होत्या पुढे शकरराव निवर्तल्यावर त्याचा थोरला मुलगा रामराव यास तुझेवर 'फिर्याद करू अशी धमकी देऊन आज दोनतीन वर्षापूर्वी ३ जमिनी व नतर २ जमिनी एकूण ५ नबराचे खरेदीखत आतापर्यंत करून घेतलेले आहे ही जमीन अदमासे १५००० रुपयाची आहे अशी ही योगीराजाची त्यागवृद्धि आहे!

(३) राहते येथे श्री मेघराजजी ओझा या नावाचे मारवाडी सारस्वत ब्राह्मण राहात आहत त्यानी चितळी स्टेशन ते साकोरीपर्यंत मोटार सर्व्हिस पाचसहा वर्षांपूर्वी चालू केली होती, ती तीन वर्षे सारखी चालू होती या अवधीत सदर गृहस्थास श्री उपासनी महाराज यानी वळोवेळी असे सांगितले की, 'ईश्वरकृपेने तुला या वेळी पुष्कळ पैसा मिळत आहे, तरी तू येथील मदिरावर नगारखाना बाध असे म्हणून नगारखान्या-प्रीत्यर्थ वळोवेळी अकराशे रुपये घेतलेले आहेत परंतु अद्याप नगारखाना वगैरे काही नाही ही गोणपाट धारण करणाराची युक्ति आहे!

(४) नगर येथील आमचे जीनमध्ये राहात असतानाच महाराजानी एके दिवशी एका मुलीशी भयकर किळसवाणा प्रकार करण्याचा प्रयत्न केला होता परंतु ऐन वेळी मी, चंदनमलजी धुळेकर व मोहनलाल वेलापुरकर गेल्यामुळे तो प्रयत्न साध्य झाला नाही मग तावडतोब महाराजाची दोलूशोटानी हकालपट्टी केली तेव्हापासून महाराज परत कधीहि आमच्याकडे आले नाहीत!

* * *

## उपासनीवर दुसरा फौजदारी खटला

उपासनी बाबाबद्दल लेख आले, चर्चा झाली कोर्टापुढें हा अनतकोटी ब्रह्माडनायक आला व सव घाणरड कबूल कल इतकी शोभा झाल्यानतर तरी स्वस्थ बसावयास पाहिज होत परतु उपासनीनीं गल्या वैशाख वद्य २ स कुसुम व गगु या दोन्ही मुलीशी लग्न लावली त्याबद्दल त्याज-वर कोपरगावचे श्री देशमूख वकील यानी गोपालकृष्णावरोबर लग्न लाव ल्याच्या आरोपावरून देवदासी प्रोटक्शन ॲक्ट कलम ५ प्रमाणें दावा लावला त्याचें काम सब् डिव्हिजनल मजिस्ट्रेट मे व्ही टी देहेजिया आय् सी एस् याचेपुढें चालल त्या खटल्यात पूर्ण चौकशी होऊन उपासनी बाबाला १०० रुपय दड झाला हयावर अपील केले आहे ! तथापि त्या खटल्यात उपासनीनी ता ६।७।३५ रोजी कोर्टापुढें जी निसुगपणाची जबानी दिली, तीतील महत्त्वाचा भाग देऊन हे प्रकरण आटोपतो

**श्री उपासनी बाबाच्या जबानीचें सार**—मीं गुन्हा केलला नाही आमचे शास्त्रप्रमाण लग्न ही अत्यत पवित्र गोष्ट आह **लग्नाचा हेतु परमेश्वरप्राप्ति हाच आहे** सदरील मुद्याबाबत पुस्तकात लिहिलला मजकूर बरोबर आह प्रत्येक लग्न परमेश्वर प्राप्तीकरता करावयाचे असते प्रत्यक लग्नात वरास नारायण स्वरूपच कल्पिलेल असत परमेश्वरप्राप्ति **हाच लग्नाचा मुख्य हेतु असतो.** लग्नाचे योगानें **परमेश्वरप्राप्ति होते ही गोष्ट निर्विवाद आहे** ही गोष्ट साधारण माणसास समजण किंवा आकलन करणे शक्य नसल, तरी तस होत नाही असे नाही, स्त्रिया सत्त्व प्रधान असतात त्यामुळें त्यास वरील मनोनिग्रह लवकर साधता येतो वस्तुत **लग्नात विषयाचा सबध येत नाही.** तरी जगरहाटीकरिता साधारण जनता स्वार्थाकरिता लग्नाचा उपयोग करते परमेश्वराचे ठिकाणी विषयाचा सबध यऊ शक्त नाही व परमेश्वरप्राप्ति झालेल्या परमेश्वरी पुरुषाचा वैषयिक सबध यऊ शकत नाही यदाकदाचित् झाल्यास, जी **सतति होते ती सतति** *जन्मापासून ब्रह्मस्वरूपाची होते,* याबद्दल अनेक उदाहरण आहेत अलीकडहि असे सत श्रीनिवृत्तिनाथ, श्रीज्ञानेश्वर वगैरे झालले आहेत ही गोष्ट शास्त्रशुद्ध आहे त्याकरता परमेश्वर विवाह

व मानवाचे विवाह निरनिराळे असून त्यांच्या निधि ठरलेल्या आहेत मागे ५ मुलींची गोपाळकृष्णावरोबर लग्न लागली, ती कार्तिक शुद्ध १२ चे दिवशी म्हणजे तुळसीविवाहाच्या दिवशी झाली हल्ली देवदासी ज्या अर्थाने समजल्या जातात त्या अर्थाने त्या तशा देवदासी मुळीच नाहीत

एका वेळी वधूशी लग्न लावण्यास व मनुष्याने एका वेळी एकापक्षा अधिक वधूशी परिणय करण्यास शास्त्राप्रमाणे कोणताहि प्रत्यवाय नाही, मागील लग्न लागल्यानंतर हल्लीचा कायदा केलेला आहे त्यानंतर सौ कुसुम व गगु यांचे लग्नाबद्दल आम्हास गोष्ट वाढली त्यावर आमचे सॉलिसिटर व कायद्याचे सल्लागार याचा विचार घेतला मूर्तीशी लग्न न लावता स्वतःशी लग्न लावण्यास हरकत नाही असे त्यांनी सांगितले त्यावर सौ कुसुम व गगु यांचे वडील व पालकांनी आमचे स्वतःबरोबर लग्नें करण्यास विनंति केली त्या विनंतीचा अव्हेर करण्याचें कोणतेंच कारण नव्हतें. सबब वैशाख वद्य २ रोजी लग्नतिथीस हे लग्न आमचे स्वतःच करण्याचे ठरले त्याप्रमाणे आमंत्रणे गेली व मंडळी लग्नास आली कायदा जाणणारे सॉलिसिटर, बॅरिस्टर, इतर सर्व वकील वगैरे मंडळी त्यात होती त्या सर्वांसमक्ष आमचे लग्न झाले आहे आमचेबरोबर व आमचेशी लग्न झालेले आहे धर्मशास्त्राप्रमाणें सर्व विधी झालेले आहेत कोणताहि विधि राहिलेला नाही

---

प्रकरण १० वें

# नारायण महाराज

(प्रास्ताविक—उपासनी कस बलापूर येथें सपल्यानंतर श्री शंकरराव फिर्लोस्कर व आम्ही असे उभयता कोपरगावास व पुढें राहात्यासहि गेलो राहाते येथ श्रीमता राधाबाई गोखले (रा अशोकरावाच्या वयोवृद्ध आजी) याची सहज भेट झाली त्यानी आपल्या मुलीची करुणकहाणी निवेदन केली त्यापूर्वीं ता २०-११-३४ च्या त्यालान रा अशोक राव दांडेकर याजकडून नारायणबुवाबद्दल लेख आलेला होताच शिवाय नारायणबुवाच्याविषयी उघ्टा विडा देण चाफरीणबाईंच्या दर्शनास जाणे स्त्रियाना दोन्ही पायाना स्पर्श करून नमस्कार करावयास सागणे, ये. व अशाच तऱ्हेच्या अनेक कागाळ्या पत्रद्वार पुष्कळ आल्या होत्या श्रीमती राधाबाईंच्या तोंडून ती भीषण हकीगत एकल्यावर आम्ही गंगाबाई दांडेकर याचेकडे व अन्यत्र समक्ष जाऊन चौकशी केली व त्यानी पाठविलेल्या माहितीची शहानिशा केली

हरिनाना काळबुद्धीकराचा आणि आमचा पुष्कळ वर्षाचा परिचय असल्या मुळ त्याचेहि मत प्रकरण वळगावास एकदोन वेळा जाऊन समजावून घतल आणि देणपाडघाना उल्लेखित आक्षेप सत्य का असत्य हे शोधण्या करिता त्याच्या डायऱ्या व जमारवचहि पाहिला तत्पर्य नारायण महाराजाविषयींच्या मर्यादित ज्ञानासदा जवळजवळ ८।१० महिने खर्ची घातलेले आहेत

प्रताची असून चमत्कार असा की ती सर्व देशपांडे, दादरीणबाई व राधा बाई गोखले यांच्या विधानाशी तंतोतंत जुळत आहेत

आम्हा शास्त्रीमंडळींना निराधार लिहिण्याची किंवा ऐकण्याची सवय नसते. वचनाशिवाय म्हणजे आधाराशिवाय आमचे चालत नाही. तशी सवय असल्यामुळे नारायणबुवाविषयीच्या संग्रहित केलेल्या रसात निराधार, अपूर्ण व असत्य असे काही नाही. म्हणूनच तो लेख पुन्हा येथे देत आहो.)

* * *

## काळकुंद्रीकर बुवाबाजीत कसे बुडाले ?

### (लेखक– मल्हार हणमंत देशपांडे, बेळगाव)

मी स्वतः नारायणमहाराजाचा भक्त अथवा शिष्य नाही, तथापि मला आतापावेतो अनेकदा केडगावात जाऊन तेथ राहावे लागले व तेथील वस्तुस्थितीचे अगदी जवळून अवलोकन करण्याची संधि मिळाली आहे म्हणून नारायणमहाराजाच्या बुवाशाहीचे प्रकरण आपल्यापुढे ठेवणार आहे.

नारायणमहाराजाच्या अगदी जवळ राहून सुद्धा त्याच्यामध्ये अलौकिक पणाचा अगर विद्वत्तेचा मला काहीसुद्धा अंश आढळला नाही. त्याच्या चेहऱ्यावरील तेजाबद्दल भक्त मंडळी जें वर्णन करतात त्या निव्वळ गप्पा होत. अशा माणसाच्या नादी लोक लागतात कसे याचे मला मोठें गूढ पडे, पण पुढें त्याचा हळुहळू मला उलगडा होऊं लागला. बुवा होण्यास मनुष्य धूर्त असावा लागतो. आपल्या भोगाची वतावणी त्याला बरोबर करता यावी लागते. त्याचे स्तोम वाढवावयाला इतर मंडळी लागतात.

सन १९१९ सालापर्यंत नारायणमहाराजाचा केडगावमधील थाटमाट व तेथील इमारती वगैरे सर्व बेताबाताचीच होत. पुढें त्यांना नागपुराकडील एक निपुत्रिक श्रीमंत शेट गंगाधरराव लाभले. त्यांच्याकडून महाराज पर्वेवर सत्यनारायण करवूं लागले व या सत्यनारायणाबरोबर महाराजांचे माहात्म्यहि जोरानें वाढूं लागलें.

**छाप कशी बसते ?**— केडगावास जाणारे लोक काही विशिष्ट भावनेनेच जातात. कोणी आर्त म्हणून, कोणी निर्धन म्हणून, कोणी निपुत्रिक म्हणून तर कोणी असंतुष्ट म्हणून जातात! देवळाच्या पलीकडे एक झुळझुळ वहाणारा ओढा आहे तो बारा महिने वाहत असतो या ओढ्याप‍ल्याडे

केडगांव येथें आहे. झुळझुळ वाहाणारा ओढा, भव्य व सुंदर दत्तमंदिर, मंदिरापासून दिसणारे महाराजांचें निवासस्थान, दत्तमंदिरासमोरची एक मोठी धर्मशाळा हीं पाहिल्यावर माणसाच्या मनावर कांही तरी परिणाम होतो, व येथें कांही तरी विशेष आहे असे त्याला स्वाभाविक वाटू लागते.

कार्यक्रम— दत्ताची पहांटे काकडआरती होते व त्यानंतर भटजी लोक सारखे एकादशिन्या करीत असतात महाराज आपलें सकाळचें आन्हिक आटोपल्यावर आपल्या सर्व गणासह देवदर्शनास जातात. देवदर्शनास जातांना, पायांत जरीचे सपात, भोवताली छत्री धरणारे गण अशा थाटानें ते जातात. आठाचे आत बहुतेक कोणास ते दर्शन देत नाहींत. निवासस्थानाखेजारी तळघर आहे. तेथेंहि ते केव्हां केव्हां बसतात. ते नेहमी 'पाय खालीं सोडून उच्चासनावर असे बसलेले असतात कीं, दर्शनोत्सुक स्त्रीपुरुषांना पायांवर डोकें सहज ठेवतां यावें' दोन्ही पायांवर डोकें एकदम न ठेवतां ( कारण महाराजांना पाय सतत जुळविण्याचा त्रास पडतो!) एकेका पायावर डोकें ठेवण्याची पद्धत आहे ! लोक इतरहि पदार्थ— नारळ, केळी, खडीसाखर ठेवतात. या पदार्थांची व्यवस्था भक्तगण लावतात. पण पैसे मात्र महाराज खुद्द जातिनिशीं जाकिटाच्या खिशांत ढकलतात.

सकाळचा दर्शनाचा कार्यक्रम साडेनऊ दहा वाजेपर्यंत चालतो. अकरा वाजतां देवाचा नैवेद्य होतो. महाराज साडे अकरा वाजतां जेवतात. महाराजांची आरती झाल्यावर महाराजांना स्तुतिपर श्लोक म्हणून पुष्पांजली अर्पण करावयाची असते. ती होतांच घोळवा या नांवाचा चोपदार अनंतकोटि ब्रह्मांड नायक राजाधिराज वगैरे लांबलचक बिरदावलि ललकारतो व लगेच गोविंदरावहि 'फराळाला चला' असें पुकारतो. ही आज्ञा होताच अगदीं फर्स्ट-क्लास लोक महाराजांच्या पंक्तीस, सेकंड-क्लास लोक आपल्या निराळ्या जागीं व थर्ड क्लास आणि त्याच्या खालचा गुड्गु क्लास लोक धर्मशाळेमध्यें भोजनास जातात.

जेवणाचा थाट— महाराजांच्या भोजनाचा थाट अगदीं स्वतंत्र आणि उत्तम तऱ्हेचा असतो. तीन वेळां धारोष्ण दूध व त्याकरितां तीन स्वतंत्र दुभत्या गाईंची व्यवस्था केलेली असते. विष्णुभट जोशी हा महाराजांना स्वतंत्र आचारी आहे तो त्यांची सर्व बडदास्त बरोबर ठेवतो.

दत्तजयंतीसारख्या प्रसंगी जरी ते रमण्यात भोजनास आले तरी त्यांचा चांदीचा चौरंग मध्ये मांडलेला असतो व त्यांच्या भोजनाचे सर्व पदार्थ निराळे व पहिल्या दर्जाचे असतात महाराजांच्या जवळ चाफेकरांची मुलें, कामटीकर गंगाधरराव यांचा नातू व दोन मुली नेहमी भोजनास बसतात इतर कोणी मोठे लोक आले तर त्यांना महाराजांच्या आसपास बसविण्यात येते पण त्यांना बसण्यास पाट देण्याची पद्धत नाही महाराज भोजनास बसले म्हणजे काही भक्त प्रसाद मागतात व महाराज त्यांना उष्टा प्रसाद देतात!

**भक्तीचा गलिच्छ प्रकार**— असे उष्टे अन्न व तोंडात चघळलेला विडा प्रसाद म्हणून दुसऱ्यांनी खाणे ही किळस आणणारी गोष्ट आहे, पण प्रज्ञाहत झालेले भक्त तो मिटक्या मारून खात ना पाहून कोणालाहि अत्यंत उद्वेगच वाटेल! रामटेकच्या उत्तम पानाचे त्रयोदशगुणी विडे तयार करून ते चाफेकरीणबाईंनीं चांदीच्या डब्यात भरले असतात महाराज ते वरचेवर खातात कोणी प्रसाद मागितला की त्यांच्या हातावर थुंकून ते त्याला देतात असा प्रसाद घेणाऱ्या बायका व पुरुष दोघेहि असतात. मध्यंतरी कॉफी, फलाहार वगैरे गोष्टी असतातच एक ल्हानशा वाटीभर गाईचे तूपहि महाराज रोज पितात

## चाफेकरीणबाई

वै. वा दाडेकर व हरीनानांना बुवाशाहीच्या जाळ्यात ओढणारे जे चाफेकर, त्यांचे कुटुंब मुलाबाळांसह महाराजांच्या सेवेकरिता बेटातच असत (अंगातील रपडे काढणे व घाम पुसण्यापर्यंतचा प्रकार मी स्वत १९२९ पर्यंत पाहिला आहे, असे रा पेंडसे लिहितात—संग्राहक) चाफेकरांचा धाकटा मुलगा भाऊ ह्या बुवाच्या अंगावर नेहमी असतो याचीच मुंज महाराजांनी सुमार दोन वर्षांपूर्वी केडगाव बेटात मोठ्या थाटाने पुष्कळ पैसा खर्च करून केली त्या वेळी नुसत्या या मुलाच्या पोषाखावरितीच महाराजांनी बरीच रक्कम खर्च केली! चाफेकरांच्या कुटुंबाकडे महाराजांना विडे करून देण्याचे काम असते आणि या बाईंच्या दर्शनाला महाराज देवाला जाताना सकाळीं अगर संध्याकाळीं नित्य येत असतात. व पधरा वीस मिनिटें गप्पा मारून जातात!!

"गोविंदा"– दिवसांतून चारपाच वेळां महाराज शौचास म्हणजे "गोविंदा करावयास" जातात. ते शौचकुपात गेले म्हणजे परत येईपर्यंत दहापांच लोक टाळ वाजवीत, भजन करीत बाहेर बसतात. महाराजाच्या पारिभाषिक कोशाप्रमाणे शौच करण्यास "गोविंदा करणे" असा पारिभाषिक शब्द आहे. किंबहुना कोणत्याहि क्रियापदाच्या ऐवजीं "गोविंदा करणें" या क्रियापदाचा ते उपयोग करीत असतात. या अशा शब्दप्रयोगामुळे स्वतःचे अज्ञान लपविण्याची व दुसऱ्यावर छाप पाडण्याची एक अजब युक्ति त्यांनी शोधून काढली आहे उदाहरणार्थ, एकादा नवखा इसम भेटीला आला असता महाराज म्हणतात, " तुम्ही गोविंदा केले काय ? नारायणास तें कळले " वास्तविक याचा अर्थ कांहीहि नसतो; पण त्या मनुष्याला मात्र यामुळें महाराजांनी आपल्या मनांतील गोष्ट ओळखली असें वाटून तो चकित होतो. महाराज शौचाहून येतांच मुली व बायका हातांत साबण, टुवाल व पाणी घेऊन तयार असतात. त्याचे पाय धुणें, पुसणे हीं कामें मुली व स्त्रियाच करतात. नारायण महाराजाभोंवतालची मंडळी भोळ्याभावड्या लोकांना देवाकरितां अमुक पाठवा तमुक पाठवा असें सांगतात व त्याप्रमाणें वस्तु पुरविल्या जातात. महाराजांच्या प्रभावळींत शास्त्री, वैदिक, ज्योतिषी, हरिदास, पेटीवाले, भजनी, वगैरे मंडळीहि आहेत. कोर्टकचेरीची कामें पाहाण्यास एक वृद्ध पेन्शनर आहे. नारायणमहाराज हे स्वतः कधी कोणाशी चर्चा करीत नाहीत, लेखणीत तर कधीच गुतत नाहीत, याचें कारण ते फार धूर्त आहेत.

**सोंगट्यांचा नाद**–दोनप्रहरीं भोजनानंतर दोन ते पाच पर्यंत महाराज झोंप घेतात. रोज दुपारी इतकी झोंप घेण्याचें कारण हेंच की रात्री त्यांना सोंगट्या खेळण्यासाठी बरेच जागावें लागते, बंगलींत रात्री फराळ झाल्यावर कोणी गुणी मनुष्य आल्यास अगर कलावंतीण आल्यास तिचें गाणें वजावणे, पेटी, सारंगी वगैरे चालतें. त्या वेळी महाराज हॉलमध्यें गालिचावर पडल्या पडल्याच ते ऐकतात. या वेळी त्यांच्या कांही भक्तभक्तिणी त्यांचें अंग चेपण्याचें कामहि करतात. हा कार्यक्रम नसल्यास प्रभावळींतील खास मंडळीसह रात्री दोन वाजेपर्यंत महाराजांच्या सोंगट्या चालतात.

नारायणमहाराज हा मोठा एयआरामी प्राणी आहे त्याचा थाटमाट मस्थानिकालाहि लाजवणारा असतो. रेशमी व जरीचे कपड, सोनेरी घड्याळ, जरीची टोपी, भरजरी रुमाल, असा त्याचा पेहराव असतो पायात जरीचा सपात आणि बोटात हिऱ्याची आगठी नेहमी असते स्वच्छता व राजविलास याचे महाराज भोक्ते आहेत कपड्यावर, बिछान्यावर, ल्व्हेंडरच्या बाटल्याच्या बाटल्या ओतल्या जातात इतकच काय पण महाराज प्रवासास निघाले म्हणजे त्याचे भक्तगण प्रवासातील शौचकुपात अत्तराच्या बाटल्या ओतून ते सुगधित करतात !

दिपवाळीचें अभ्यगस्नान—दरसाल आश्विनामध्ये दिपवाळीच्या दिवशी या बुवाच्या पादोदकाने अभ्यग स्नान करण्याचा मोठा टोलजग समारभ असतो पायाचे ते पवित्र तीर्थोदक आपल्या अगावर पडावे व आपले अभ्यगस्नान व्हावे म्हणून त्या दिवशी शकडो भक्त गण तेथ स्नानाकरिता आलेले असतात पायावरील पाणी नेमके खाली व ल्या माणसाच्या डोक्यावर पडते व ते पडेल अशाच रीतीने महाराज बसतात ! बायका, मुलें, पुरुष या सर्वांनी असे पायाखाली बसूनच पादोदकानें स्नान करण्याची तेथें प्रथा आहे व भोळ्याबापड्याची समजूत अशी की, पादोदकाने अभ्यग स्नान घडल्यास पुण्य लागते

अतर्ज्ञानाच्या व चमत्काराच्या कंड्या—नारायणबुवा हा मोठा डोक्याचा मनुष्य आहे तो लुग्यासुग्याच्या ओळखी कधीच ठेवीत नाही पण जे श्रीमत, निपुत्रिक, आर्त, दुखी असे असतात त्याची ओळख हे अगदी मुद्दाम ठेवीत असतात असले गृहस्थ कधी भेटले की, नारायणबुवा 'या, बसा, अमुक वेळी भेट झाली होती नाही? नारायणाची कृपा आहे!' असे म्हणून लागलीच ओळख देत असतात ते पाहिले की असले भोळे लोक म्हणतात, 'पहा, अहो लाखो लोक येत जात असताना आमची ओळख ठेवणे हे अतर्ज्ञानावाचून कसे शक्य आहे ? ' झाले ! असे काही लोक अतर्ज्ञानाबद्दल बोलू लागले की महाराजाचे पित्ते तेथ यतात व महाराज असे आहेत, तसे आहेत, अतर्ज्ञानी आहेत, वगैरे माप लावतात

एकदा अशा लोकाचा आपल्या सासऱ्याच्या घरात शिरकाव झाला

म्हणजे ते हळुहळू महाराजांचे अद्भुत सामर्थ्य व चमत्कार वगैरे वर्ण लागतात.

जोंवर आपले यथास्थित चालतें आणि मनासारखे होते तोंवर हे असले लोक वाटेल तसल्या सामर्थ्याच्या कंड्या उठवीत असतात. पण यांच्याविरुद्ध असे काही झाले म्हणजे हे लोक बोटें मोडत असतात. दुसरीकडे जेवायची सोय नसते म्हणूनच हे लोक तेथें राहातात.

ज्याचे रोग गेले नाहीत, ज्याना मुलेहि झाली नाहीत, ज्याना नोकऱ्या मिळाल्या नाहीत, पण ज्याचे पैसे मात्र गेले, असे पुष्कळ समदुःखी लोक केव्हां केव्हा तेथें एकत्र जमतात व मग पश्चात्तापानें असल्या गोष्टी सांगत बसतात. नारायणबुवा हे लेखानें, टांकानें कुठेच गुतणारे नसल्यामुळे त्यांच्यापुढें कोणाचें कांही चालत नाही!

मला एकदां एक अगदी नंगा झालेला असाच शेट भेटला होता. त्याचेंहि सर्वस्व महाराजांच्या नादानें गेलें होतें. तो मला म्हणाला, 'काय मल्हारराव! अवो, आमचा सगळा पैसा गेला, कांहीवी राहिला नाही! हे अगातला अंगीबी राहिला नाही. अहो, नळ नाहीं, च्यावी नाही व पाणी बी नाही अशी स्थिति! तवा आम्हाला कांही पैसे द्या.' याला महराजांनीं पुढें कांही दिलें नाहीं!

**मेला तर सद्गति व बरा झाला तर गुरुकृपा!** :—अनेक उपाय करून हताश झालेले असे श्रीमत रोगी लोक तेथें मरायला येतात. केडगांव वेटांत तीर्थ व अंगारा हीं दोनच मुख्य औषधें आहेत. महाराज तीर्थ व अंगारा देतात. एखाद्याला जरा बरें वाटलें की, 'काय अंगाऱ्याचा प्रताप!' असे भक्तगण म्हणतात व जर त्याचा रोग वाढून तो आटपला तर 'वाः वाः त्याला सद्गति मिळाली! केवळ तीर्थ व अंगाऱ्याकरितांच तो आला!' असेंहि म्हणतात! निपुत्रिक असे श्रीमंत शेट तेथें येऊन स्वर्गस्थ झाले म्हणजे त्याच्या स्त्रियांची फार दुर्दशा उडते. माझ्या पाहाण्यांत असें एक अत्यंत हृदयद्रावक उदाहरण आले.

**बुवा व पैसा**:—हे बुवा पैशाच्या कामांत फारच धूर्त व चाणाक्ष आहेत. त्यांच्या पुढे रुपाया दोन रुपये कोणी ठेवले तर ते स्वतः लगेच

परत देतात, पण पुन्हा जर कोणी हे आपल्याकरिता आहेत आपल्या भांडारखान्यातच जाऊ देत असे विनतिपूर्वक सांगितले म्हणजे महाराज ते जाकिटाच्या खिशात टाकतात! महाराजांना अंगात जाकीट नेहमी लागते, आणि जाकिटाच्या या दोन खिशामध्यें, आलेले पैसे महाराज स्वत भरत असतात शिवाय रोज मनिआर्डरीहि येतात त्या महाराज स्वत सही करून घेतात लोकांच्या दर्शनाची ही सकाळची वेळ व या मनिऑर्डरी येण्याची वेळ बहुतेक एकच असते त्यामुळे इकडे लोक दर्शन घेत आहेत व इकडे यांच्या सहचा चाललेल्या आहेत असे एकदम चालू असते. महाराजांना लिहिणेपुसणे, जमाखर्च यांची माहिती फारशी नसावी तथापि त्यांचे डोके सुपीक असल्यामुळें ते हे पैशाचे व्यवहार मोठ्या चतुराईने उरकीत असतात

नारायणबुवा हे आपल्या निवासस्थानातील एका खोलीमध्ये कव्हा कव्हा बसतात तेथच तिजोरी आहे ते सव पैसा म्हणजे नोटांची पुडकी आपल्या तिजोरीतच ठेवतात अगदी अतम्य लोकांशिवाय इतरांना त्या खोलीत मज्जाव असतो म्हणून बाहेर पडताच नारायणबुवा ती खोली लावून घेत असतात खोली उघडी व तिजोरी उघडी अशा वेळी ज्यांनी डोकावून पाहिलेले आहे त्यांना तेथील संपत्तीची चांगलीच कल्पना आलेली आहे!

**श्री शंकराचार्य व नारायणमहाराज—११०८** सत्यनारायण ज्यावेळी झाले त्यावेळी श्री शंकराचार्य मठ संकेश्वर यांची स्वारी तेथ उपस्थित होती त्यावेळी लोकांवर छाप पडावी व शंकराचार्यांवरहि आपला प्रभाव पडावा म्हणून नारायणबुवांनी त्यांच्या स्वागताची एक औरच तयारी केली सत्यनारायणाकरिता कर्नाटकांतील श्री नागेशशास्त्री यांच्यामार्फत जे शंकडा भटजी आणलेले होते,त्यांतील दोनतीनशें ब्राह्मणांची एक तुकडी त्यांनी तयार केली नारायणबुवा पुढें आणि त्यांच्यामागें एका रांगेत भस्माचे पट्टे ओढलेले चारचार भटजी वेदघोष करीत चालले होते शंकराचार्यांची मोटार ओढ्याच्या अलीकडे आणून उभी केली होती त्यांना तो वेदघोष, ते ब्राह्मण, ते नारायणमहाराज हा सगळा थाट अवलोकन केला व असे स्वागत कधीहि व कुठेंहि न पाहिलेले पाहून या वेळा धन्यता मानली!

हरिनाना काळकुंद्रीकर व नारायणमहाराज



जरी लोटणें काळदाढेंत लोटा, स्वहस्तेंच, तें लाभ होईल मोठा (?)

—श्रीनारायणस्तव

आदल्या दिवशी सत्यनारायणसमारंभ उरकला व दुसऱ्या दिवशी सायंकाळी आचार्यांची पाद्यपूजा झाली. नारायणबुवा हे मोठे धोरणी असल्यामुळे त्यांनी या वेळी धूर्तता दाखविली. शंकराचार्य शंकराचा अवतार व नारायणबुवा दत्ताचा अवतार ! तेव्हा कुणी कुणाची पूजा करावी ? या दोन अवतारांत जर शंकराचार्यांची (भटजींची) पूजा केली तर महत्त्व ते काय राहिले ? तेव्हा आपल्या एका सपत्निक कारभाऱ्याला आचार्यपूजा करावयास त्यांनी सांगितले ! हा सर्व समारंभ नारायणबुवांच्या हॉलसमोरील तुळशीवृंदावनाच्या संगमरवरी पटांगणावर उरकण्यात आला.

अभूतपूर्व स्वागत, थाटाची पाद्यपूजा आणि यथास्थित सत्कार वगैरे झाल्यावर पीठाधिष्ठित आचार्यसुद्धा या बुवांबद्दल कसे बोलतील हे सांगावयास नकोच ! पाद्यपूजेनंतर श्रीमत् आचार्यांचे जे भाषण झाले, त्यात ते म्हणाले—

हरिनाना काळकुंद्रीकर व नारायणमहाराज



जरी लोटणें काळदाढेंत लोटा, स्वहस्तेंच, तें लाभ होईल मोठा (?)

—श्रीनारायणस्तव

त्यांचा कारभार पाहूं लागले व १९१८ ते १९२३ पर्यंत त्यांनी सर्व गाडें पूर्वस्थितीवर आणून ठेवले. या वेळी त्याचा सालीना वसूल सोळा–सतरा हजार रुपये येत होता

१९१९ सालापासून हरिनानांचा नारायणमहाराजांशी संबंध आला व ते स्वतःच्या मोटारीने केडगावास १९२४ पासून जाऊं लागले. ११०८ सत्यनारायण केडगावास जेव्हां झाले तेव्हा नानासाहेब तेथे होते. दत्त-जयंती व वैशाखी या वेळी ते तेथें जात. चातुर्मासांत तर तथें त्यांचा मुक्कामच होई. याप्रमाणें वरचेवर जाणेयेणें होऊं लागलें, तेव्हां स्वतःस उपयोगी पडावी म्हणून त्यांनी तीन हजार रुपये खर्चून तेथें एक इमारत बांधली. या इमारतीसाठी यांचा खर्च झाला असला तरी तिची मालकी मात्र नानांच्याकडे नाही. नानांच्या बरोबर मी स्वतः खेटास बऱ्याच खेपा घातलेल्या असून माझ्या तेथील सर्व दिवसांची बेरीज केल्यास ती जवळजवळ सहा महिने तरी भरेल.

माझ्या श्वशुरांना फक्त एक मुलगी आहे, मुलगा नाही. या मुलीचा मुलगा म्हणजे माझा मुलगा त्याना दत्तक दिला असल्यामुळें नानांच्या मिळकतीचा वारसा त्याच्याकडेच आला आहे. महाराजांच्या नादी लागल्याने नानांनी आपल्या संपत्तीची कशी वासलात लाविली आणि त्यामुळें या मुलाचें केवढें नुकसान झाले ते आता आपोआप दिसून येईल

बेळगाव येथील घर रु १२००, मकेश्वर यथाल जमीन व घर रु १२८०
एकूण किमत रु ५३२९०

येणेप्रमाण जमीनी व घर प्रापचिक दृष्टचा काही कारण नसता नानानी विकली त्याच्या १९२० ते १९३४ सालच्या डायऱ्या तपासता श्री, वेट व चाफेकर याच्या नावावर लहानमोठया रकमा अनेक पडलेल्या दिसतात त्यातल्या त्यात ९-८-२७ व ५-६-३१ या तारखास यांच्या नाव वऱ्याच मोठया रकमा खर्ची पडल्या आहेत या वरील अपन्न हजारात प्रवासखर्च, बरोबरच्या माणसाचा खर्च, वगैरे कारणासाठी साठ [redacted] रुपये जरी वजा केले तरी बाकीची रक्कम कोठे गली हे कोणासहि सहज ओळखता येण्यासारख आहे

प्रत्येक घद्याला हुपार हस्तकाची फार आवश्यकता असते बुवाशाहीचा धदाहि याला अपवाद नाही नारायणमहाराजाजवळील मडळीत चाफेकर नावाचा एक इसम होता तो नानाना वरचेवर म्हणे, 'तुम्हाला काय कमी आहे ? ना मूल ना बाळ ! आहे ते सर्व गुरुचरणी अर्पण करा व एकदा गुरुकृपा झाल्यावर तुम्हाला कशाची ददात पडणार नाही ! ' भोळ्या नानावर या त्याच्या शब्दाचा फार परिणाम होई यामुळ नाना बुवाबाजीत जास्त जास्तच खोल रुतत गेले

जाळें पसरलें !! – हळूहळू बायकामाणसासह ते केडगावीच जाऊन तिकडेच जास्त काळ घालवू लागले ते असा तऱ्हेने जाळयात कायले गुरफटले गेल्याचे पाहून चाफेकरानी एकदा सुचविले–

'नानासाहब, तुम्ही तर आत्ता सद्‌गुरुसेवेसाठी येथे येऊन राहाणार, मग चीजवस्तु, दागदागिने सर्व बेळगावात ठेवता कशाला ? जेथे आपला जीव तेथेच जवळ सर्व असले तर बरे. जमीनी काही कोणी उचलून नेत नाही, पण इतर वस्तूचा नेम काय ? तेव्हा असेल नसेल ते येथच घेऊन या '

झाल ! हे बोलणें नानाना पटले त्यानी घरातील बहुतेक जिनसा व दागदागिने तिकडे नेले त्यातील ठळक वस्तूची यादी पुढें देत आहे–

| वस्तु | अजमासे कि रु | वस्तु | अजमासे कि रु |
|---|---|---|---|
| हिऱ्याची बुडी-जोड | २५०० | तोडे-जोड सोन्याचे | ३००० |

| | | | |
|---|---|---|---|
| सरी | ६४२ | वाळी | ०८७ |
| चिंचपट्या | १५०० | सोन्याचा गोफ | ३०० |
| मोत्यांचे पेन्क | १२०० | नथ | १२०० |

एकूण किंमत ११३२९ रु

याशिवाय हिऱ्याची आंगठी बाराशेची त्याच्या बोटात होती, तिची हकीकत ओघाने पुढें येणारच आहे

येडगावी हे जिन्नस गेल्यावर चाफेकर म्हणाले, ' नानासाहेब, जिन्नस आणलेत हे खरे केलेत, पण आता त येथें तरी आपल्याच बिऱ्हाडी का ठेवता ? नाही झाले तरी हे बेट ! सर्व माणसे नारायणसेवेत गुंतलेली ! तुम्ही आम्हीसुद्धा सदैव तिकडेच या संधीचा फायदा घेऊन कोणी डल्ला मारला तर करणार काय ? यापेक्षा जिनसाचा डबा महाराजांच्या स्वाधीन करावा हे उत्तम ! त्यांच्या तिजोरीत जिन्नस सुरक्षित राहातील ! काही झाले तरी आपल्या इहपर कल्याणाचा बोजा विश्वासाने महाराजांवर आता ठेविला आहे तेव्हा येथें तरी जिनसाची काळजी स्वत कडे कशाला घेता ? '

प्रज्ञाहत हरिनानाना त बोलणें बरोबर पटले व त्यांनी तो दागि न्याचा डबा महाराजांकडे नेऊन त्यांच्या हवाली केला !

हरिनाना निर्धास्त झाले, चाफेकर कृतकृत्य झाले, आणि आपल्या भक्ताची ही श्रद्धा पाहून महाराजांनी आनंद व्यक्त केला ! पण माझ्या आयाबाईंचा जीव दागिन्याकरिता तळमळू लागला महाराजांना दुस ऱ्याचे मनोगत चटकन् ओळखता येत त्यांनी आयाबाईंची बरीच चलबिचल पाहून त्या दर्शनास आल्यावेळीं त्यास मुद्दाम तो डबा दाखविला व म्हटले, 'हा तुमचा आहे ना ? आहे बर, काळजी नको ' मात्र असं सांगत ना त्यांनीं फक्त डबा दाखविला, तो उघडून आतील दागिने काही दाखविले नाहीत !

महाराजांनी असे म्हटल्यावर बिचाऱ्या आयाबाई दागिन्याबद्दल जास्त काय बोलणार ? त्या निमूटपणे परतल्या पण दागिन्याबद्दलची धास्तव त्यांची कमी झाली नाही पुढें एक सण आला तेव्हा श्री नानासाहेब हे स्वत दागिने मागण्यास गेले महाराजांनी त्या वेळी तिजोरीतून एक नथ नेवढी आणून दिली व ती घेऊन नानासाहेब बंगल्यात आले त्यानंतर

आणखी एक मण आणा बहुतेक दिवाळी अमावी त्यावेळी आत्याबाई सन जिन्नस मागण्याकरिता गेल्या महाराज म्हणाले, ' आवो, तुमचा डबा ! ज्याचा त्यानी नेला ! ' मग आत्याबाई म्हणाल्या ' मला न विचारता अगर न कळविता आपण का दिलात ? महाराज म्हणाले, ' बायकाना नस्त्या खोलणाण्यात जाऊ नये अशी चौकशी कल्याण पुरुषाचा कमीपणा होता चला, गोविंदा करावयास जावयाचे आहे ! ' असे म्हणून बुवा गौचास जावयास उठले ! ! !

आत्याबाईंच्या मनाची स्थिति हे उद्गार एकून काय झाली असेल याची वाचकानीच कल्पना करावी ! त्यानी विन्हाडी आल्यावर यजमानाना दागिन्याबद्दल विचारलें हरिनाना म्हणाले, ' आपण ते जिन्नस आणले नाहीत, ते महाराजापाशीच आहेत आत्याबाईंनी पुन पुन्हा चौकशी करून पाहिली पण तिचा काही उपयोग झाला नाही ते जिन्नस तिकडे आणि हरिनाना इकडे असे दोघ नारायणरूपच झाले असे दिसते !

नारायणाला काय करतो कावळा ?—आता हरिनानाच्या हाना तील हिऱ्याच्या आगठीची गमतीदार हकीकत पाहा !

एकदा काही जवाहिर महाराजाकडे आले होते त्याना आपल काही जिन्नस दाखविले व लोकाच काही गड, हिरे कुड्या वगैरे जिन्नस पाहिले हरिनानाच्या बोटातील बाराशे रुपयाची हिऱ्याची आगठी त्या जवाहिऱ्यान पाहिली व तो म्हणाला, ' हवा हिऱ्याच्या आत झिरम् म्हणजे बारीक काळा डाग आहे ही आगठी अपशकुनी असताना ती तुम्हीं का वापरता '

महाराज लगेच म्हणाले नानासाहेब याच्यामध्य कावळा आहे काय ? कावळा आहे वर कावळा ? ती ठेवावयाची नाही घरात ! काय ती घरात ठेवावयाची नाहीं वर ! नारायण त्याचा व्यवस्था करील काय ' (वाक्य सपल्याबरोबर ' काय उच्चारण्याची महाराजाना सवय आहे) नारायणाला काय करतो कावळा ? (महाराज चोचर व बोबडेंहि बोलतात )

असं म्हटल्यावर हतबुद्ध हरिनाना अधिक काय बोलणार ? त्यानी आगठी काढली व महाराजाच्या स्वाधीन केली

वाघाला उठवू ?—एकदा महाराज नानासाहेबाच्या निवासस्थानी गा

त्या वेळी मी तेथे नव्हतो. तेथे वाघाचे कातडे अंथरलेले होते व त्या कातड्याला वाघाचें तोंड पूर्ववत् बसविलेलें होतें. त्या आसनावर बसून महाराज नानांना म्हणाले, 'नानासाहेब, हे काय ? हे बघितले काय ?' नानासाहेब म्हणाले, 'हा वाघ होता ' महाराज म्हणाले, 'त्याला उठवू काय ? वाघ काय करतो ? ' आणि त्याबरोबरच जणु काय आपल्या म्हणण्याप्रमाणें आपण प्रत्यक्ष करून दाखविणार आहों असा महाराजांनी आविर्भाव केला त्यासरशी नाना म्हणाले, 'देवा देवा ! नको नको ! अशी हृत्कृपा करूं नका ! ' इतकें झाल्यावर महाराज निघून गेले.

मी बाहेरून आल्यावर नानांनीं ही हकीकत मला सांगितली. त्यावर मी म्हटलें,

'नानासाहेब, हे तुमचे चुकले. अहो, कातड्याचा वाघ जिवंत होणे शक्य तरी आहे काय ! उगीच कोणी थाप दिली की तुम्ही ती खरी मानून त्यावर कसा विश्वास ठेवतां हें समजत नाही.'

त्यावर ते म्हणाले, 'तू पोर आहेस, आणि ही गुरुलीला कांहीं और आहे ! तुला ही कळावयाची नाही !'

बुवाच्या नादी लागणाऱ्या माणसाची मति कशी भ्रष्ट होते याचा हा एक उत्तम नमुना आहे

माझ्या श्वशुरांना लागलेले हें बुवाबाजीचे व्यसन त्यांच्या अखेर-पर्यंत कायम होतें व त्यांतच त्यांचा गेल्या वर्षी अंत झाला !

* * *

## गुरुकृपेमुळें सर्वनाश !

(लेखिका:-श्रीमती गंगाबाई दांडेकर
नर्सिंग-क्लास, कामा हॉस्पिटल, मुंबई.)

बी. बी. सी. आय्. लाइनवर पालघर येथें दांडेकरांचें एक सुप्रसिद्ध घराणे आहे. या एका घराण्यांतील अनेक भाऊबंद दांडेकर हल्ली तेथे नांदत आहेत

पालघरास जी चारपाच प्रमुख घराणीं राहावयास आली, त्यात श्रीमत बुनाभाऊ हे चुलत्याला दत्तक गेल्यामुळें त्यांना दोन्ही घराण्यांतील मिळून

बरीच संपत्ति मिळाली होती त्यांना चार मुलगे होते त्यातील विनायक कृष्ण दाडेकर हे माझे पति असून, केडगावच्या नारायणबुवांने आमचे कसे वाटोळे केलं, हे येथे मला दाखवावयाचे आहे

माझें नाव गंगाबाई माहेरचे नाव सिंधूबाई गोखले मातुश्रींचे नाव गंधाबाई माझे वडील बंधु चिंतामणराव गोखले हे सबडिव्हिजनल ऑफिसर असून हल्ली ते नगर जिल्ह्यात राहात कॅंपवर आहेत माझे एक नातलग श्री. वामन श्रीधर आपटे मुंबई येथें असतात त्यांच्या आश्रयास मी असतें नारायणबुवाच्या नादी लागून माझें लक्षाधीश घराणें धुळीस मिळालें आणि मला हल्ली नर्सिंगचा कोर्स घ्यावा लागलेला आहे माझी कर्मकथा पुढीलप्रमाणे आहे---

आमच्या मंडळींचे शिक्षण बेताचे घरची स्थिति चांगली असल्यामुळे त्यांचे लक्ष देवधर्माकडे असे उपास कर, अभिषेक कर, एकादशी कर, असं ते करीत असत त्यांचा देवभोळा स्वभाव पाहून वासुदेवराव चाफेकर व आणखी काही मंडळींनी माझ्या यजमानांना नारायणबुवांचे खूप महत्त्व सांगितलं बाजीराव दाडेकर या नावाचे आमचे एक नातलग होते त्यांच्याकडे विष्णुपंत लेले या नावाचे गृहस्थ वरचेवर येत ते नारायण बुवाजवळ सहकुटुंब होते रा लेले यांनी बाजीराव दाडेकरांना नारायण बुवाचे महत्त्व सांगून केडगावास दर्शनासाठी नेले त्याचप्रमाणे आमच्या मंडळींना चाफेकर यांनी 'नाहीं नाहीं' ते सांगून त्यांचा बुद्धिभेद केला.

अदाजें वीसपंचवीस वर्षांपूर्वी एकदा नारायणबुवा वसईजवळ निर्मळचे यात्रेस आले होते त्या वेळीं चाफेकर व लेले मंडळींनी इतकी गळ घातली व भुरळ पाडली कीं, बाजीराव दाडेकर व माझे यजमान हे वडिलांच्या परवानगीन नारायणबुवांच्या दर्शनास गेले तेथें ते दोनतीन दिवस होते तेवढ्या अवधींत चारपांच वेळा दर्शनास गेले असावेत आमच्या मंडळींनी घरी आल्यावर मला सांगितलें कीं, "महाराजांचे सामर्थ्य काय म्हणून सांगू ! त्यांनी बिरगळीतून माझ्या देखत गंगा काढली ! ! बरं ! मला आता काही नको ! महाराज प्रसन्न झाल्यावर सर्व सिद्धि माझ्यापुढें हात जोडून उभ्या राहातील अरे, पाहा, हा एवढा दीडशे रुपये पगार मिळविणारा मामलेदार

चाफेकर (मेकॅनिकल इंजिनियर) तो म्हणतो कीं, नोकरीवर लाथ मारून महाराजांच्या नादीं मी उगाच लागलो नाही. महाराजाकडून काय का लाभ होईल हें मांगणें शक्य नाहीं!"

चाफेकर हा नारायणबुवांचा हस्तक असावा, असें मला शेवटीं शेवटं वाटूं लागलें. कारण चाफेकर हा वरचेवर पालघरास येई व आमच्या मंड ळींना असेंच वरचेवर सांगे त्याचा परिणाम त्याच्यावर फार होई. एकद आमची मंडळी केडगांवी पंधरा दिवस राहावयास गेली. तिकडून आल्याव हे मला सांगूं लागले की, "अग, केडगांवचा काय थाट विचारतेस? फार मोठी माणसें महाराजाच्या भजनी लागलीं आहेत. थाट काय सांगूं? दर पूर्णिमेस सत्यनारायण होतात. चांदीची भांडीं आणि इतर थाट असा आहे कीं, तो पाहून संस्थानिकहि लाजतील." हें सर्व ऐकून मला माम काळजी वाटूं लागली!

माझे मामंजी वरचेवर पैसे देत नसत. त्यांना केडगांवीं जाणें नापसंत होतें. मुलाचें शिक्षण बेताचें व प्रपंचाकडे लक्ष कमी आणि त्यांचा चौथ्या बायकोच्या संसाराकडे ओढा, त्यामुळें मामंजींचें लक्ष माझ्या यजमानांवरून उडालें यांत कांहींच नवल नाहीं. एकदा मामंजींनीं अशी ताकीद दिली कीं, "बस्स! यापुढें तुला मी पैसे देणार नाहीं. वाटल्यास घरांत राहा. नाहीं तर बाहेर वेगळा राहा." मामंजींच्या या वर्तणुकीचा त्रास मलाहि होऊं लागला. बाजीराव दांडेकर व वासुदेवराव चाफेकर, यांचा सल्ला आमच्या मंडळींना आवडूं लागला. चाफेकर नेहमी सांगत असे. कीं, "अरे नाना, महाराजांची कृपा झाली की आपल्यास कांहीं कमी नाहीं. तू फक्त महाराजांना शरण जा व तेवढें केलेंस म्हणजे लौकिक अगर व्यावहारिक जगाकडे पाहण्याचें तुला कांहीं एक कारण नाहीं."

आमच्या मंडळीना चाफेकराकडून पत्रें येत. त्यांत ते असें लिहीत कीं, "तुमच्यावर महाराजांची मर्जी फार आहे. तेव्हां गुरुपूर्णिमेस दर्शनास यावें." एकदां ह्यांनीं, तिकडे येण्यास पैसे मिळत नाहीत, वडील विरुद्ध आहेत, अशा आशयाचें एक पत्र लिहिलें. त्यासरशी नारायणबुवांनीं लगेच चाफेकर यांना पाठविलें. ते बहुतेक बंधूकडे उतरत, व आल्यावर शिटा वगैरे घालून आमच्या मंडळींना घेऊन फिरावयास जात, व तेथेंच त्यांचीं बोलणीं होत.



नारायणमहाराज भक्तांच्या मध्यभागीं बसले आहेत त्यांच्या उजवीकडे सद्रा घातलेले विनायकराव दांडेकर हात जोडून गुरुचरणी लीन झाले आहेत.

चाफेकर म्हणत की, " अरे, तुला व तुझ्या कुटुंबाला त्रास चुकविण्याचा आपण निराळाच मार्ग काढूं. " तो मार्ग बहुधा त्यांनी वेगळें होण्याचाच ठरविला, परतु तसे स्पष्ट स्वतःच्या तोंडून सांगावयाचें नव्हतें असें दिसतें.

त्या खेपेस आमच्या मामंजीनी पैसे दिले नाहीत; परंतु बाजीराव दांडेकर यांनी आपल्या वडिलांपासून पैसे घेतले व ही सर्व मंडळी केडगांवी गेली. बाजीराव दांडेकर याच्या वडिलांनाहि बुवांच्या नादी लागणें नापसंत होतें. त्यामुळें तेहि पुढें पैसे देईनासे झाले. एकदा तर पैसे देण्याचें त्यांनी साफ नाकारल्यामुळें बापामुलांमध्यें तंटा झाला, अशा अफवा उठल्या होत्या! केडगांवीं गेल्यावर बाजीराव व आमची मंडळी याना स्वतंत्र व विनत्रासाचा मार्ग चोखळण्यास नारायण महाराजांनी उपदेश केला. त्याप्रमाणें घरी 'आल्यावर बाजीरावानें वडिलांशीं बोलणें 'काढलें. पण वडिलांनी हिस्सा देण्याचें साफ नाकारलें, आणि लागतील तसे पैसे देईन असें आश्वासन दिलें. माझ्या मामंजीनीं मात्र वैतागून व चिडून सांगितलें कीं, " मला हा त्रास वरचेवर नको. तुझा तू हिस्सा घे व पाहिजे तें कर. " पण हिस्सा लवकर दिला नाहीं व पैसेहि देईनासे झाले.

'पुढें माझ्या यजमानांनीं बाजीराव दांडेकर यांच्या गांवी ' बहि ' येथें आपलें बिऱ्हाड नेलें. तेथें आम्ही नवरा–बायको, बाजीराव व चाफेकर अशीं चार माणसें होतों. तेथून ही मंडळी वरचेवर केडगांवी जात. मला मात्र एकटीलाच तेथें राहावें लागत असे. मी गेले कीं तेथेंच राहण्याबद्दल नारायणबुवा मला आग्रह करी, पण मी त्याला नापसंति दाखवीत असे. मामंजीकडून पैसा नाही, घरची अशी स्थिति, त्यांत माझें बाळंतपण व अजार, यामुळें माझी फार आबाळ होऊं लागली. घरांतहि सख्खे सावत्र अशा सबंधीचे त्रासदायक प्रकार होऊं लागल्यामुळें, वेगळें झालें तर बरें असें मलाहि वाटूं लागलें. वेगळे होऊन निराळा संसार थाटण्याची उमेद वाटली. बखले वकील यांना वकीलपत्र देण्याबद्दल यांना उपदेश मिळाला, आणि त्यांच्यामार्फत हिस्सा मिळण्याबद्दलची नोटीस आमच्या मंडळीनी मामंजींना दिली

माझे मामंजी हे चांगले व्यवहारदक्ष होते. त्यांना निरंजिवांचें अवसान समजल्यामुळें त्यानी लगेच वागुळसर, या नांवाचें एक खेडें वहिवाटीला दिलें

व तेथें राहून कसा काय कारभार चालविता ते पाहातो व मग सर्व देतो असे सांगितले

पण आमच्या मडळीच्या मनात केडावी असे भरविल की, "वडिलाकडे सर्व वाटा माग व त्यासाठी वकले वकील दे " एक जिवत बाप असताना दुसऱ्या बापाची काय जरूर? " अशी उठावणी मिळाल्यावर, बकले वकीलामार्फत सबध हिश्शाची नोटीस ह्यानी दिली फिर्याद लावल्यावर बकले वकील हे मामजींना भेटावयास गेले व गोडगोड बोलून " मी हमी घेता, अफरातफर होऊ देत नाही " असे सागून वाटा देण्यास सांगितले, त्यावर मामजी म्हणाले की, " हिस्सा मी केव्हाहि देता आता सातामातांचाच हिस्सा देणे आहे चार मुलगे व पाचवी बायको असे पाच वाटे काढले पाहिजेत, मोजणी वगैरे केली पाहिजे, इतक होण्यास वर्ष तरी लागेल ".

**नेपाळची यात्रा**—या सुमारास नारायण महाराज काशीयात्रेस व नेपाळच्या यात्रेस निघाले ह साल १९१६ असाव या यात्रेत बाजीराव दाडेकर, चाफेकर वगैरे मडळी होती काहीं बायकाहि बरोबर होत्या यात्रेस जाण्यापूर्वीपासून चाफेकर हे आमच्या मडळींना वरचेवर स्तुति करुन चढवीत, आणि " या यात्रेचा खर्च तुम्हीच खरे भक्त असल्याने करा " असे ते म्हणत या यात्रातील एक वेळचा खर्च म्हणे बाजीरावानी पतकरला, आणि एक वेळच्या खर्चाकरिता आमच्या मडळीनी 'वेणीमजुरली व तांदुळवाडी' अशी दोन गावे अदाजें दहा ते बारा हजाराला विकली बारा हजारानी यात्रेचा खर्च निभणार नाहीं, असे बुवानी सांगितल्यावरून, आमच्या मडळीनी ' वागूळसर ' ह गावहि गहाण ठेविल !

काशीयात्रेची तयारी केली दोन मुले, एक गडी व मी, आणि बाजीराव, चाफेकर वगैरे इतर सर्व होते आमच्या मडळींनी मजबरोबर काशीयात्रेची तयारी केल्याचे दाखविले परंतु पैसे पुरणार नाहीत, असे जेव्हा महाराजानी सांगितले तेव्हा त्यानी मला अशी थाप दिली की, " मला काम आहे, मी मागाहून येता तू महाराजाबरोबर जा, सर्व व्यवस्था होईल " ते ऐकून मी चकितच झाले पण तिकिट काढली असल्याने मी ठरल्याप्रमाणे प्रवासास निघाले

नारायणबुवाचा सर्व प्रवास एकदोन शिष्यासह पहिल्या वर्गानेच

झाला. आम्ही अश्वमेध घाटावर गेलो. तेथें वाळे यांच्या तर्फे सर्व व्यवस्था झाली. त्यांच्या गाड्या फिरावयास नेण्याकरिता येत असत मी सुमारें दोन महिने काशीस होतें. नारायणबुवा पुढें नेपाळास गेले. त्यांच्याबरोबर केसरबाई होती. बाजीरावांची मंडळी काशीसच होती. पधरा वीस दिवसांनीं नारायणबुवा नेपाळची यात्रा करून परतले. आमच्या मागून सुमारें एक महिन्यानें माझे यजमान काशीस आले. ते नेपाळास गेले नव्हते. काशी येथें चाफेकर यांच्या नांवें माझ्या पतीनीं लिहिलेलें पत्र मी पाहिलें. त्यांत मजकूर असा होता कीं, "पैसे पुरतील कीं नाहीं? वागुळसर हें गांव अद्याप गहाण पडलेले नाही" इत्यादि. दुसरें पत्र असें होतें कीं, "बाळाभाई वाणी या पालघरच्या एका वाण्याकडून चार हजार रुपये काढून लौकरच पाठवितों." या पत्राबद्दल मी त्यांना काशीस आल्यावर विचारलें कीं, "हें काय आरंभिलें आहे? घरादारांचें वाटोळें करून अशा कोठें यात्रा करतात कीं काय?" त्यावर ते म्हणाले कीं, "तुम्ही कारभार करूं नका. आम्हांला सर्व कळलें आहे. तुमची काळजी आम्हाला आहे."

**दागिने काढून घेतले**—काशीस जाण्यापूर्वी ह्यांनी एकदां माझ्या अंगावरचे सर्व दागिने काढून घेतले आणि असें सांगितलें कीं, "शेती-सुधारणेकरितां पैसा पाहिजे आहे. शेतीचें उत्पन्न एकदम येत नाहीं. वडील तर पैसे देत नाहीत, तेव्हां तुझे सर्व दागिने मोडून शेतांत घालतो." अंदाजें तीनचार हजारांचे दागिने त्यांनीं घेतले.

यावेळून आम्ही सर्व मंडळी मुंबईस आलों, तों माझ्या पोटांत धस्स होण्याजोगा एक प्रसंग मला दिसला! मला असें कळलें कीं, दोन गावें तर महाराजांकरितां विकलीच आणि तिसरें वागूळसर हेंहि गहाण पडलेलें आहे. माझ्या यजमानांनीं सबंध इस्टेट मिळावी म्हणून दावा लाविला होता. अर्थात् ती जर मिळाली असती तर ती सगळी नारायणबुवाकडे गेली असती, अशी मला भीति पडली व काय करावें असा प्रश्न पडला. अशा वेळीं मला एकटीला ठेवून हे केडगांवी गेले. इकडे मी आजारी पडलें! केडगांवीं तारावर तारा केल्या, तरी तेथून ते आले नाहीत. इकडे कारकुनांनी पैसे पाहिजेत, कामें थांबली आहेत, असा एकसारखा तगादा लावला. त्या वेळीं मी फारच गांगरलें व मामंजींना बोलावणें पाठविलें.

मामजींना सर्व स्थिति कळून चुकली होती आम्ही जे कारकून ठेवले होते, तेहि फितूर झाले आहेत व सर्व लुबाडून नारायणबुवाकडे ते पाठवीत आहेत, असे दिसून आले आकाशच फाटल्यावर मला जीव नकोसा झाला! अशा वेळी मामजी म्हणाले, "सर्व मिळकत जात आहे वडिलार्जित मिळकत मला नातवाच्या नावे करता येत नाही, पण वकीलाचा सल्ला असा आहे की, तूं जर नवऱ्यावर दावा लावशील, तर तुला काही तरी मिळेल तुला काही मिळकत पाहिजे असेल तर आता फिर्याद लाव, मी साहाय्य करतो.' नंतर मामजींनी माझे सर्व सामान वागुळसर येथे आणविले आणि मीहि पालघरी गेले, पुढे मामजींच्या सांगण्यावरून व आजारी होते म्हणून मी माहीमला गेले तेथे काही दिवस राहून मी मुंबईस आले

माझ्या वहिणीचे यजमान श्रीमंत वामन श्रीधर आपटे यांनी हे सर्व प्रकरण हाती घेतले, त्यांनी ठाण्याचे भागवत आणि बापट यांना वकील देऊन, मार्फत आमच्या मंडळीवर फिर्याद करविली 'मुंबई समाचार व संदेश या पत्रामध्ये माझ्या नावाच्या नोटिसा मविलांनी दिल्या माझा मुलगा अशोक हा त्या वेळी लहान होता दोन लहान मुली व मुलगा यासह मी आजारी असताना केडगावास वरचेवर पत्र पाठविली तारा केल्या, तरी माझे यजमान हे एकदाहि केडगावाहून भेटावयास आले नाहीत त्यांनीं तर असा निरोप पाठविला की, मुलाच्या नावाने एक कवडीहि ठेवणार नाही मामजींनी त्यांना असे कळविले की, नातू चि अशोक याच्या नावाची सर्व मिळकत करतो आणि बापाने वहिवाटदार म्हणून तिचा उपभोग घ्यावा पण हे बोलणें माझ्या यजमानांना पटले नाही कारण सर्व वाटा घ्या व तो गुरूला अर्पण करा, असा कानमंत्र त्यांना मिळाला होता पण समन्स बजावले गेली आणि वर्तमानपत्रात नोटिसा फडकल्या असे पाहून नारायणबुवांनी असा सल्ला दिला की, " माझ्या हिस्सार्चा गाव मला पोचली, आता काही येणे नाही असे म्हणून सही कर " वणी मजुरणी, तांदुळवाडी व वागुळसर ही तीं गाव होत आमच्या मंडळींनी दस्तऐवज सही करून दिल्यावर सबब मिळकत त्यास असणे नाही वरील तीन गाव व काही रोकड त्यांना पूर्वी मिळाली होती अर्थात् ही गावे

मोडून बाकीचा हिस्सा माझ्या मामजींनी माझ्या मुलाच्या नावाचा करुन दिला म्हणून त्याचे थोडेबहुत तरी उत्पन्न हल्ली येते!

आमचे जे इतर भाऊबंद दाडेकर आहेत, त्याच्या मानाने हे राहि लेले उत्पन्न म्हणजे काहीच नाही आमच्या यजमानांनी नारायणबुवांच्या नादीं लागून जी तीन गावे नाहीशी केली, ती असती तर त्याचाच वसूल दरसाल कित्येक हजारापर्यंत आला असता पण आमचे दुर्दैव म्हणून सर्व गेले! माझे यजमान केडगावी गेले म्हणजे तेथील सर्व शिष्य "गुरुमहाराजाना भिक्वाळी अर्पण करा, सलकडी द्या, पोची द्या, वठी द्या" असे म्हणत [illegible] देत असत नारायणबुवाजवळ, विशेषत देवघरात दत्ताजवळ जें आहे, त्यातील बरचं आमचे आहे सोन्याचा गोफ, चांदीचा झोपाळा, चांदीची धगाळ, गालीचे आणि दव्हारे व इतर देवावरचे दागिने वगैरे मिळून बरेच जिन्नस आमचे आहेत आमचं सर्व उत्पन्न, रोकड व दागदागिने आमच्याजवळ राहात, तर प्रतिवर्षी काही हजाराचे उत्पन्न आणि १।२ लाखाच्या मिळकतीचे आम्ही मालक झाले असतो पण गुरु कृपेमुळें आमचा हा असा सर्वनाश झाला!

मामजीवर दावा लावण्यापूर्वी वागुळसर येथें असताना एकदा आमच्या मडळींनी नारायणबुवाना बोलाविले होते बरोबर दहापधरा मडळी होती त्यात लेले, चापेकर वगैरे त्याचे पट्टशिष्यहि होते तीनचार दिवस मारल्या मेजवान्या व पूजा चालू होत्या पण आमच्या कुटुंबातील कोणीहि मन्ळी तेथें आली नव्हती

माझी नारायणबुवावर कधी श्रद्धाच बसली नाही ज्याला धड बोल ताहि यत नाही तो काय डावल करणार! असं मला प्रथमपासून वाटे व आताहि तसेच वाटत नारायणमहाराजाकडे एक भाकड व अति सादाट म्हैस होती, ती प्रसाद म्हणून बुवानीं आमच्या गळ्यात अडकवली होती नी पुढें एकदांहि त्याली नाहीं माझ्याप्रमाणेच आणखी काहीं श्रीमन घराणी अशीच बुडाल्याचे मला माहीत आहे

कामीयात्रेला मी गेले तेव्हा बाजीराव, चापेकर वगैरे मडळी बरा-बर होती चापेकर हा नारायणबुवाचा उजवा हातच त्याचीं धोरणे फार दूरची असत तो कामीस गेल्यावर मला बरोबर म्हणे की, "वहिनी,

या तुझ्या अभोकाला कुव्यात टाकून दक्ष या ? हा जर बुडून मेला तर काशीत मोक्षाला जाईल व तुझ्या नशिबात असेल तर तुला दुसरा मुलगा होईल " यावरून माझ्या मुलाला नाहीसा करून सर्व संपत्ति लाटण्याचा त्याचा बेत असावा हें उघड दिसतें

साधारणपण पाचसहा महिने मी केडगावास राहिलें आहे तथील कार्यक्रम म्हणजे पूजा व आरती ! ! नारायणबुवा विशेष बोलत नाहीं तो फार बोलतो लोक त्याच्याकडे येतात, पूजा करतात, त्याचे पाय आपल्या डोक्यावर ठेवून घेतात आणि तीर्थहि घेतात दक्षिणेकडील एका संस्थानिकाचा एक पाणक्या केडगावी आला त्याचं नांव दत्त होतं नारायणबुवाची त्याच्यावर मर्जी बसली व त्याच्या पायात त्यानं चांदीचा तोडा घातला पुढें त्याचं लग्नहि करून दिलं तो पाणक्या म्हणे अवलिया प्रमाणें वागे पुढें त्याला मुले झाली त्याच्या बायकोशी नारायणबुवा हे, खुशाल पलंगावर बसून गप्पागोष्टी करीत व तिच्या मांडीवरहि लोळत नेथें राहाणाऱ्या इतर बायकांच्या मांडीवरहि नारायणबुवा लोळत एकांतात बोलत बसत आणि सेवा घेत हें मीं स्वतः पाहिलेलें आहे असो

नारायणचरित्रातील गोष्टी विश्वसनीय नाहीत नारायणबुवा थोडी स्नानसंध्या करतो आणि वस्त्र धान्य अशासारखे जिनस कोणी फुकट आणून दिले तर आपले महात्म्य वाढावें म्हणून तो ते वाटून टाकतो हाच त्याचा मोठेपणा ! आम्हीसुद्धा वागुळसर गाव गहाण टाकलं तेव्हां एक हजारांची मोहर दिली होती, ती त्याच वेळीं त्यानं वाटून टाकली

नारायणमहाराजाची एक शिष्या शहापुरी असते तिने बुवाला तिकडे बोलाविलं होतं तिकडे ते गेले व परत येताना माझ्या आईची व नारायणबुवाची वळगाव स्टेशनवर गाठ पडली माझ्या आईला पाहताच नारायणबुवा एकदम डब्यात शिरला पण आईनें भर प्लॅटफॉर्मवर लोकांच्या समक्ष त्याची पूजा करण्यास प्रारंभ केला लोकांची ही गर्दी उसळली ! माझ्या आईचे आतडेच कळवळत होतं म्हणून तिला राहावेना नारायण बुवा जे एकदा डब्यात दडून बसले ते पुढें गोंकाक स्टेशनवर आई उतरेपर्यंत त्यांनी डब्याबाहेर तोंड दाखविलं नाहीं !

नारायणबुवाचे चमत्कार—राखेची खडीसाखर करणे, आंगठ्यांतून गना काढणें वगैरे सर्व हातचलाखी आहे. निराळे चमत्कार कसलेहि नाहीत. लोक उगाच कड्या उठवीत असतात. चाफेकर तर मला उघड म्हणे, " हे पहा वहिनी, मी भामटा आहे. माझ्या ताब्यांत तुझे यजमान आहेत व नारायणबुवाहि आहे. मी सांगेन तसें ते दोघेहि वागतात. तुम्हां नवरा-बायकोंत वितुष्ट आणणें वगैरे सर्व माझ्या हातात आहे. फार काय, पण नारायणमहाराजाचा साधुपणासुद्धां माझ्या हातात आहे " या चाफेकरांचीं पत्रें आमच्या यजमानांच्या नावें येत कीं, तूप, मेतकूट, पोहे, पोहचाचे पापड वगैरे पाठवीत चला, व ते तसे आम्हीं वरचेवर पाठवीत होतों. इतर पत्रांविषयीं लिहिलेंच आहे.

आतां शेवटचा क्रूरपणाचा आघात सांगून माझी कर्मकथा पुरी करते. माझ्या यजमानांची स्थिति शेवटी शेवटी फारच वाईट झाली. ते भ्रमिष्टासारखे वागूं लागले. जवळचा सर्व पैसा गेला, व नारायणबुवा तर त्यांना विचारीना ! म्हणून त्यांना जीव नकोसा झाला. अफू खाऊन जीव द्यावा, असेंहि ते केव्हां केव्हां बडबडत. ना प्रपंच ना परमार्थ ! अशी स्थिति झाल्यावर कोणाचाहि जीव वैतागतो !! त्या वैतागांतच ते आजारी पडले, असें मला कळलें. यजमान केडगांवास व मी सांगलीस माझ्या वडिलां-कडे अशी स्थिति होती. माझी मुलगी त्या वेळी आठ दहा महिन्यांची होती. मीहि थोडी आजारी होते. मुलगा २ वर्षांचा होता. अशा स्थितीत एकदम पत्र आलें कीं, 'विनायक कृष्ण हे वारले !' आकाशां-तून डोक्यावर वीज आदळावी अशी ती आकस्मिक वातमी ऐकून माझी अवस्था झाली ! शोक, उद्वेग, संताप या विकारांनीं माझें हृदय पेटून गेलें. पण रडण्यावांचून मला काय करतां येण्याजोगें होतें ? त्या वार्तेनें माझी भ्रमिष्टासारखीच स्थिति झाली. इतक्या वर्षांनीं आजहि त्या प्रसं-गाची आठवण होतांच अंतःकरणाला असह्य वेदना होतात.

कोणी मनुष्य आजारी पडला कीं, त्याच्या आप्तेष्टांस कळविण्याची पद्धति आहे, तसे नारायणबुवानें बिलकूल कळविलें नाहीं. अगाऊ कळविलें असतें तर मी अगर माझे मामंजी तरी त्यास गेलों असतों. हे वारल्या-

नतर मामर्जीना नारायणबुवानें कळविलें त्यानी वडगावी मनुष्य पाठ विला व आम्हीहि पुढें तपास केला पण आश्चर्याची गोष्ट अशी की, ते आजारी कुठे होते, कस वारले, कुठे दहन झाले वगैरे माहिती आम्हाला बिलकुल मिळाली नाही ! आमच्या एका माणसाजवळ एक गृहस्थ म्हणाला की, "ते विहिरीत बुडून मेले ' पण इतक्यात चपापून त्यानें जीभ चावली, व म्हणाला, " छ, तसं काही नाही मला काही माहित नाही ' आणखीहि अशाच संशयास्पद गोष्टी कळल्या त्यावरून आपल्या मरणाने ते मेले का आजारात मेले, का कोणी विहिरीत ढकलल्यामुळे मेले हे, त्या ईश्वरास च माहीत ! एकदरीत या नारायणबुवाच्या पायीं आमचे सत्यानाश झाले दुसरे आहे

वर जे मी लिहिलें आहे ते अगदी सत्य आहे यात एक अक्षरहि खोटे नाही माझ्या ससाराचे वाटोळे झाले, तसे माझ्या भगिनींच्या ससाराचे होऊ नये म्हणून त्यास सावध करण्याकरिताच माझ्या दुर्दैवाची ही कहाणी मी त्यांच्या कानावर घालित आहे

* * *

## नारायणमहाराज व एका वृद्ध स्त्रीचा तळतळाट !

( लेखिका—श्रीमती राधाबाई गोखले, राहाते )

माझें माहेर व सासर हीं दोन्ही घराणीं फारच कुलीन व सुशील आहेत हें लिहिण्याचे कारण असे की, चालू जगाच्या परिस्थितीप्रमाण बायकानी किंवा पुरुषानी गुरुकरण, कुठे एखादा साधु आला की त्याच्या दर्शनास धाव घेणे हा प्रकार आमच्या घरी कुणालाहि आवडत नसे मग पूर्ण ज्ञान होऊन चांगले वाईट हे समजायला लागल्यापासून असली एखादी गोष्ट पाहाण्यास किंवा ऐकण्यासहि मला मिळाली नाही उलट जर काही प्रमाण पाहावयास मिळाले असेल तर ते नारायणबुवा जो आपल्याला सद्गुरु म्हणवून घेणारा, याचेच प्रकरण होय

या बुवाचे नाव कानी काढले की माझ्या जिवाची काय स्थिति होते, ती कुणाला सागून समजणे शक्य नाही ! या नारायणबुवापायीं माझे जावई विनायक कृष्ण दाडेकर याचा समूळ नाश झाला समूळ याचा अर्थ असा की, नारायणबुवाच्या नादी लागून माझे जावई लक्षाधीशाचे भिक्षाधीश झाले आणि शेवटी बुवाने वडगावहून दिल्यावरची आमचे क्वाही याना

पालघरी पत्र पाठविलें कीं, विनायक याला दोनतीन दिवस ताप येऊन शेवटी त्यांतच त्यांचा अंत झाला.

माझ्या जांवयाच्या वडिलांच्या हातीं अशा मजकुराचें पत्र पडल्या-बरोबर त्यांची स्थिति कोणत्या प्रकारची व कशी झाली असेल याचा देशबांधव व देशभगिनी विचार करतील काय ?

ज्याला म्हणून खरें शुद्ध प्रेम काय आहे याची जाणीव असेल, त्याचे नेत्र घटकाभर अश्रू ढाळल्याखेरीज राहाणार नाहीत,अशी माझी पूर्ण खात्री आहे. अहो, विचार करा, आपला एखादा जन्माचा हाडवैरी आणि दुष्मन असला तरीं तो जर अजारी पडला तर त्याच्याबद्दल आपलें मन द्रवून पूर्वस्थितीचा आपल्या मनाला विसर पडतो, व असें वाटतें कीं, अहो, आतां याचे आप्त, इष्ट, बायको, मुलगा, सासू, जी कोणी जिवलग असतील त्यांना बोलवावें, त्यांच्या भेटी झाल्यानें ह्याची शुश्रूषा, औषधपाणी व्यवस्थित होईल व ह्याला बरें वाटेल. पण या नारायणबुवांनी माझ्या जांवयाच्या अंतकाळींसुद्धां त्यांची आमची भेट होऊं दिली नाहीं! यावरून सत्पुरुषाचें ढोंग करणारे लोक काय वृत्तीचे असतात याची जाणीव, ज्याला थोडें तरी कळतें, त्याला झाल्याशिवाय राहाणार नाहीं.

अशा बुवांच्या नादी जे लागतात त्यांचा वाईट शेवट झाल्याचें अनेक ठिकाणीं ऐकिवांत आहे. माझ्या जावयाचा सत्यानाश तर झालाच !!

नारायणबुवाचे शिष्य महादेव अप्पा कुदळे हे शहापूर येथें होते. आम्हीं बेळगांवी असतांना यांची वाटेंत गांठ पडली, त्यावेळीं माझी मुलगी सिंधू (विनायक कृष्ण दांडेकरांची बायको) हजला त्यानें पाहिलें आणि म्हणाला, "वहिनी, तुम्ही इकडे कुठें ?"

वाटेंत बोलणें बरें नाहीं म्हणून माझी मुलगी म्हणाली, ' माझा नाऊ इथें आहे, आम्ही किल्ल्यांत राहातों. उद्यां तुम्ही तिथें या व मग आपण बोलू.'

त्याप्रमाणें हा कुदळे भेटण्याकरितां किल्ल्यांत आला होता. हा कुदळे नारायण बुवाच्यावरोबर काशीला गेला होता. तिथें तो दोन तीन महिने होता म्हणून आमचे जांवई व मुलगी यांची त्याची ओळख. हा आमच्या घरीं आल्यावर सिंधू म्हणाली, ' आई हे कुदळे नारायणबुवाचे शिष्य आहेत' हें तिचें बोलणें ऐकल्याबरोबर मला फार दुःख झालें व मी त्यांना म्हटलें,

"अहो कुदळे, एका आमच्या जावयाचा सत्यानाश तुमचे गुरु नारायणबुवा यानी केला तितका पुरेसा नाही का झाला? आता तुम्ही तरी या बुवाचा नाद सोडा" माझ्या जावयाची श्रीमती व इतर स्थिति या कुदळ्याला माहित होती म्हणून मला जितके म्हणून बोलावेसे वाटले तितके बोलून अश्रूनी डोळयाचे पारण फेडल

माझ्या मुलीच्या सत्यानाशाच प्रदर्शन त्याच्यापुढेंच होते, तेव्हा तो काय बोलणार? त्याला सर्व गोष्टी कळल्यावर त्याचे डोळेहि दुःखाश्रूनी गळू लागले

आपल्या समाजात चागल्या बुद्धीची माणसेच फार थोडी बायका काय आणि पुरुष काय! अशा बुवाशाहीबद्दल बोलणी निघाली की त्याचे म्हणणे असे पडत की, अहो, तुमचा जावई वेडा, त्याला कोण काय करणार? पण मी म्हणते, वेड्याना लुबाडण्याकरिता सत्पुरुष आहेत की काय? का त्याना शहाणे करण्याकरिता? ज्याच्या पदराला काही चाट बसत नाही असे लोक बुवाचे गोडवे गात बसतात हच आपल्या राष्ट्राचे दुर्भाग्य होय!

ह लिहिण्याचे कारण इतकच की, बायकानी व पुरुषानी चालू जगाच्या राहाटीत खरा सत्पुरुष नाही असे समजून चालाव, तरच त्याचा तरणोपाय आहे हे असले घातकी बुवा व साधु नाहीसे झाले तर किती समाधान होईल म्हणून साग? किती लिहिले तरी अपुरच आहे लोकाचे अज्ञानतिमिर नष्ट होणें हेंच जरूर आह

लोकाना मी व माझी मुलगी जिवत आहोत तोपर्यंत नारायण बुवाच कपटजाल किती भयकर असत त कळून येईल व त तस कळावे अशी माझी इच्छा आहे

* * *

## श्रीमती राधाबाईंच्या एका वक्तृत्वपूर्ण व आवेशयुक्त पत्रांतील सारांश ( २०–८–३५ चें पत्र )

नारायणबुवा, तुम्ही केलेली कृति फार भयकर आहे मी तुम्हाला धारवाड, बेळगाव व विजापूर येथून बरीच पत्रे पाठविली त्या एकाचेहि उत्तर तुम्ही दिले नाही! तुम्ही माझ्या जावयाचा अर्थानें व प्राणाने सर्वस्वी नाश

कल्पात या तुमच्या मायावी कृतीने माझी मुलगी हाय हाय करीत आहे नारायणबुवा, ही तुमची अघोर करणी आहे तुमच्या या कपटजाळात यापुढे देशबांधव व देशभगिनी सापडू नयेत अशी माझी दवाजवळ मागणी आहे

तुमचे भक्त तुमच्या सिद्धीची महती सागतात म्हणे महाराजांनी मेलेली गाय तीर्थ शिंपडून जिवंत केली! पण मी तुम्हाला असे विचारतो की इतका तुमचा प्रभाव असून ज्याचे पैशावर पाणी करून तुमचा तळीराम गार करून घेतलात त्या माझ्या जावयाला हो तुम्ही कसा जिवंत केला नाही ?

जावयाचा बुद्धिभ्रंश—नारायणबुवा, आम्ही वर्नाक्यात राणी बिन्नुराम होतो तेथ चि सिंधूचे पत्र आले की आताशा चित्त घरात मुळीच नाही व सारखे वेडगावी जातात एक वेळ इकडे येऊन तुम्ही तरी सागा , नारायणबुवा, मायापाश फार कठोण आहे मी बापुळमराला गेले व जवळ बसवून घेऊन विनायकरावाना उपदेश केला मास योग्य रस्त्याव जावई मला म्हणाले की महाराज सागतात की ' विनायक तू माझ्या सर्व शिष्यात खरा भक्ति करणारा शिष्य आहेस ! वेड्या, या तुझ्या सपत्तीला काय करतोस ? अशीच भक्ति कर म्हणजे तुझ्या पुढे अष्टसिद्धि येऊन उभ्या राहतील ' हे त्याचे भाषण ऐकून माझा व माझ्या मुलीचा जीव अगदी करपून गेला कारण नारायणबुवा, पोटात कालकूट विष आणि तोंडात मात्र मध असा रौनीची केली तुम्ही माझे जावयाला पाजली होती नारायणबुवा, तुमचे दुर्विचार मागाव लगडे बोटे आहेत याबद्दल यमधर्माजवळ जाब द्यावा लागेल याची आठवण ठेवा तूर्त तुम्ही ऐषआरामात गुतल्यामुळे विसर पडेल म्हणून सुचविले आहे

अधिपाऱ्याने तुम्हाला विचारले तर तुम्ही काय उत्तर द्याल? नारायणबुवा, आज जर माझ्या हातात राजसत्ता असती तर कायदाच असा केला असता की, असा युवानी व साधूनी भरलेले मठ व संस्था, जितक्या म्हणून असतील तितक्या सर्व काढून घ्याव्या. नारायणबुवा ! मी माझ्या मुलीकडे व तिच्या ...लाकडे पाहिल्यावर मला काय वाटत असेल याची कल्पना तुम्हीच करा अहो ! जो जेवून उठल्यावर हातावर पाणी घालण्यास ब्राह्मण, तो आज पोटाकरिता पुढे लिहवत नाही जळो ती बुवाशाही!

(दैनिक त्रिकाळ ता ३०-८-२५)

* * * * *

## मी व नारायण महाराज



के श्री. शं पेंडसे, खामगाव

किर्लोस्कर मासिकाचा आगस्टचा अंक म्हणजे नारायणमहाराजांच्या कीर्तिघटाला पडलेले छिद्र होय ! . माझे मते तीन्ही लेखकांनी एका अंगाचा विचार केलेला दिसतो मी जो आज समाजापुढे विचारप्रवृत्त होण्यास मांडीत आहे तो (पैशाची नव्हेत) नैतिक अध पाताची होय ! .

मी पुण्यास शिकावयास असताना केडगावला जावयाचा प्रसंग नेहमी येई. माझी बहीण चि सौ. लीला ही आजारी होती, तिचे दुखणे पुढे क्षयावर गेले. तिचे शुश्रुषेकरिता केडगावटात मला तब्बल एक वर्ष राहाण्याचा प्रसंग आला नारायणबुवाच्या तीर्थ व अंगाऱ्याचा प्रभाव लटका पडून माझ्या प्रिय बहिणीला आपली जीवनयात्रा नारायणपदी अर्पण करावी लागली. माझे जेवण घरीच होत असल्यामुळे मी . .... . मिंधा झालो नव्हतो,

सर्व जागा शोधूनहि मिळायची वस्तु सापडली नाही बरोबर जर चोरच घेतला तर गोडीगुलाबीने थोडाच तो दडविलेला ऐवज दाखविणार ? शेवटी मी निराश होऊन महाराजांना सर्व सांगितले आता रात्री दोनचा सुमार होता खेडवळाचा जीव तिळतिळ तुटू लागला माझ्या मनात तर अतिशय त्वेष आला, पण करणार काय ? या नंतर महाराजांनी त्याला झोपावयास सांगितले व बायको येईल असे आश्वासन दिले (या दरम्यानच्या काळात पहारेकऱ्यानं आपले काम करून घेऊन त्या बाईला धर्मशाळेत पोचविले होते ) खेडवळ धर्मशाळेत जो जातो तो बायको सामानाजवळ निजलेली ! अर्थात् तेथे तिची व त्याची बाचाबाची सुरु झाली व तो तिला मारू लागला ! ही संधि साधून त्या पहारेकऱ्याने त्या दोघानाहि अशा अपरात्री धर्मशाळेतून बाहेर काढून स्टेशनच्या रस्त्यावर खूप लांब हाकून दिले !

दुसरे दिवशी सारा प्रकार महाराजाच्या कानावर जाऊनहि त्या पहारेकऱ्यास माफीशिवाय कोणतीच शिक्षा मिळाली नाही महाराजांजवळ राहणाऱ्या तरण्याबांड अविवाहित शिष्यानं (त्याचे नांवहि मी सांगू शकतो) असाच एक अत्याचार भर मध्यरात्री अगदी उघडयावर करण्याचा यत्न केलेला मला माहीत आहे

वात्सल्याच्या मार्गे दडून एका शिष्याने एका वयेवऱ्याच्या मुलीवर वाईट नजर ठेवल्याचे जेव्हा माझ्या निदर्शनास आले, तेव्हा मी त्या इसमास अप्रत्यक्षपणे टोमणे मारु लागलो प्रत्येक इसम आपआपसात कुजबुजू लागे पण तो केवळ महाराजांचा पट्टशिष्य (व तो ताकदवान) म्हणून भिऊन सर्व गप्प बसत असत आम्ही मात्र याला इकडे तिकडे फिरणे मुष्कील करून सोडले हा इसम तेथे अजून राहात आहे असा तऱ्हेच्या भयानक घाटेरी वातावरणात आपल्या लेकी, सुना व बायका घेऊन बेटात जाणे व राहाणे किती भयंकर आहे, ह समाजाला समजावयाला नको काय ?

नारायणबुवांना माझा असा स्पष्ट सवाल आहे की, महाराज आपण जर लोकांचा उद्धार करण्याकरता अवतरला आहात तर बेटाच्या स्थापन पासून तेथे अव्याहत जे वाईट प्रकार चालू आहेत, त्याचे निराकरण इतक्या

